# फाटकी वाकळ



## प्रकरण १ लें

## मी खेड्याकडे निघालों

मुंबई सोडून जाणं माझ्या जिवावर आलं होतं. माझं सारं आयुष्य अगदीं बालपणापासून मुंबईतच गेलं होतं. मुंबई सोडून मी दुसऱ्या कुठंच गेलों नव्हतों—पुणंसुद्धां मी पाहिलं नव्हतं. खुद्द मुंबईत शिवडी आणि वडाळा कुठं आहेत याचीही मला कल्पना नव्हती. परळची जी कांहीं माहिती होती तीदेखील मुख्य रस्त्यापुरती. परळ व्हिलेज म्हणून एक आहे असं म्हणतात पण तें कुठं आहे याचाही मला पत्ता नव्हता. मुंबईत असणारं हें व्हिलेज (खेडं) जिथं मी पाहिलं नाहीं तिथं एकदम एका खेड्यांत जायचा प्रसंग येतांच माझी मनःस्थिति काय झाली असेल याची कल्पना बाहेरच्या माणसाला करतां येणार नाहीं.

## फाटकी वाकळ

ज्या गांवांत मीं जाणार होतों तें गांव जिल्हा नव्हता. आमच्या मुंबईच्या दृष्टीनं जिल्हा म्हणजेसुद्धां खेडं वाटलं असतं असं ज्या वेळीं मी जिल्हा पाहिला त्या वेळीं मला वाटलं. जिल्हा नव्हे, तालुका नव्हे, अगदीं शंभर टक्के खेड्यांत मी येऊन पोंचलों होतों.

आभाळांतून जमिनीवर कोसळलेल्या ताऱ्याला जें वाटेल, त्याची कल्पना जशी कुणाला करतां यायची नाहीं तसंच मला वाटत होतं, असं एकाद्या कवीनं म्हटलं असतं. मी कांहीं कवि नाहीं. कवीची दृष्टि जशी मला नाहीं तसंच कवीचं हृदयही नाहीं. भकास मुंबईतून रमणीय अशा खेड्यांत आल्यामुळं म्हणूनच माझ्या मनाला आनंद झाला नाहीं.

जग कसं संकुचित झालं असं मला वाटूं लागलं. ट्रॅम नाहीं, रेल्वे नाहीं, मोटर नाहीं कीं व्हिक्टोरियासुद्धां नाहीं. क्वचित एकादी बैलगाडी दिसे. मोटर नाहीं असं मी म्हटलं खरं, पण सर्व्हिसची मोटर बस त्या गांवापासून सुमारं मैलभर अंतरावरून जात असे. एकादा उतारू असला तर त्याच्यासाठीं थांबत असे; पण गांवाच्या जेवढ्या भागांत मी रहात होतों तेवढ्या वस्तींतल्या भागांत रबरी टायरचा माग रस्त्यावर कुठंसुद्धां दिसण्याचा योग येत नसे.

मग मी खेड्यांत कां आलों?

स्वेच्छेनं मी खेड्यांत आलों. मी कवी नव्हतों तरीही माझं अंतरंग भावनात्मक होतं. विशेषतः देशाची परिस्थिति मला जाणवत होती. देशभक्तीच्या व्याख्या निरनिराळे लोक निरनिराळ्या प्रकारें सांगत होते. निरनिराळे देशभक्त आपापल्या आंखलेल्या मार्गानें जात होते. बी. ए. झाल्याबरोबर मला वाटलं, आपणही आपला एक मार्ग आंखावा.

त्याला एक कारण झालं. ज्यूनियर बी. ए. च्या वर्गात असतांनाच माझे वडील वारले. त्यांच्या मागोमाग एकच महिन्यांत माझी आई मला सोडून गेली. दुसरं भावंड कुणीच नव्हतं त्यामुळं मागं कसलाच लागाबांधा नव्हता. होते काय ते कॉलेजांतले चार मित्र. त्यांचाही माझ्याबद्दल फारसा जिव्हाळा नव्हता.

फाजिल अभ्यासू विद्यार्थ्याला मित्रांचा परिवार वाढवतां येत नाहीं. माझ्या नात्याची कांहीं मंडळी कुठंतरी अशाच एका खेड्यांत होती असं मी नुसतं ऐकलं होतं. त्यांतला कुणी एकाददुसरा आमच्या घरीं कधीं येऊनही गेला असेल, पण ओळख रहाण्याइतका कुणाचाच परिचय झाला नव्हता.

# मी खेड्याकडे निघालों

वडील वारल्यानंतर मला असं दिसून आलं, कीं स्वतःच्या पायावर उभं राहिल्याखेरीज मला दुसरं गत्यंतर नाहीं. त्यांनीं एक हजाराचा विमा उतरला होता. तेवढ्यांत कसा बसा बी. ए. पर्यंतचा माझा खर्च भागला असता. पुढं नोकरी करण्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

मी विचार केला, नोकरी करून माझ्या वडिलांनीं काय मिळवलं ? विमा उतरला नसता तर शिल्लक अशी त्यांना कांहींच ठेवतां आली नसती. ही सक्तीची शिल्लक होती म्हणून मी बी. ए. तरी झालों. पन्नाशीला येईपर्यंत नोकरी करून पोराबाळांचं लेंढार फारसं नसतांनाही त्यांना कांहींच शिल्लक ठेवतां आली नाहीं असं प्रत्यक्ष पाहिल्यावर, त्यांच्याच मार्गानं आपणही जाणं योग्य होईल असं मला वाटेना.

मग करायचं काय ? व्यापार करायचा म्हटलं तर कसला व्यापार करायचा ? आणि व्यापार करायला भांडवल तरी कुठलं आणायचं ? मोठमोठ्या व्यापाऱ्यांच्या गोष्टी मी ऐकत होतों. फेरीवाल्यापासून प्रारंभ करून कित्येक लक्षाधीश झाले होते—पण त्या गोष्टी गुजरात्यांच्या होत्या—मारवाड्यांच्या होत्या. सारेच कांहीं सरळ मार्गानं श्रीमंत झाले नव्हते; आणि वांकड्या मार्गानं जाण्याची प्रवृत्ती माझ्या ठायीं नव्हती. म्हणूनच मला प्रश्न पडला, पुढं करायचं काय ?

तो काळ मोठा खळबळीचा होता. कायदेभंगाची चळवळ त्या वेळीं सुरू झाली होती. हजारों—लाखों लोक निधड्या छातींनं तुरुंगांत जात होते. त्यांतले कुणी पुढारी तुरुंगांत जाऊं लागले म्हणजे आम्ही कॉलेजांत हरताळ पाडीत होतों. त्या हरताळ पाडणारांत मी कधींच पुढाकार घेतला नव्हता. सर्वांनीं ठरवलं, कीं आज कॉलेजांत जायचं नाहीं कीं मी स्वस्थ घरीं बसून कांहीं तरी वाचीत असें. अभ्यासाबाहेरचीं फारशीं पुस्तकं मी वाचलीं नव्हतीं. अभ्यासक्रमाबाहेरचीं पुस्तकं वाचणं पाप आहे असं मला वाटे तेवढींच वाचण्यापलीकडे माझ्या व्यासंगाची मजल गेली नव्हती.

पण मला एकच नाद होता—तोही माझ्या वडिलांच्या अनुकरणानं मला लागला होता—मी वर्तमानपत्रं वाचीत असें—सारीं वर्तमानपत्रं वाचीत असें. बाबांच्या दृष्टीनं तेवढीच एक त्यांची चैन होती. इंग्रजी आणि मराठी जेवढीं म्हणून दैनिकं आणि साप्ताहिकं होतीं तेवढीं सारीं आमच्या घरीं रोज येत असत. त्यामुळं आमच्या चाळींतल्या लोकांना आमची खोली म्हणजे एक लायब्ररी वाटे. बाबा कुणालाच नको म्हणत नसत—पण त्यांचा

एक नियम होता, वर्तमानपत्र खोलींतून घेऊन जायचं नाहीं. महिन्याकाठीं रद्दीचा रुपया सव्वा रुपया जो मिळत असे तो घालवायची त्यांची तयारी नव्हती.

म्हणजे माझे बाबा चिक्कू होते असं मात्र नव्हे. जिथून कांहीं मिळूं शकेल तिथून तें मिळवायचं, निष्कारण उधळमाधळ करायची नाहीं, निष्कारण नाश करायचा नाहीं अशीच त्यांची वृत्ती असे.

त्या वर्तमानपत्रांच्या वाचनामुळं माझ्या डोक्यांत देशप्रेमाचं वेड शिरलं होतं. एवढंच एक सोडून दिलं तर कॉलेजचा विद्यार्थी या नात्यानं मी अगदीं निर्मळ होतों असं म्हणायला मला मुळींच संकोच वाटत नाहीं. माझ्या प्राध्यापकांचा मी आवडता विद्यार्थी होतों. बी. ए. च्या वेळीं थोड्याच मार्कांनीं माझा फर्स्ट क्लास चुकला पण त्या पूर्वीच्या परीक्षांत मी सदोदित फर्स्ट क्लासमधें आलों होतों.

कुठं तरी तात्पुरती नोकरी पत्करून मी एम. ए. च्या टर्म्स भराव्या असं माझ्या प्राध्यापकांना वाटत होतं. पण बाहेरची परिस्थिति पाहिल्यावर पुढला अभ्यास करण्यांत फारसं स्वारस्य नाहीं असं मला वाटलं.

एम. ए. होऊन तरी मी काय करणार होतों? साऱ्याच एम. ए. ना कांहीं कुणी प्रोफेसर नेमीत नाहीं. फर्स्ट क्लासांत आलेले कितीतरी एम. ए. साठसत्तर रुपयांवर मास्तरकी करीत होते. एम. ए. होऊन असल्या दुरवस्थेंत रहाणं माझ्या अंतःकरणाला पटलं नसतं. भवितव्यावर ताबा ठेवणं कांहीं माझ्या हातीं नव्हतं. एक प्रकारें मी अगदी स्थितप्रज्ञ होतों. मला कसलीच महत्त्वाकांक्षा नव्हती. फाजील अभ्यासू म्हणून माझी ख्याती होती खरी, पण मी जो अभ्यास करीत असें तो क्लास मिळवण्यासाठीं नव्हता. हातीं घेतलेलं काम शंभर टक्के उत्तम रीतीनं करायचं एवढ्याच भावनेनं मी कसून अभ्यास करीत असें.

माझे वडीलसुद्धां माझ्यासारखे स्थितप्रज्ञ होते. तूं पुढं काय करणार आहेस असं एकदां-सुद्धां त्यांनीं मला विचारलं नव्हतं. कदाचित त्याचमुळं महत्त्वाकांक्षेचा उगम माझ्या हृदयांत होत नव्हता.

अंतरंगाचं परीक्षण करण्यासाठीं ज्या वेळीं मी माझ्या हृदयांत नजर फेकीत असें त्या वेळीं तिथं मला शून्याकार दिसून येई. तिथं कांहींच सांठवलेलं नव्हतं. एकच लहानशी ठिणगी होती. पण ती कधींच तेवत नसे. ती ठिणगी निर्माण व्हायलाही माझं वर्तमानपत्रांचं वाचनच

कारणीभूत झालं होतं. देशप्रेमाच्या आवडीची ती न चेतणारी ठिणगी मी बी. ए. होताच तेवूं लागली.

बाहेर हलकल्लोळ उडाला होता. देशभक्तीच्या जळजळीत निदर्शनानं सारा हिंदुस्थान उजळून उठला होता. त्या उजाळ्याच्या प्रकाशांत मला माझं अंतरंग दिसून आलं. देशासाठीं आपणही कांहीं केलं पाहिजे असं मला वाटूं लागलं.

काय केलं पाहिजे तें मला माहीत नव्हतं. कांहीं तरी केलं पाहिजे असं वाटत होतं खरं, पण तो मार्ग दाखवायला मला कुणीच मार्गदर्शक नव्हता. कॉलेजांत जे चार मित्र मी जोडले होते तेही माझ्यासारखेच कोरे होते—जबरदस्त अभ्यासू होते—त्यांनीं आपला मार्ग आंखला होता—त्यांना नोकरी करायची होती, मोठ्या पगाराची नोकरी मिळवायची होती—आणि त्या अनुरोधानं ते प्रयत्न करीत होते.

मला नोकरी करायची नव्हती—पगाराच्या हव्यासानं तरी नोकरी करायची नव्हती. माझ्या गरजा फार अल्प होत्या. मी चहासुद्धां पीत नसें. आमच्या घरीं कधींच चहा झाला नव्हता त्यामुळं मी असा कोरडा राहिलों होतों.

चैनी मित्रांच्या परिवाराचा उपसर्ग नसल्यामुळं घरीं चहा होत नाहीं म्हणून दुकानांत जाऊन चहा घ्यायची बुद्धि मला कधींच झाली नाहीं. कपड्यालत्त्याच्या बाबतींतसुद्धां माझ्या वडिलांप्रमाणंच माझी रहाणी अगदीं साधी होती. उभ्या जन्मांत मी कधीं बूट स्टॉकिंग घातले नव्हते, नेक्टाय कॉलरचा गळफांस माझ्या मानेला कधींच पडला नव्हता, डोक्याच्या केसांना ब्रिलियंटाइनचा स्पर्श कधींच झाला नव्हता. देशाची सेवा करायला त्यागी वृत्तीनं निघणाऱ्या व्यक्तीला जी अनुकूलता पाहिजे ती सर्व दृष्टीनं मला सुलभ होती.

म्हणूनच मला वाटलं, कीं देशासाठीं आपण कांहीं तरी करावं. देशकार्याची पहिली पायरी वर्तमानपत्राच्या ऑफिसांत असते. म्हणून पहिल्यानं मी तिथून सुरवात केली. मुंबईतील एका अव्वल दर्जाच्या दैनिकाच्या कचेरींत मी पाहिल्यानं प्रवेश केला. पंचवीस रुपये पगारांत माझा मुंबईचा खर्च भागेना. थोडीशी शिल्लक होती. तिच्यावर कांहीं दिवस काढले—पण पुढं निभाव लागेना.

आणि कचेरींत तरी मी काय करीत होतों ? रॉयटरच्या आणि असोसिएटेड प्रेसच्या तारांचीं भाषांतरं करण्यांत देशभक्तीचं शिक्षण कसं मिळतं याची मला कल्पना होईना. दररोज

लिहिले गेलेले अग्रलेख वाचून मला कोणतीच स्फूर्ति झाली नाहीं. तसले अग्रलेख मी सहज लिहिले असते. पण अग्रलेख लिहिणं म्हणजे एक कांहीं तरी जबाबदारीचं काम आहे अशी मुख्य संपादकांची कल्पना असल्यामुळं एकाद्या दिवशीं तें काम करण्याची मी तयारी दाखवली तरी मुख्य संपादकांनीं ती संधि मला कधींच दिली नाहीं.

जीं वर्तमानपत्रं वांचून देशप्रेमाची प्रवृत्ती माझ्या ठिकाणीं उत्पन्न झाली होती त्या वर्तमान-पत्रांच्या कचेरींतील वातावरण देशप्रेमाचं उत्तेजन द्यायला अपुरं आहे असं मला वाटलं. राजकारणाचा अभ्यास करीन म्हटलं तर राजकारणावरचीं पुस्तकंसुद्धां त्या दैनिकाच्या कचेरींत नव्हतीं. मला आश्चर्य वाटे तें हेंच, कीं कसलाही अभ्यास न करतां हे संपादक लोक राजकारणाची चर्चा करतात तरी कसे ?

माझ्या प्रामाणिक वृत्तीला तिथलं तें वातावरण पटेना. साप्ताहिकाच्या ऑफिसांत जाण्याचं मनांत येत असूनही म्हणूनच मी टाळलं. भारतसेवक समाजासारख्या ज्या संस्था होत्या त्यांत प्रवेश होणं सुलभ नव्हतं; आणि प्रवेश झाला असता तरीही माझी मनोभूमि त्यांच्या विशिष्ट प्रकारच्या राजकारणाशीं समरस व्हायला तयार नव्हती.

कॉंग्रेसमधें प्रवेश करायचा म्हणजे काय हें मला कळत नव्हतं. मी कॉंग्रेसचा चार आणे सभासद होतों; पण कॉंग्रेस कमिटीच्या कोणत्याही निवडणुकीसाठीं उभं रहाण्याकरितां जी कर्तबगारी किंवा जी आर्थिक अनुकूलता लागते ती माझ्यापाशीं नव्हती. नुसता सत्याग्रह करून किंवा पिकेटिंग करून तुरुंगांत जाण्यानं मी कांहींतरी विशिष्ट साधीन असंही मला वाटत नव्हतं.

विधायक कार्यक्रमाच्या गोष्टी बोलल्या जात होत्या. 'खेड्याकडे चला' अशी हांक ठोकली जात होती. त्या हाकेंत कांहीं तथ्य आहे असं वाटून मी त्या विषयाचा विचार करूं लागलों. अगदीं निष्क्रिय म्हणून रहाण्यापेक्षां खेड्यांत जाण्यांत त्यागाबरोबरच कर्तृत्वालाही वाव आहे असं मला वाटूं लागलं.

पण खेड्यांत जाऊन मी काय करायचं याची मला चांगलीशी कल्पना नव्हती. बरेच दिवस मी खादी वापरीत होतों. सूत काढण्याचा अभ्याससुद्धां मी केला होता. तसं पाहिलं तर सुतानं स्वराज्य मिळेल या घोषणेवर माझा फारसा विश्वास नव्हता. मी खादी वापरीत होतों खरा पण तें एक नुसतं नैमित्तिक विधान आहे, एका विशिष्ट पक्षाचं तें एक प्रतीक आहे, यापलिकडे त्या खादी वापरण्याला माझ्या बुद्धीनं मी फारसं महत्त्व देत नव्हतों.

पोषाखांत साधेपणा असणं मला इष्ट वाटत होतं म्हणूनच मी खादी वापरीत होतों. राजकारणाचा आणि खादीचा संबंध कसा येतो याची मला चांगलीशी कल्पना नव्हती. गतानुगतिकत्वानं जरी मी खादीवाला बनलों नव्हतों तरी खादी वापरण्याच्या मागं असलेली राजकारणांतील तात्त्विक भूमिका मला आकलन झाली नव्हती.

खेड्यांत जायचं म्हणून ज्यावेळीं मी विचार केला त्यावेळीं माझ्या मित्रांना मोठं आश्चर्य वाटलं. माझी आजपर्यंतची जी कॉलेज-करीअर होती तिला विसंगत असं वर्तन मीं करीत आहें असा त्यांनीं माझ्यावर आरोप केला.

मी कुणालाच उत्तर दिलं नाहीं. कॉलेजांत असतांनाच ' खादीवाला ' म्हणून जे माझी टवाळी करीत असत त्यांना माझ्या या निश्चयाबद्दल विशेष कांहीं वाटलं नाहीं. म्हणून ज्यावेळीं मी खेड्यांत जातों आहें असं त्यांना कळलं त्या वेळीं, खादी वापरतों म्हणून ज्या भाषेंत ते माझी थट्टा करीत त्याच भाषेंत, माझ्या खेड्यांत जाण्याबद्दलही त्यांनीं माझी टिंगल करायला सुरवात केली.

एक नाजुक गोष्ट सांगायचं राहिलं. कॉलेजच्या जीवनक्रमांत प्रत्येक विद्यार्थ्याच्या हृदयांत असलेल्या कोमल भावनांना अनुसरून केव्हां ना केव्हां तरी, कसली ना कसली तरी प्रेमविषयक परिस्थिति निर्माण होत असते. कांहीं काव्यप्रकृति विद्यार्थ्यांप्रमाणें मी जरी मोठासा प्रणयवेडा बनलों नव्हतों तरीही अपेक्षित कौटुंबिकतेच्या भावनेनं कॉलेजच्या वातावरणांतूनच आपली आवड पुरी पडेल अशी अंधुकशी इच्छा माझ्या अंतःकरणांत वावरत होती. त्या रहस्याची परिस्फुटता मी स्वतः माझ्यापासूनच चोरून ठेवली होती. त्या वेळच्या कॉलेजांतून विद्यार्थिनींची संख्या आजच्या प्रमाणांत जरी वाढलेली नव्हती तरीही, कौटुंबिकतेचा असो किंवा भावनात्मकतेचा असो, परिपोष होण्याइतक्या विद्यार्थिनी कॉलेजांतून वावरत होत्या. त्यांतूनच निवड करण्याचा मी विचार करीत होतों. मी मोठासा रसिक नसलों तरी अगदींच नीरस नव्हतों—अरसिक तर खात्रीनं नव्हतों. डोळ्याचा आणि हृदयाचा कुठं तरी संबंध आहे असं मला वाटे. डोळ्यावाटे हृदयाला भिडणारी भावना बुद्धीला चकवून माणसाला वेड लावते असं वाटण्याइतकी नाजुक मनोवृत्ती माझ्याठायीं कुठं तरी लपून बसली होती. म्हणूनच मी त्या अनुरोधानं शोध लावीत असतां स्वतःची दाद स्वतःला लागूं देत नव्हतों.

असं एक स्थळ हेरून ठेवलेलं असावं अशी माझी अपेक्षा होती. बुद्धिमान असलेल्य तरुण विद्यार्थिनी बहुधा कुरूप होत्या—म्हणजे अगदींच हिडिंबा जरी नव्हत्या तरी सौंदर्याची सीमा ओलांडून दुसऱ्या कोणत्या तरी राज्यांत त्यांच्या शरीरसौष्ठवानं प्रवेश केला होता. ज्या देखण्या होत्या त्या क्वचित चटोर तर क्वचित उनाड होत्या. मला रंभा–उर्वशी–तिलोत्तमाच पाहिजे अशी माझी अपेक्षा नव्हती; पण दृष्टीच्या द्वारें हृदयाला धक्का बसूं न देण्याइतकं शरीरसौष्ठव असावं एवढंच माझं म्हणणं होतं.

मी जात्याच मोठा भित्रा होतों. स्त्रीजातीच्या आसपास घोटाळण्याचं तर राहोच, पण टवकारून पहाण्याइतकं धैर्यसुद्धां मला नव्हतं. त्याबद्दल माझी थट्टा होई, पण या कामीं असणारी माझी दांभिक वृत्ती मी उघड होऊं न देण्याची खबरदारी घेत असें. एका विशिष्ट प्रकारच्या भावनेनें हेरीत असतां माझी नजर एका व्यक्तीवर स्थिरावली होती. त्या व्यक्तीची माझ्याबद्दलची प्रवृत्ती कशी आहे याची मला कल्पना नव्हती—वर वर्णिलेल्या माझ्या वृत्तीला अनुसरून मी तो अंदाज घेण्याचं टाळलं होतं.

ती प्रवृत्ती काय आहे हें कॉलेजच्या बाहेर पडेपर्यंत मला कळऊं नव्हतं. मी खेड्याकडे चाललों याची ज्यावेळीं कॉलेजांत हाकाटी झाली त्यावेळीं माझं हें कोडं आपोआप उलगडलं.

प्रकरण २ रें

# मला नवा प्रकाश मिळाला

चाळींतली खोली सोडल्याचं सर्वांना कळवलं होतं. वडिलांच्या वेळचं असलेलं बरेचसं सामान कांहीं विकून टाकलं आणि कांही शेजाऱ्यापाजाऱ्यांना दिलं. खेड्यांत जाऊन रहायला पुरे पडण्याइतकं बेताचं सामान बांधून घेण्याच्या तयारीत मी होतों.

माझे मित्र म्हणून ज्यांना म्हणतां येईल असे चारदोन विद्यार्थी येऊन मला भेटून निरोप देऊन गेले होते. पुढल्या परिस्थितीचा विचार करीत मी एकटाच माझ्या खोलींत बसलों असतां ज्यूनियर बी. ए. च्या वर्गात असलेली एक विद्यार्थिनी माझ्या खोलींत येऊन प्रविष्ट झाली.

मी थक्क झालों. हेंच तें माझं हेरलेलं स्थळ. माझ्या कॉलेजांतील कारकीर्दीत कुणाही विद्यार्थिनीनं माझ्याकडे कधीं ढुंकूनसुद्धां पाहिलं नव्हतं. मी पहायला भीत असें हें साऱ्यांनाच माहीत होतं. कॉलेजांतल्या मुलींच्या थट्टेचा विषय होऊन बसलेला मी, या अचानक आगमनानं स्तंभित झालों यांत नवल कसलं?

## फाटकी वाकळ

ती विद्यार्थिनी आमच्या कॉलेजांतल्या साऱ्या मुलींत चमकणारी समजली जात होती. ती फारशी सुंदर नव्हती तरी कुरूप असलेल्या बुद्धिमान विद्यार्थिनींच्या सदरांतही मोडण्याजोगी नव्हती. तिच्या चेहऱ्याच्या रेषा कलाकार चित्रकाराच्या कसोटीला जरी उतरल्या नसल्या तरी बुद्धिमत्तेचं तेज तिच्या साभ्यासीच्या मोहकतेला उठाव आणीत होतं. ती प्रकृतीनं चांगलीच सुदृढ होती. कॉलेजांतले चिटवळ विद्यार्थी तिच्या वाटेला जायला भीत असत. एकदोघांना क्वचित तिनं थप्पड लगावल्याच्याही बातम्या होत्या. तिचा मित्रपरिवार मोठा होता. मुली आणि मुलगे यांच्या संख्येंत ती सारख्याच अधिकारानं मिरवत असे. प्रत्येक चळवळींत भाग घ्यायला ती पुढाकारानं वावरत असे. कॉलेजांत हरताळ पाडण्याच्या प्रसंगीं ती बंडखोर विद्यार्थ्यांच्या अग्रभागीं चमकत असलेली दिसून येई.

असली ही विद्यार्थिनी मला भेटायला आली म्हणून मी आश्चर्यचकित झालों. गृहस्थाच्या रीतीला अनुसरून उत्थापनपूर्वक मी तिचं स्वागत केलं तेव्हां ती म्हणाली, "सामानसुमान बांधलंत वाटतं? एकूण तुम्ही खेड्यात जाणार आहांत. काय करणार आहांत तिथं जाऊन?"

या अचानक प्रश्नानं मी भांबावून गेलों. पूर्वपरिचय नसतांना केलेला हा प्रश्न सकृद्दर्शनीं अप्रस्तुत होता पण कॉलेजच्या वातावरणांत औपचारिकतेला किंमत देत होतं कोण? मी विनयपूर्वक उत्तरलों, "अजून मी कांहीं विचार केला नाहीं. निष्क्रिय जीवनाला कांहीं तरी मार्गे लावावा एवढ्याच मनोभावनेनं मी या खडतर मार्गावर पाऊल टाकायचं योजलं आहे.—" पुढं मला बोलायला सुचेना. माझेच शब्द मला अस्वाभाविक वाटले. शब्दाच्या अवडंबरावर मी वेळ मारून नेण्याचा प्रयत्न करतों आहें असं तर तिला वाटलं नसेल?

ती हंसली—अगदीं नाजूक आणि मोहकपणें हंसली. मी अस्वस्थ झालों.—एक क्षण गेला—दोन क्षण गेले—तरीही ती बोलली नाहीं. बांधून ठेवलेल्या सामानावर नजर फेकीत ती म्हणाली, "एकूण तुम्ही जाणार हें निश्चित झालंय तर?—" मी नुसत्या मानेनंच होकार दिल्याचं पाहून ती म्हणाली, "मी आल्याचं तुम्हांला आश्चर्य वाटलं असेल नाहीं? इतके दिवस आपण कॉलेजांत होतों, आपला प्रत्यक्ष परिचय व्हायचा कधीं योग आला नाहीं—तुम्ही तसा प्रयत्न केला नाहीं—मीही नुसती पहात राहिलें होतें—अन् आता

अचानक मी तुम्हांला भेटायला आलें हें मोठं चमत्कारिक दिसतं खरं, पण माझ्यानं रहावेना—" ती पुन्हा क्षणभर थांबली.—बोलायला तिला संकोच वाटत होता.

मी तर अगदींच बावरून गेलों होतों. तरीही मी म्हणालों," हो—तसं मला वाटलं खरं. विद्यार्थीदशेंतून मी नुकताच बाहेर पडलों आहें. जगाचा मला अनुभव नाहीं—अनुभव घ्यायचा मी प्रयत्न केला नाहीं. व्यावहारिक जीवनाला मी पारखा आहें म्हणून मला तसं वाटलं. पण आतां साऱ्याच प्रसंगांना तोंड द्यायच्या निश्चयानं मला बाहेर निघालं पाहिजे—" पुन्हा मला बोलायला सुचेना.

पुन्हा ती हंसली. माझं ऊर धडधडत होतं. आम्ही एकटींच तिथं बसलों होतों. कुणी पाहिलं असतं तर त्याला काय वाटल असतं याचा विचार माझ्या मनांत आला. आजपर्यंत कुणीही मुलगी मला भेटायला माझ्या खोलींत कधींच आली नव्हती. माझं मन भरकटत होतं, तोंच मी दचकलों—

" एवढी तयारी केली आहे तर ? " ती हसत हसत म्हणाली, " हें कांहीं थोडं नाहीं. खेड्यांतच आहे माझं घर. खेड्यातच गेलंय माझं बालपण अन् तुम्ही आतां खेड्यांत जात आहां म्हणुन मला जिज्ञासा वाटली. कां चाललांत खेड्यांत ? कुठल्या खेड्यांत ?"

" कोकणांत चाललोंय मी." मी धीर करून म्हटलं, " निमगांवला—"

" निमगांवला ?" ती आश्चर्यानं उद्गारली, "मोठा योगायोग म्हणायचा—कीं मुद्दामच तुम्ही हें गांव निवडलं ?"

" मुद्दामच कां ? " मी विचारलं.

" मी निमगांवची—" ती गंभीर होऊन म्हणाली.

" असं ? " मी स्वाभाविकपणेंच विचारलं. त्या उद्गारांत आश्चर्य होतं तशीच जिज्ञासाही होती.

" म्हणूनच मी विचारलं," ती म्हणाली, " कीं मुद्दामच हें गांव निवडलंत का म्हणून ! खरोखरच तुम्ही मोठी योग्य निवड केली आहे. आमचं निमगांव म्हणजे जरी अगदी लहानसंच खेडं आहे तरी तिथं तुम्हांला कांग्रेसभक्तांची संख्या इतर कोणत्याही गांवापेक्षां जास्त आढळेल. तसं पाहिलं तर कोकणांत केसरीचं प्रस्थ जास्त असल्यामुळं कांग्रेसची मेढ कोकणच्या खेड्यांतून चांगलीशी रोवली गेलेली नाहीं. आमच्या गांवांत ब्राह्मणवस्ती फारशी

नाहीं. आमच्या घराखेरीज आणखी चारदोन घरं आहेत तेवढीच. बाकीचे सारे वाणी, मराठे आणि शूद्र आहेत—" ती पुन्हा क्षणभर थांबून म्हणाली, "मी कुणबी म्हणायला हवं होतं, नाहीं ? घरचा शब्द तोंडाला खिळलाय. ब्राह्मणांखेरीज इतर साऱ्यांना आम्ही शूद्र म्हणतों तिकडे—ती कोकणची बोली आहे—" ती पुन्हां एकदां हसली—चांगली मोठ्यानं हसली आणि म्हणाली, "एका एका गांवचे काय एकेक रिवाज असतात! मुंबईत आलं कीं ही सारी परिभाषा बदलून जाते. शूद्र शब्द अगदीं धार्मिक वाटतो, नाहीं ? व्यावहारिक वाटत नाहीं, सामाजिक वाटत नाहीं. कामकरी, शेतकरी या शब्दांची हल्लीं आपल्याला फार संवय झाली आहे. कुणबीसुद्धां म्हणत नाहीं आतां कुणी—कुणब्यांना कुळवाडी म्हणतात तिकडे—तरीही ब्राह्मणी थाटाचा हा शूद्र शब्द चटकन माझ्या तोंडीं आला;—संस्काराचा प्रभाव हा असा असतो. बरं—कुणी दाखवली तुम्हांला ही निमगांवची वाट ?"

आतां मला बरंच अवसान आलं होतं. पूर्वीचा संकोच मावळला होता. निश्चिंतपणाच्या भावनेला आतां चांगलंच अधिष्ठान मिळालं होतं.

मी म्हटलं, "कां ? चुकली का माझी वाट ?"

"छे छे, मुळींच नाहीं." ती वडीलकीचा आव आणून म्हणाली, "अगदीं अचुक वाटेनं चालला आहांत तुम्ही. म्हणूनच मी विचारलं तुम्हाला."

"एवढी तरी खात्री आली मला." मी म्हटलं, "इथल्या एका कॉंग्रेस कमिटींतल्या नांवाजलेल्या कॉंग्रेस-कार्यकर्त्यानं मला हा सल्ला दिला. त्या गांवच्या लोकांकडूनच अशी मागणी आली होती—"

"कुणी केली होती ही मागणी ?"

"तें कांहीं मला माहीत नाहीं. अगदीं सरकारी हुकुमासारखा हुकूम समजून मी निमगांवला निघालों आहें. तसं पाहिलं तर तिथं जाऊन काय करायचं याची मला चांगलीशी—चांगलीशी कां, मुळींच कल्पना नाहीं. ती कल्पना करून घ्यायचा मी प्रयत्न-ही केला नाहीं. सरकारी नोकरीवर जातांना कोण कुठं असली चौकशी करीत असतो ?—"

"असं म्हणू नका. सरकारी नोकरीवर कुणी जातो त्या वेळीं तिथं एकादा वरिष्ठ अधिकारी असतो. त्याच्या हुकुमाखालीं काम करायचं असतं. तें काय काय असतं अन् कसं करून घ्यायचं याची त्या अधिकाऱ्याला कल्पना असते. इथं तसं नाहीं. अधिकारी

म्हणून तुम्ही तिथं जात आहांत. तिथं हुकूम सोडायचे आहेत तुम्हांला. असं आंधळेपणानं परगांवीं जाणं बरं का ?"

मी ओशाळलों. खरोखरच हा माझा आंधळेपणा झाला होता.

मला त्या मुलीबद्दल आदर वाटूं लागला. पण दुसरा प्रश्न असा पडला, कीं काय म्हणून ही मला भेटायला आली ? मनाचा निर्धार करून मी तसं विचारलं तेव्हां ती म्हणाली, "कॉलेजांत असतांना तुम्ही असेच आंधळेपणानं वागत होतां. कधींच पहात नव्हतां आजूबाजूला. जरा इकडे तिकडे विचारलं असतं, थोडीशी चौकशी केली असती तर तुम्हांला कळलं असतं या माझ्या येण्याचं कारण—" असं म्हणून ती आपल्याशींच हंसली.

माझ्या छातींत धडकी भरली. काय बरं असावं हें कारण ?

ती पुढं बोलत होती. "आतां इतक्या लवकरच मी निमगांवला येण्याचा संभव नाहीं. चांगले चार महिने जातील मी तिकडे येईपर्यंत. तोंपर्यंत मला फार काळजी वाटतेय तुमची. मी आलें होतें तेव्हां तुम्ही निमगांवला जाणार याची कल्पना मला आली नव्हती; सहज मी आलें—"

"पण कां ?" मी जीव तोडून विचारलं.

माझी एकाच शब्दानं दिसणारी ती आत्यंतिक उत्कंठा पाहून ती गंभीर झाली; बराच वेळ थांबली आणि म्हणाली, "कां !—कांहीं गोष्टी अशा असतात रघुनाथराव, कीं तशीच वेळ आल्याशिवाय माणसानं त्या बोलून दाखवूं नयेत. त्यांतून माझ्यासारख्या विद्यार्थिनीनं तर चांगलीच खबरदारी घेतली पाहिजे—" ती पुन्हा थांबली.

ही काय भानगड ? कांहीं प्रेमाबिमाचा तर प्रसंग नाहीं ना ? तसल्या भानगडींत मी शिरलों नव्हतों—तसल्या भानगडींवर माझा फारसा विश्वासही नव्हता. तसल्या भानगडीच्या बाबतींत तिच्यावर कुणी आरोप केल्याचंही माझ्या कानीं आलं नव्हतं. ती पुढं काय बोलते हें पहाण्यासाठीं मी उगीच राहिलों.

"तो विषयच नको आतां." ती म्हणाली, "कॉलेजांत असतांना आपला कधीं परिचय झाला नाहीं. तुम्ही निघून जात आहां असं कळलं, जें व्हायचं राहिलं होतं, परिचय करून घ्यायचा होता तो व्हावा म्हणून मी आलें. कुणाच्या तरी मध्यस्थीनं परिचय करून घ्यावा असं

मला वाटलं नाहीं. मला मध्यस्थी आवडत नाहीं—म्हणून अगदीं सरळ आलें मी तुमच्याकडे—"
ती पुन्हा आणखी थांबून म्हणाली, "पत्रव्यवहाराची संवय आहे का तुम्हांला?"

"कुणाला करायचा पत्रव्यवहार?" मी म्हटलं, "सारा जन्म मुंबईत गेलेला, बाहेर कुणाचा लागाबांधा नाहीं, गांवांतल्या गांवांत ज्या प्रकारचे पत्रव्यवहार चालतात तसल्या भानगडींत पडण्याची मला कधीं बुद्धि झाली नाहीं. माझी वृत्तीच नाहीं ती. मग पत्र-व्यवहार करायचा कुणाला? आतां हा मी निमगांवला निघालों आहें पण सुखरूपपणें पोचलों म्हणून पत्र पाठवायलासुद्धां मला इथं कुणी नाहीं. तुम्हांला माहीतच असेल, कीं मी अगदीं एकटाच आहें—आईबाप, भाऊबहीण कुणीसुद्धां नाहीं मला. मित्रांचाही परिवार नाहीं. मग पत्र पाठवायचं कुणाला?"

"मला पत्र पाठवा!" ती हळुच हंसून म्हणाली.

"काय लिहूं त्यांत?" मी तसंच हंसून विचारलं.

ती मोठमोठ्यानं हसली. उगीच पदरानं तोंड पुशीत तिनं उत्तर दिलं, "पहिलं पत्र सुखरूपपणं पोचल्याचं पाठवा. पुढं मला पाहिजे आहे, तो तुमच्याकडचा रिपोर्ट. दर आठवड्याला मला पत्र आलं पाहिजे तुमचं. त्यांत उभ्या आठवड्यांत तुम्ही जें जें कांही केलं असेल त्याचा सायंत रिपोर्ट दिला पाहिजे मला—" बोलत असतांना ती सारखी हंसत होती. पण तितक्यांत एकदम गंभीर होऊन ती म्हणाली, "थट्टा नव्हे. तुम्ही निमगांवला जातां आहां हें कळल्यावर माझं पहिलं धोरण बदललंय. माझ्या गांवाची काळजी केली पाहिजे मला. मुंबईचा बडा माणूस जाऊन माझ्या गांवच्या भोळ्या भावड्या लोकांना कसा चकवतोय तें कळलं पाहिजे मला. बाबांना मी सांगितलं असतं पण ते पक्के काँग्रेसद्वेष्टे आहेत—"

"आणि तुम्ही?" मी मध्येंच विचारलं.

"माझं अजून कांहींच निश्चित झालं नाहीं." पुन्हा पदरानं तोंड पुशीत ती म्हणाली. बहुधा हा तिचा चाळा असावा.

ती पुन्हां थांबली असें पाहून मी म्हटलं, "हं, चालूं द्या. पुढं काय हुकूम आहे?" माझं मलाच आश्चर्य वाटलं, कसा मी एवढा रंगांत आलों?

"बरेच हे आहांत की तुम्ही ?" ती हंसून म्हणाली, "बरं बरं; आधीं एवढेच हुकम पाळा. पुढं मी तिकडे येईन त्या वेळीं तुमचे रिपोर्ट पडताळून पाहीन अन् मग नवे हुकूम सोडीन—" पुन्हा क्षणभर थांबून ती म्हणाली, "माझा काँग्रेसकडे ओढा आहे हें माझ्या बाबांना पटत नाहीं. म्हणूनच, मनांत येतं तरीसुद्धां अजून मी काँग्रेसची सभासद झालें नाहीं. प्रामाणिकपणें सभासद झालें असतें तर खादी वापरावी लागली असती ना मला ? आणि तें कांहीं बाबांना पटलं नसतं. इथं मी माझ्या काकांकडे रहातें. ते आहेत सरकारी नोकर—अगदीं कडक वृत्ती आहे त्यांची—त्यांना हें असलं कांहींच आवडत नाहीं. मोठा कोंडमारा झाला आहे माझा. हल्लींच्या या हरताळांत मी एकदोनदां भाग घेतला होता त्याची बातमी कुणी काकांना सांगितली. अन् मग जो त्यांनीं थयथयाट केला !—" ती सारखी हंसत सुटली. जसं कांहीं तें दृश्य तिच्या नजरेसमोर दिसत होतं. ती पुढं म्हणाली, "जाऊं द्या. या विद्यार्थीदशेंत हें असं चालायचंच. कुणी सांगावं आपण पुढं कोणत्या वाटेवर कशा रीतीनं घसरूं तें ? बरं झालं मी आलें तें. एकदां वाटलं होतं, कशाला जावं—मनांतलं गुपित मनांतच ठेवून द्यावं—"

"कसलं गुपित ?" मी विचारलं.

"तें आतां सांगयचं नाहीं!" ती अगदीं नाजुकपणें हंसत माझ्या डोळ्याला डोळा देऊन म्हणाली, "आतां तुम्हीं आमच्या गांवचे झालां आहां—आमच्या गांवचे नोकर झालां आहां. मी तिथली स्थायिक आहें—अर्थात् मी आमच्या गांवची एक प्रतिष्ठित नागरिक आहें. त्या अधिकाराला अनुसरून मी तुम्हाला हुकूम केला आहे. तो हुकूम नीटपणें बजावीत जा म्हणजे झालं." असं म्हणून ती जाण्याच्या तयारीनं उठून उभी राहिली.

"तुम्ही आलांत—" मी म्हटलं, "पण तुमचं कसलंच आदरातिथ्य मला करतां आलं नाहीं. चहा देईन म्हटलं तर इथं कांहीं साधन नाहीं. मी कधींच चहा घेत नाहीं—"

"तें मला माहीत आहे." ती म्हणाली, "हे असले उपचार कशाला हवेत ! मीसुद्धां अवेळीं चहा घेत नाहीं. बरं, येऊं मी ? पाठवाल ना पत्र दर आठवड्याला ?"

"हो." असं म्हणून मी नुसता हंसलों.

दारांतून बाहेर पडत असतां ती पुन्हा मागं फिरली, माझ्याकडे डोळे भरून पाहून चांगली गालभर हंसली आणि पट्कन बाहेर निघून गेली.

## फाटकी वाकळ

ही कसली नवी वावटळ ? एका रुक्ष जीवनांतून बाहेर पडून पुन्हा दुसऱ्या एका रुक्ष समजल्या गेलेल्या जीवनांत पाऊल टाकतांना ही कसली नवी वावटळ उत्पन्न झाली ? काय आहे या प्रकाराच्या मुळाशीं ?

मी भांबावून गेलों. नाहीं नाहीं ते विचार माझ्या मनांत येऊं लागले. माझ्या आयुष्यांत जी गोष्ट यापूर्वी कधीं घडली नाहीं, यापुढं कधीं घडेल अशी परिस्थिति आणि अपेक्षाही नव्हती, तसला हा विचित्र प्रसंग अचानक माझ्यावर येऊन कोसळलेला पाहून माझी स्थितप्रज्ञ वृत्ती डळमळूं लागली.

प्रकरण ३ रें

# मी खेड्यांत गेलों

मुंबई सोडायच्या पूर्वी झालेल्या या अचानक भेटीमुळं माझ्या वृत्तींत एक विलक्षण खळबळ उत्पन्न झाली. खेड्यांत जाण्याचं निश्चित केलं त्यावेळीं ज्या कोरड्या मनानं मी तो पेशा पत्करला होता तिथं एक नवा ओलावा उत्पन्न झाला.

कॉलेजच्या प्रपंचांत तिची फार प्रख्याती होती. त्या प्रख्यातीमागं कोणत्याही प्रकारचा डाग नव्हता. बुद्धिमान्, उत्साही आणि खिलाड्र म्हणून साऱ्या कॉलेजांत ती ओळखली जात असे. तिचं नांव जरी कमल होतं—तरी कसं कोण जाणे—तिला सर्वजण 'किकी' म्हणत असत. मला वाटतं, हें तिचं घरचं लाडकं नांव असावं. कदाचित हायस्कुलांत किंवा कॉलेजांतदेखील तिच्या बरोबरीच्या मुलींनीं तिला हें विचित्र नांव दिलं असण्याचा संभव होता.

किकी मला भेटायला कां आली आणि जें बोलायचं होतं तें न बोलतां कां निघून गेली याचा ज्यावेळीं मी अंदाज करूं लागलों त्यावेळीं माझं मन अनिश्चित आणि अननुभूत अशा भावनांनीं भारावून जाऊं लागलं. बोटीच्या प्रवासांत ह्या एकाच गोष्टीचा मी विचार करीत होतों.

## फाटकी वाकळ

बोटीवरून उतरल्यानंतर सर्व्हिसच्या मोटरीनं पंचवीस तीस मैलांचा प्रवास करायचा होता. ही मोटर गांवापासून साधारण मैलभर लांब अंतरावर जिथं उभी रहात असे तिथं गांवाला सीमा घालायला एक नदी आडवी आली होती. मोटरीच्या थांब्यावर माझं स्वागत करण्यासाठीं बरीच मंडळी आली होती. मी मोटरींतून उतरतांच त्यांनीं मला कसं ओळखलं याचं मला आश्चर्य वाटलं.

मी खालीं उतरलों, इकडे तिकडे पाहूं लागलों--कदाचित माझ्या आंगावर खादीचा पोषाख होता यावरून त्यांनीं अंदाज केला असेल—पण एकदम येऊन एका अगदीं बावळट दिसणाऱ्या जाडजूड गृहस्थांनीं माझ्या गळ्यांत मला मोठा हार घातला. मी घाबरल्यासारखा झालों त्यावेळीं तो म्हणाला, "आपणच रघुनाथराव ना ?—आम्ही ओळखलंच. चेहऱ्यावरूनच वाटलं आम्हांला—" माझ्या चेहऱ्यावर असा कसला ठसा त्यांना दिसला ?

माझं सामान फारसं नव्हतं. त्यांतल्याच कुणी तरी तें उचलून पाठुंगळीला घेतल्याचं पाहून मी म्हणालों, "राहूं द्या, मी घेतों तें."

"छे छे, असं कधीं झालंय !" तो गृहस्थ म्हणाला, "आतां तुम्ही आमचे गुरुजी आहांत. गुरुजींच्या सेवेला इथनंच सुरवात झाली पाहिजे."

माझ्या स्वागतासाठीं आलेल्या त्या माणसांचा मी आढावा घेऊं लागलों. बहुतेकांच्या डोक्याला रुमाल होते. अंगांत सदरे होते. कुणाच्याच अंगांत कोट नव्हता. नेसलेलीं धोतरं गुडघ्यापलीकडे गेलीं नव्हतीं. कोंकणच्या तांबड्या मातीच्या प्रभावामुळं त्याच्या कपड्यांना हुरमुजी रंग आला होता. कित्येकांचे कपडे तर अगदींच कळकट होते. असल्या पोषाखाचीं माणसं मुंबईत कधींच माझ्या नजरेला आलीं नव्हतीं, असं आठवण करून पहातांना मला वाटलं. ते जरी अगदींच पांढरपेशे नाहींत असं दिसत होतं तरीही त्यांचा दर्जा कुणब्याच्या पायरीचा असावा असंही मला वाटलं नाहीं.

सर्वांचे चेहरे मात्र अगदीं प्रसन्न होते. त्यांच्या त्या तोंडभर हंसण्यांत अंतःकरणांतल्या निर्मळपणाची छटा स्पष्ट दिसत होती.

आम्ही कांहीं पावलं चालून पुढं गेलों तोंच एक बैलाचा छकडा वाट पहात असलेला दिसून आला. बळेंबळेंच त्यांनीं मला त्या छकड्यांत बसवलं आणि छकडा चालू झाला.

स्वागतासाठीं आलेल्या मंडळीपैकीं कुणीच आंत बसला नव्हता असं पाहून मी ओरडून गाडी थांबवली.

बराच आग्रह केल्यानंतर माझ्या गळ्यांत हार घालणारे गृहस्थ मोठ्या नाराजीनं एकदांचे छकड्यांत बसले--पण बसतांनासुद्धां त्यांनीं अदब सांभाळण्याचा प्रयत्न केला होता. छकडा सुरू होतांच मी त्यांना म्हटलं, "सारी मंडळी पायीं चालावी अन् मी गाडींत बसावं हें कांहीं मला बरं वाटत नाहीं. तसं पाहिलं तर आपण सारीं वडील माणसं आहांत–"

"छे छे," तो गृहस्थ म्हणाला, "इथं वयाच्या वडिलकीचा प्रश्न नाहीं. आपल्यासारख्या विद्वान माणसांच्या शेजारीं बसायची आमची लायकी नाहीं. किती झालं तरी आम्ही उदमी माणसं. माझं दुकान आहे या निमगांवांत. तसं बरं चाललंय देवाच्या कृपेनं—" असं म्हणून त्यांनीं आपल्या दुकानाची गेल्या कांहीं वर्षांतली हकिकत सांगायला सुरवात केली.

गृहस्थ मोठा बोलका होता. हळू बोलणं त्याच्या संवयींचं नव्हतं. किंबहुना सारेच लोक तिथं फार मोठ्यानं बोलतात असं मला वाटलं. एकंदर परिस्थितीची जाणीव त्यांनीं मला मोजक्याच शब्दांत सांगितली खरी, पण त्यामुळं मी कोणत्या वातावरणांत आलों आहें याची अचुक कल्पना यायला मला कठीण गेलं नाहीं. ते म्हणाले, "मला काळजी पडली आहे ती तुमच्या जेवणाची व्यवस्था कुठं करावी म्हणून. गांवाच्या दोन्ही बाजूला ब्राह्मणवस्ती आहे खरी पण ती मैल मैल दूर आहे. स्वतंत्र ब्राह्मण ठेवून एकट्या माणसासाठीं बिन्हाड थाटणं आम्ही आंखलेल्या खर्चाच्या दृष्टीनं जरा जड जाईल, तसंच मैलभर पायपीट करीत जेवणासाठीं तुम्ही जावं हेंही आम्हांला पटायचं नाहीं—"

"त्याची काळजी नको—" मी म्हटलं, "ब्राह्मणाच्याच हातचं जेवण पाहिजे असा माझा आग्रह नाहीं."

"काय म्हणतां ?" तो गृहस्थ आ वासून म्हणाला, "हा आग्रह नाहीं ! मी वाणी आहें—संगमेश्वरी वाणी आहें. माझ्या घरचं जेवण चालेल आपल्याला ?—" मी हो म्हणत होतों असं पाहून मला थांबवून तो म्हणाला, "आम्ही स्वतंत्र व्यवस्था ठेवूं आपली—तसं सांगायचं म्हणजे आम्ही मांसमच्छर खाणारे लोक. पण आमची एक चुलती आहे, ती तसलं कांहीं खात नाहीं. तिनं जर आपल्यासाठीं स्वैंपाक केला—"

"तर चालेल मला." मी म्हटलं.

त्याच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. डोक्यावरचं केवढं तरी ओझं उतरल्यासारखं त्याला वाटलं, आणि मग मात्र तो रंगांत आला. तो म्हणाला, " हें कळलं तर दोन्ही गांवचे ब्राह्मण चिडून उठतील. तुमच्याशीं संबंध ठेवणार नाहींत. आपल्या या चळवळीपासून अजून ते दूरच राहिले आहेत म्हणा, पण हें कांहीं त्यांना पटायचं नाहीं. कधीं कुणी तुम्हांला सणा-सुदिनालासुद्धां बोलवायचा नाहीं—"

" अन् तें नकोच आहे मला." मी म्हटलं, " ज्या माणसांत वावरायचं त्यांच्या पंचक्रोशी बाहेर जायची माझीही इच्छा नाहीं."

बोलत बोलत आम्ही गांवांत येऊन पोचलों. बाकीची मंडळी आमच्या गाडीबरोबर चालली होती. एवढी मजल चालून यायला मला कांहीं कठीण गेलं नसतं. पण त्यांच्या आग्रहामुळंच ही मिरवणूक काढून घेण्याच्या संकटाला मला तोंड द्यावं लागलं.

माझ्याबरोबर गाडींतून आलेल्या गृहस्थांच्या दारांतच माझी गाडी उभी करण्यांत आली. घर बरंच मोठं होतं. पुढं मोठं आंगण असून तें सारवून स्वच्छ केलेलं होतं. त्या आंगणभर मंडप होता. मंडपांत एक मोठी बैठक घालण्यांत येऊन लोड-तक्के ठेवण्यांत आले होते. घरच्या यजमानांनीं मला हाताला धरून तक्क्याजवळ नेऊन बसवलं. तोंच एकच गर्दी करून शेकडों माणसं मंडपांत घुसलीं. सर्वांना खालीं बसवण्यांत आलं. माझ्याबरोबर येणाऱ्या त्या गृहस्थांचं नांव पांडूशेट होतं. लोक त्यांना अण्णा म्हणत. हळुच येऊन माझ्या कानाशीं लागून अण्णा म्हणाले, " एवढी मंडळी जमली आहे, त्यांना कांहीं तरी चार शब्द सांगा."

मी संकटांत पडलों. कॉलेजांतल्या वादविवाद मंडळांत मी भाग घेत असें खरा—व्याख्यानाची मला संवय होती, पण या लोकांसमोर काय बोलावं हें मला नीट ठरवतां येईना.

बोलल्याखेरीज गत्यंतरच नव्हतं. उभा राहून दहा बारा मिनिटं मी एक व्याख्यान दिलं. भाषणांत इंग्रजी शब्द न येण्याची खबरदारी घेणं मला फारच कठीण जात होतं. इतर कांहीं पारिभाषिक बोजड शब्दसुद्धां त्या लोकांना कळले नसते, त्यांना समानार्थी शब्द चट्कन् सुचून बोलणं जरी मला कठीण जात होतं तरीही कसाबसा या दिव्यांतून मी पार पडलों.

माझं भाषण संपतांच सर्वांनीं टाळ्यांचा एकच गजर केला. तो गजर माझं भाषण आवडल्यामुळं होता कीं नुसता मी बोललों म्हणून नित्याच्या सरावाला अनुसरून

त्यानीं टाळ्या पिटल्या होत्या याचा नीटसा अंदाज मला आला नाहीं. तरीही अण्णा म्हणाले, कीं भाषण मोठं सुंदर झालं. मला वाटलं, खरोखरच माझं भाषण त्यांना आवडलं असावं.

मंडळी घरोघर निघून गेली. मी, अण्णा आणि एकदोन गृहस्थ एवढेच काय ते शिल्लक राहिलों असं पाहून अण्णा म्हणाले, "माझा जीव खालीं पडला रामभाऊ. गुरुजींच्या जेवणाची मोठी काळजी होती मला—पण ते आमच्याकडेच रहाणार आहेत जेवायला."

"खरंच?" आश्चर्यचकित होऊन रामभाऊ म्हणाले, "आपली जात सांगितलीत त्यांना?"

"वा वा—" अण्णा म्हणाले, "जात कशाला चोरायची? जात सांगितली, मास-मच्छर खातों हेंही सांगितलं, आमची काकू कांहीं खात नाहीं, ती करील जेवण असंही सांगितलं—त्यानीं कबूल केलं ना! आतां पलीकडच्या मंडळींना विंचू लागतील अगदीं. बामणाला बाटवलं म्हणतील या वाण्यांनीं. आधींच ते आमचा विरोध करतात—टिळकवाले आहेत ना ते?—वाणियाचे भक्त वाणगट म्हणून म्हणतात—पण तुम्हीच सांगा रामभाऊ, काका खाडिलकर काय वाणी आहेत? त्यांचा 'नवाकाळ' काय सांगतो? तेही टिळकांचेच चेले ना? ते कसे गांधींचे शिष्य झाले? यांनाच तेवढा दिमाख काय म्हणून? आज इतकीं वर्षं आम्ही पहात आलों आहों, टिळकांना शिक्षा झाली ती काकांच्या लेखांमुळं हें काय आम्हांला माहीत नाहीं? ते काका आम्ही ओळखतों. आम्हांला इंग्रजी येत नाहीं. त्या इंग्रजी पत्रांत काय असेल तें ज्याला इंग्रजी येतं त्यानं पाहून घ्यावं. केसरींतली शिवीगाळ सुरू झाल्यापासून आम्ही तरी आतां केसरी हातीं घेत नाहीं. तरी पण नरसोपंतांनीं परवा मिठाचा सत्याग्रह केलाच कीं नाहीं? अण्णा भोपटकरसुद्धां सत्याग्रह करून तुरुंगांत गेला. आतां बाहेर आल्यावर काय म्हणायचं असेल तें म्हणो, आम्ही आपली एकच नजर ठेवली आहे—" नवाकाळ आणि केसरी या दोन पत्रांतल्या लेखांची तुलना करून अण्णा ज्यावेळीं बोलूं लागले त्यावेळीं त्यांच्या चिकित्सक बुद्धीचं मला अत्यंत कौतुक वाटलं. दुकानदार माणूस, पण अंतःकरणपूर्वक हिंदुस्तानच्या प्रचलित राजकारणाचा आपल्या मगदुराप्रमाणें अभ्यास करीत होता. टाइम्स क्रॉनिकलचा त्याला परिचय नव्हता. पण नवाकाळबद्दलची त्याची श्रद्धा मात्र असामान्य होती.

त्यावेळीं पुण्याला दुसरीं फारशीं पत्रं नव्हतीं. केसरीनं गांधींच्या राजकारणाला विरोध करायला सुरवात केली होती, तरीही मवाळ समजला जाणारा ज्ञानप्रकाश गांधींच्या

राजकारणाला प्रत्यक्ष रीतीनं कोणतींही नांवं न ठेवतां काँग्रेसच्या चळवळीची जी विपुल हकिकत देत होता त्याचा परिणाम या खेडेगांवच्या लोकांवर, केसरीचा अविश्वास उत्पन्न होण्याइतक्या प्रमाणांत, चांगलाच होत होता. एकंदरींत त्या गांवचं वातावरण मला मोठं उत्साही वाटलं.

मुंबईतल्या खाणावळींत जेवतांना पंक्तिप्रपंचाची भावना कधींच मनांत आली नव्हती. इथं माझा पाट मानाच्या जागीं पण जरा बाजूला ठेवल्यामुळं मला संकोच वाटला. अण्णा आणि त्यांचे दोन मित्र पंक्तीला होते—पंक्तीला एकाच वेळीं जेवायला होते. जेवणांत भेदाभेद केला नव्हता, तरीही माझा पाट बाजूला ठेवल्यामुळं मी थोडासा अस्वस्थ झालों. उद्यांपासून ही पद्धत बदलायची असं मी मनाशीं ठरवून टाकलं.

दुपारीं थोडीशी वामकुक्षी केल्यानंतर पुढं काय करायचं याचे बेत ठरवीत आम्ही बसलों होतों. मला सुद्धां चांगलीशी कल्पना नव्हती. राष्ट्रीय शिक्षणाची एकादी शाळा चालवायची, हा कार्यक्रमांतला जरी एक भाग असला तरी या खेडेगांवांतल्या लोकांचीं मनं प्रस्तुतच्या राजकारणांत चढावाचं धोरण घ्यायला तयार होण्याजोगा कांहीं तरी नवा कार्यक्रम आंखणं आवश्यक आहे असं त्या चर्चेंतून निघालं.

आम्ही बोलत असतां एक पोक्त गृहस्थ तिथं आले. मुद्रेवरून ते ब्राह्मण असावे असं वाटलं. रुमाल, उपरणं, अंगांत कोट वगैरे मला साधारणपणें अपरिचित असलेला असा. जरी त्यांचा पोषाख होता तरीही त्या पोषाखावर कोकणच्या मातीच्या हुरमुजी रंगाची छटा मुळींच दिसत नसल्यामुळं ते पांढरपेशे ब्राह्मण असावे असा मी अंदाज केला.

ते येतांच सारी मंडळी उठून अदबीनं उभी राहिली, त्यावरून गांवांतलं हें मोठं बडं प्रस्थ असावं असा मी तर्क केला. मीही उठून उभा राहूं लागलों तेव्हां मला आग्रहानं खालीं बसवून ते हक्काच्या जाणीवेनं ऐसपैस तक्क्याला टेकून बसले आणि खिशांतली चंची बाहेर काढून सुपारी कातरीत त्यांनीं बोलायला सुरवात केली. वडीलकीबरोबरच प्रतिष्ठितपणाचा स्वाभाविक आव आणण्याची वृत्ती त्यांच्या ठायीं भरपूर असावी असं मला वाटलं. मोठीं माणसं लहानाला ज्या नजरेनं पहातात त्या नजरेनं माझ्याकडे पहात ते म्हणाले, " हे आपले नवे मास्तर वाटतं ? "

" मास्तर नव्हे—" अण्णा म्हणाले, " गुरुजी ! "

त्यांच्या उद्धाराकडे काणाडोळा करून ते म्हणाले, " यंदाच बी. ए. झालांत वाटतं ? कोणत्या कॉलेजांत होतां—" मी माझ्या कॉलेजचं नांव सांगितलं तेव्हां ते म्हणाले, " असं का ? आमची कमासुद्धां त्यांच कॉलेजांत असते, तुम्हाला माहीत असेलच ती--"

एकूण हे किकीचे वडील तर ! मी म्हटलं, " तसा काहीं प्रत्यक्ष परिचय नाहीं, पण मी पाहिलंय त्यांना. फार हुषार विद्यार्थिनी आहे ती. "

आपल्याशींच हसून ते म्हणाले, " आम्हीसुद्धां होतों एका काळीं कॉलेजांत–प्रीव्हियस झाल्यावर सोडून दिलं कॉलेज. म्हटलं जें आम्हांला मिळालं नाहीं तें आमच्या मुलांनीं तरी मिळवावं. मोठ्यात मोठी ही मुलगी, तेव्हां पाठवली तिला कॉलेजांत. बाकी पोरीच्या जातीला बी. ए. होऊन काय करायचंय म्हणा ! बरं—आतां काय करणार आहांत तुम्ही पुढं ? रहायची काय व्यवस्था झालीय ? "

अण्णांच्या कपाळाला आठ्या पडल्या. बळेंच हसून ते म्हणाले, " ती सारी व्यवस्था ठाकठीक झालीय बाबीकाका."

" जेवायची काय व्यवस्था केलीय ?"

" आमच्याचकडे रहाणार आहेत जेवायला."

बाबीकाकांनीं माझ्याकडे रोखून पाहिलं; पुन्हा एकदां अण्णाकडे नजर टाकली आणि पुन्हा माझ्याकडे वळून ते म्हणाले, " आपलं आडनांव मराठे ना ?" मी होकार दिला तेव्हां ते म्हणाले, " म्हणजे ब्राह्मण नव्हे का तुम्ही ? "

" मी जात मानीत नाहीं. " मी ठांसून म्हणालों, " शुद्ध आणि स्वच्छ अन्न कुठंही मिळालं तरी मला चालतं. "

" म्हणजे म्हाराकडेसुद्धां ?" बाबीकाकांनीं विचारलं.

" हो. महाराकडे--चांभाराकडे—धेडाकडे—मुसलमानाकडेसुद्धां ! " मी अत्यंत गंभीरपणानं म्हटलं.

बाबीकाका थक्क झाले, " हेंच शिकवणार का तुम्ही आमच्या मुलांना ?"

" हो ! " मी म्हटलं.

" मग आमचीं मुलं तुमच्या शाळेंत यायचीं नाहींत. "

मी नुसता हसलों. बाबीकाका कपाळाला आठ्या घालून बराच वेळ स्वस्थ बसून राहिले. अण्णा आपल्या दुसऱ्या दोघां मित्रांकडे पहात गालांतल्या गालांत हसत होते.

" माझा वर्गणीचा आंकडा रद्द करा ! " बाबीकाका म्हणाले, " असले भ्रष्टाकार मला पसंत नाहींत—आमच्यापैकीं कुणालाच ते पसंत पडणार नाहींत. दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणांच्या वर्गण्या रद्द झाल्या आहेत म्हणून धरून चाला. समजलं ? येतों मी." असं म्हणून ते एकदम उठून चालते झाले. अण्णानींही त्यांना बसवून घ्यायचा आग्रह केला नाहीं. फारशी चर्चा न होता थोडक्यांतच या विषयाचा निकाल लागल्याचं पाहून मला समाधान वाटलं.

" असं आहे हें ! " अण्णा म्हणाले, " मला पूर्वींच अंदाज होता. तसं पाहिलं तर आम्हीसुद्धां जुन्या काळचींच माणसं आहोंत, आम्हांलासुद्धां कांहीं कांहीं गोष्टी पटत नाहींत; पण माणसांना एकदम तोडून टाकणं या लोकांना जसं साधतं तसं आम्हांला साधत नाहीं. मला वाटतं उद्यां परवां एकादा व्याख्यानाचा कार्यक्रम ठेवून आपल्या कल्पना सर्वांच्या समोर मांडा. त्यांतल्यात्यांत जरा मर्यादा ठेवूनच काय सांगायचं तें सांगितलं पाहिजे. ही वितुष्टाला सुरवात झाली आहे, म्हणून म्हारा-चांभारांच्या बाबतींत बोलतांना फारशी पुढली मजल गांठायचं बोलूं नका. व्याख्यानांत बेताबेतानंच पाऊल पुढं टाकलं पाहिजे. हेमगर्भाची मात्रा एकदम पचायची नाहीं या लोकांना."

त्या दिवशीं गांवांतल्या बहुतेक भंडारी, मराठे, आणि इतर मंडळींतील मुख्य मुख्य माणसांचा अण्णांनीं माझ्याशीं परिचय करून दिला.

कांट्यानं खचलेल्या मार्गावर मी पाऊल टाकतों आहें असं मला वाटलं.

प्रकरण ४ थें

# मी पसारा थाटला

व्याख्यानाला खूप गर्दी जमली होती. एवढ्या जनसमुदायापुढं व्याख्यान द्यायचा माझा हा पहिलाच प्रसंग होता. गेल्या दोन दिवसांत गांवच्या लोकांच्या मनोवृत्तीचा मी जो अंदाज घेतला होता त्याला अनुसरूनच बोलायचं असं मी ठरवलं होतं. आपल्या कल्पना कितीही मोठ्या मजला मारीत असल्या तरी त्यांना लगाम घालून खेड्याच्या छोट्या दृष्टीला पटेल अशी मर्यादा राखून मी बोलूं लागलों.

बाबीकाका जोशी यांनीं माझ्याबद्दल तितक्यांत बऱ्याच कंड्या पिकवलेल्या असल्यामुळं पहिल्यानं सारे लोक साशंक होते. म्हणूनच मी बोलत असतांना माझ्या शक्तीपलिकडेही संयम राखीत होतों. मद्यपाननिषेध आणि अस्पृश्यतानिवारण या दोन विषयांचा उल्लेख करतांना तर मला फारच कठीण गेलं. गांवांतील बरेचसे लोक भंडारी होते. माडी आणि दारू विकणं हा त्यांचा धंदा होता. तसंच अस्पृश्यतानिवारणाबद्दल जर मी जास्त बोलूं लागलों असतों तर कुळवाडी लोकसुद्धां माझ्यावर बिथरले असते इतकी तयारी बाबीकाकांनीं करून ठेवली होती. म्हणून त्या विषयाचा नुसता उल्लेख करूनच मी त्या दिवशींचं व्याख्यान संपविलं.

हिंदु मुसलमानांच्या एकीचा प्रश्न काढणं तर तिथं फारच कठीण गेलं असतं. या भागांत धर्मद्वेषाची मजल माथेफिरूपणापर्यंत गेली नव्हती. पण 'एकी' या शब्दाचा विपर्यस्त अर्थ करून बाबीकाकांनीं जो डागोरा पिटला होता त्यामुळं या विषयाचा मी नुसता उल्लेख केला असता तरीही श्रोत्यांचा गैरसमज झाला असता.

तसं पाहिलं तर हा विषय माझ्या अत्यंत आवडीचा होता. प्रचाराचं कार्य हातीं घेतलं म्हणजे आवडीनिवडी बाजूला ठेवून परिणामकारकतेकडेच कसं लक्ष द्यावं लागतं, याची कल्पना मला त्या दिवशीं आली.

आपण अमुक अमुक सुधारणा करूं, एकदम क्रांती घडवून दाखवूं, सारी उलटापालट करून टाकूं असं कल्पनेचे खेळ खेळतांना आपल्याला वाटत असतं. पण प्रत्यक्षाशीं गांठ पडतांच त्या साऱ्या उड्या ठेंगण्या पडतात असा अनुभव येतो.

माझ्या व्याख्यानाचा परिणाम चांगला झाला. बाबीकाकांनीं पसरलेल्या बातम्यांचं निराकरण माझ्या भाषणांत मी अगदीं नाजुक पद्धतीनं केल्यामुळं श्रोत्यांचं बरंच समाधान झालं, असं अण्णांनीं मला सांगितलं. माझा आत्मविश्वासही त्यामुळं चांगलाच वाढला.

कोणत्याही चळवळींत आजवर मी प्रत्यक्ष भाग घेतला नव्हता. त्या चळवळीकडे दुरून पहात असतांना हेंच काम मला एकाद्या दिवशीं करावं लागेल असं मला वाटलं नव्हतं. पण एकदम तें जोखीम आंगावर पडल्याबरोबर प्रत्येक गोष्ट मी सावधगिरीनं करूं लागलों.

थोड्याच दिवसांत इंग्रजी शाळेची सुरवात झाली. इंग्रजीचं प्राथमिक शिक्षण देण्याचं काम मला पहिल्यानं फारच कठीण गेलं. मुंबईला मी शिक्षकाची नोकरी पत्करली असती तर असल्या विद्यार्थ्यांना शिकवण्याची पाळी माझ्यावर आली नसती. या अनपेक्षित जबाबदारीमुळं माझ्या शिक्षकधर्माची चांगलीच कसोटी लागली. इंग्रजी शिक्षणाबरोबरच मराठी शिक्षणाकडेही मला लक्ष द्यावं लागत होतं. शिक्षणक्रम सरकारी नियमाप्रमाणें ठेवण्याबद्दल गांवच्या लोकांचा आग्रह होता. मला जेवढं शिकवतां येईल तेवढं शिक्षण झाल्यावर ज्या विद्यार्थ्यांना अनुकूलता असेल त्यांना जिल्ह्याच्या हायस्कुलांत जातां यावं अशा रीतीनंच शिक्षणक्रम ठेवणं अवश्य होतं. पूर्वींच्या एका काळांत राष्ट्रीय शिक्षणाचा आग्रह धरून केलेल्या योजना निष्फळ झाल्यामुळं असं करणं अवश्य होतं असं मलाही वाटलं.

माझ्या या शाळेंत पहिल्यानं दोन्ही बाजूंच्या ब्राह्मण वस्तींतील मुलं येत नव्हतीं. ब्राह्मणेतरांचीं मुलं इंग्रजी शिकूं लागलीं आणि आपलीं मुलं तेवढीं बाहेरगांवीं पाठवावीं

लागणार—यापेक्षां इतर गोष्टींकडे लक्ष न देतां ब्राह्मणांचीं मुलंही माझ्या शाळेंत यावीं असं पुष्कळ ब्राह्मण पालकांना वाटूं लागलं. त्यांच्या टोचणीमुळं एके दिवशीं बाबीकाका जोशी मला भेटायला आले.

पहिल्या भेटीनंतर त्यांनीं केव्हांच माझी भेट घेतली नव्हती. रस्त्यांत कधीं गांठ पडली तर मी जेव्हां त्यांना नमस्कार करीत असें तेव्हां तेही कठोर मुद्रेनं माझ्याकडे पहात नुसते हात वर केल्यासारखं करीत असत. आज भेटायला येतांना त्यांचा चेहरा हंसतमुख आहे असं पाहून मला कौतुक वाटलं. सुरवातीलाच ते म्हणाले, "असं पहा रघुनाथराव, आतां तुम्ही इथं आलांच आहात—इथं रहाणार हे ठरलंच आहे. तुमची शाळाही चालेल असं दिसतं आहे; तेव्हां आतां तुम्ही या वाण्याच्या घरींच रहायचा आग्रह कां धरतां ? आमच्या तिकडेच या ना कां रहायला ? थोडं लांब यायला पडेल यांत शंका नाहीं; पण आम्हीही येतोंच कीं नाही ? तसा तुम्हाला त्रास होत असेल तर शाळेसाठीं आमच्या तिकडेच जागा द्यायचीही माझी तयारी आहे."

अण्णा त्या वेळीं तिथं नव्हते. मी एकटाच आहे अशी संधी पाहून मुद्दामच बाबीकाका त्या वेळीं आले असावे म्हणून मी म्हटलं, "तें कांही माझ्या हातीं नाहीं. ज्यांनीं मला इथं आणलं आहे ते जसं ठरवतील तसा मी चालणार."

मोठ्यानं हसून बाबीकाका म्हणाले, "तुम्हांला इथं आणण्यांत आम्हीही होतोंच कीं. आज घडीभर आम्ही दूर झालेलों असलों तरी मिळतं घ्यायला केव्हांही आमची तयारी आहे. तसं पाहिलं तर या मुलांना शिकवणं तुम्हांला फार कठीण जाईल. बुद्धीच्या दृष्टीनं ब्राह्मणांत आणि शूद्रांत फरक असणारच—"

"मला त्याच गोष्टीचं महत्त्व वाटतं. ज्यांना शिक्षणाचा संस्कार नाहीं त्यांनाच शिकवण्यांत माझी कसोटी आहे. मी कांहीं भाडोत्री मास्तर म्हणून इथं आलों नाहीं. हें माझं एक व्रत आहे. सेवाधर्माचं हें जें व्रत मी पत्करलं आहे त्याला अनुसरून ब्राह्मणापेक्षां शूद्राकडेच मला जास्त लक्ष दिलं पाहिजे."

"बरं बरं !" बाबीकाका सुपारी कातरीत म्हणाले, "पण इथं वाण्याच्या घरीं जेवायला रहाणं—"

" मी जात मानीत नाहीं ! " मी मधेंच म्हणालों, " पूर्वीच तुम्हाला मी तसं सांगितलं होतं. हीं माणसं माझी फार चांगली व्यवस्था ठेवतात. अगदीं स्वतंत्र व्यवस्था केली आहे त्यांनीं माझ्यासाठीं. तक्रारीला जर जागा नाहीं तर मी काय म्हणून दुसरीकडे जाऊं ? "

" मला कांहीं हें पटत नाहीं. " बाबीकाका म्हणाले, " ब्राह्मणांचीं घरं असतांना एक ब्राह्मण शूद्राच्या घरीं जेवायला रहातो आहे, आणि तोच आपच्या मुलांना शिकवतो आहे—तुमचं पाहून उद्यां आमचीं मुलंसुद्धां शूद्राच्या घरीं जेऊं लागतील. "

" शक्य आहे. " मी शांतपणें म्हणालों, " पण तसं होईलच असं मला वाटत नाहीं. माझ्या शिस्तीपेक्षां घरची शिस्तच मुलांना जास्त पाळावी लागणार. तें तुमचं तुम्ही पाहून घ्या. या कामीं मी स्वतः कसलाच पुढाकार घेणार नाहीं—" एक क्षणभर थांबून मी म्हटलं, " केव्हां येणार आहेत आपली मुलं इकडे ? "

" ही एक अट आहे—" बाबीकाका हलुच हसून म्हणाले, " तसं आपण कांहीं मनांत आणायचं नाहीं. पण आम्हां लोकांच्या समजुतीसाठीं आपण एवढी एक कबुली द्या, कीं मुलांना असला भ्रष्टकार शिकवायचा नाहीं—"

" भ्रष्टाकार म्हणजे काय ? "

" भ्रष्टाकार म्हणजे एवढाच—कीं हे खाण्यापिण्याचे निर्बंध—शिवाशिवीचे निर्बंध—"

" थांबा. " मी गंभीर होऊन म्हटलं, " शिवाशिवीच्या निर्बंधाच्या बाबतींत मला आपल्याला वचन देतां येत नाही. शिवाशिवीचे निर्बंध नाहींसे करण्यासाठीच मी हें व्रत पत्करलं आहे. तसं पाहिलं तर ज्यांना आपण शूद्र म्हणतां तींही माणसं या बाबतींत ब्राह्मणांइतकीच कडवीं होतीं. पण मी त्यांना समजावून सांगितलं तेव्हांपासून चांभाराचीं मुलं शाळेंत घ्यायला त्यांनीं कबुली दिली त्यांचा माझ्यावर विश्वास आहे, हें त्यांनीं प्रत्यक्ष माझ्या विनंतीला मान देऊन दाखवलं. इथं मी पंक्तिप्रपंच करणार नाहीं. ब्राह्मण, शूद्र, अतिशूद्र हा भेदाभेद माझ्या शाळेंत राहणार नाहीं; मग आपण आपलीं मुलं या शाळेंत पाठवलीं नाहींत तरी मला वाईट वाटायचं नाहीं. कुणाच्याही प्रामाणिक समजुतीवर मला आघात करायचा नाहीं. प्रत्येकाचं मन वळवायचा मी प्रयत्न करीन, पण सक्ती कुणावरही करणार नाहीं. आपल्याला पटत नसेल तर आपण मला विसरून जा. "

निश्चयपूर्वक वाणीनं सांगितलेला माझा निर्धार ऐकून बाबीकाका स्तब्ध बसले. तितक्यांत अण्णा तिथं आले. उभयतांची 'हस्तिदंती' झाल्यावर पुनः विषयाला सुरवात झाली तेव्हां अण्णा म्हणाले, "गुरुजी म्हणतात तें आम्हांला पटलंय. सारं जगच तसं बोलतंय तिथं आतां किती दिवस आपण दूर रहाणार ? पहिल्यापहिल्यानं मला दिखील कठीण गेलं होतं. आमचीं घरचीं माणसं कपडे काढून ठेवून मुलाना घरांत घेत होतीं. पण आतां त्याचं कांहींच वाटत नाहीं कुणाला. अन् ही सर्वांची समजूत घातली आमच्या काकूंनीं. ब्राह्मण येऊन आमच्या घरीं जेवतो, आमच्याशीं परकीपणा बाळगीत नाहीं, मग आम्ही तरी आमच्या खालचे म्हणून ज्यांना समजतों त्यांना काय म्हणून दूर ठेवावं, असं जेव्हां आमची काकू म्हणूं लागली तेव्हां सर्वांनींच तिचं म्हणणं मान्य केलं—"

अण्णा बोलत असतांना बाबीकाकांच्या चेहऱ्यावर संतापाची छटा उमटलेली स्पष्ट दिसत होती. त्यांचा नाइलाज झाला होता. आपल्या मुलांना इंग्रजी आलं नाहीं तर शूद्रांचीं मुलं आपल्या मुलांवर मात करतील असं बाकीच्या ब्राह्मण मंडळींना वाटूं लागल्यामुळंच त्यांनीं बाबीकाकांना शिष्टाईसाठीं पाठवलं होतं. कांहींना कांहीं तरी करून आपलीं मुलं या नव्या शाळेंत घालणं त्यांना भाग होतं. पण त्या शाळेंत चांभारांचीं मुलं बसत असल्यामुळं ब्राह्मणांचा त्याला विरोध होता. बाबीकाकांनीं तोड काढायचं ठरवलं आणि म्हटलं, " बरं बरं, तें राहूं दे. आमचं एवढंच म्हणणं आहे, कीं चांभाराच्या मुलांना तेवढं तुम्ही बाजूला बसवावं. साऱ्या मुलांत मिसळूं देऊं नये—"

" तें होणं नाहीं ! " मी निर्धारपूर्वक म्हणालों आणि स्वस्थ राहिलों.

" बरं तर, " बाबीकाका म्हणाले, " या बाबतींत आमच्या मंडळीचा विचार घेऊन एकदोन दिवसांत मी तुम्हांला कळवतों. " जशी कांहीं मीच त्यांच्याकडे मागणी केली होती असा आव आणून ते म्हणाले.

बाबीकाका निघून गेल्यावर या बाबतींत अण्णांची आणि माझी बरीच चर्चा झाली. कुणाला कोणत्याच प्रकारची सवलत द्यायची नाहीं असा अण्णांचा निर्धार होता. त्या निर्धाराच्या मुळाशीं जातिभेदाचा प्रश्न नव्हता—तत्त्वनिष्ठेमुळंच अण्णा तसं म्हणत होते. त्यांचा एवढा पाठिंबा मिळाल्यावर मलाही बराच धीर आला.

एक आठवडा गेला तरी बाबीकाका कांहीं पुनः भेटायला आले नाहींत कीं ब्राह्मणांच्या मुलांनीं आमच्या शाळेंत यायला सुरवात केली नाहीं. तें प्रकरण तहकूब राहिलं असंच

मी समजत होतों. दोन्हीही बाजूंच्या ब्राह्मणमंडळींत जोराची खळबळ सुरू झाली होती एवढं मात्र मला कळलं. कांहीं तरी पर्याय काढून मुलांना शाळेंत पाठवलंच पाहिजे असं म्हणणारांची संख्या दिवसेंदिवस वाढत होती. या शाळेसाठीं जी वर्गणी देण्याचं ब्राह्मणमंडळींनीं कबूल केलं होतं त्या बाबतीत त्यांनीं पहिल्यानंच माघार घेतल्यामुळं खर्चाचा बोजा उदमी मंडळीवर पडत होता. बिनतक्रार तो बोजा ते सहन करीत होते. ब्राह्मणमंडळी सामील झाली असती तर हा भार कमी झाला असता, इतकंच नव्हे तर आणखी एकादा शिक्षक आणायची व्यवस्था करतां आली असती.

कोणत्याही प्रकारें माघार घ्यायची नाहीं असा अण्णा आणि त्यांचे इतर सहकारी यांचा आग्रह होता. अण्णांच्या या सहकाऱ्यांत धोंडशेट या नांवाचे एक भंडारी गृहस्थ होते. वास्तविक भंडाऱ्यांना कुणी शेट म्हणत नाहीं; पण हे गृहस्थ दुकानदार असल्यामुळं इतर व्यापाऱ्यांबरोबर त्यांचाही तसाच उल्लेख केला जाई. हे गृहस्थ आर्यसमाजी होते—दयानंदांचे मोठे भक्त होते. पूर्ववयांत त्यानीं बरींच वर्षं मुंबईत काढलीं होतीं. तिथंच त्यांनीं आर्यसमाजाची दीक्षा घेतली होती. वेदांचा अभ्यास करून आपलीं सर्व नित्यकर्मं ते वैदिक पद्धतीनं करीत असत. दररोज घरीं होमहवन करण्याबद्दल गांवांत त्यांची थट्टा होत असे; पण थट्टेला निर्भयपणानं तोंड देऊन त्यांनीं आपला बाणा निश्चयानं चालवला होता. अस्पृश्यतानिवारणाच्या कामीं मला सर्वांत मोठा पाठिंबा त्यांचाच होता. अस्पृश्यांचीं मुलं आपल्या घरीं आणून त्याना पंक्तीला घेऊन ते जेवीत असत, म्हणून त्यांच्या जातीच्या मंडळींनींसुद्धां त्याच्यावर बहिष्कार घातला होता; तरीही त्यांनीं कुणाची पर्वा केली नाहीं. फारसं शिक्षण न मिळालेल्या आणि समाजाच्या दृष्टीनं खालच्या वर्गांतील समजले जाणाऱ्या या गृहस्थाची तत्त्वनिष्ठा पाहून मला त्याच्याबद्दल फार आदर वाटे. बाबीकाकांच्या विरोधाला तोंड द्यायला अण्णापेक्षांही मला धोंडशेटचाच पाठिंबा जास्त सहाय्यभूत झाला होता.

नदीपलीकडील ब्राह्मण मंडळींतील चार पांच मुलं शाळेंत येऊं लागलीं. त्यांचे वडील बहुतेक मुंबईवाले होते. हळु हळु या मंडळींतला विरोध नाहींसा होईल असं आम्हां सर्वांना वाटूं लागलं. बाबीकाका आणि त्यांच्या आवाठांतील मंडळी मात्र अजून विरोध करीत होती.

तें नीरस जीवन पहिल्या सुरवातीला जरी मला जाणवलं होतं तरीही हळुहळु या नव्या आयुष्यांत मला गोडी लागूं लागली. गांवच्या लोकांत मी जसजसा मिसळूं लागलों,

त्यांच्या सुखदु:खाशीं समरस होऊं लागलों, तसतसा व्यापक स्वरूपांतील कौटुंबिकतेचा तो सक्तीचा आभास वास्तवांत रूपांतरित होऊं लागला. एका पक्षाच्या विरोधामुळं दुसऱ्या पक्षाबद्दलचा सुहृद्भाव वृद्धिंगत होऊं लागला. एका काळीं मी मुंबईचा होतों, आज या परक्या लोकांत परक्या वातावरणांत येऊन राहिलों आहे याची मला हळुहळु विस्मृति होऊं लागली. उच्च शिक्षणानं उत्पन्न झालेली उच्चवर्गीयत्वाची कल्पना मावळत जाऊन जसजसा मी त्या खेडेगांवच्या साम्राज्यांत मिसळूं लागलों तसतसा अपरिचित असलेला तो खेडवळपणा माझ्याही आगीं बाणूं लागला.

मी सर्वांत सारखाच मिसळत असें. त्यांच्या व्यवहारांत वेळीं प्रसंगीं सल्लामसलत देण्याचं कामही करीत असें. निर्मळपणाची एकच अट असल्याचं माहीत झाल्यावरून ती अट पाळून प्रत्येकजण मला ज्या ज्या वेळी जेवायला बोलवीत असे त्या त्या वेळीं मीही त्याचं आमंत्रण स्वीकारीत असें, यामुळं सर्वांचीच माझ्याबद्दल आपुलकीची भावना उत्पन्न झाली होती.

नित्याप्रमाणें एके दिवशीं मी नदीकाठीं जाऊन बसलों होतों. या नदीचं पात्र कांहीं ठिकाणीं अगदींच चिंचोळं असून बऱ्याच पलीकडे एक मोठा डोह होता. त्या डोहाच्या कांठावर असलेल्या खडकावर जाऊन मी ज्या वेळीं बसत असें त्या वेळीं गांवच्या मंडळींपैकीं कुणीही त्या बाजूला फिरकत नसे. माझं बरंचसं वाचन त्या खडकावर बसून होत असे. दुरून कित्येकजण मोठ्या भाविकपणानं या वेळीं माझ्याकडे कौतुकानं पहात असत. सायंकाळचे ते थोडेसे क्षण माझ्या एकांताचे आहेत, पवित्रतेचे आहेत असं मी जरी कुणाला प्रत्यक्ष सांगितलं नव्हतं, त्या एकांताचं अवडंबर घालण्याचा जरी मी कधीं प्रयत्न केला नव्हता तरी त्या वेळीं मला उपसर्ग होऊं नये म्हणून गांवचे लोक आपल्या मुलाबाळाना सुद्धां तिकडे न जाण्याबद्दल बजावीत असत, आणि गांवांतलीं उनाड मुलं सुद्धां ती आज्ञा निष्ठेनं पाळीत असत.

एके दिवशीं मी बसलों असतां पुस्तक बाजूला ठेवून मुंबईच्या आठवणी नजरेसमोर आणीत होतों. त्या जुन्या आठवणींत कोणत्याच प्रकारची रमणीयता नव्हती. माझं सारंच जीवन एक प्रकारें रुक्षपणांत गेलं होतं. त्या अखंड रुक्षपणाला रमणीयत्वाचा चटका द्यायचा जो प्रसंग मी मुंबई सोडण्याच्या पूर्वी आला होता त्याची मला आठवण झाली. त्या दिवशीं मला भेटायला किकी कां आली याचा मी विचार करूं लागलों. तें कोडं मला

उलगडेना असं मी म्हटलं असतं पण तिच्या भाषणाची ज्या वेळीं आठवण झाली त्या वेळीं कोणत्या तरी अस्फुट अशा काव्यात्मकतेचा अंधुक प्रकाश त्या प्रसंगाच्या पाठीशीं असावा असं मला वाटूं लागलं.

त्या वेळीं झालेल्या त्या संवादाची मी शब्दशः आठवण करूं लागलों, तेव्हां तिचा प्रत्येक शब्द हृदयावर खोदून टाकल्याप्रमाणें मला अक्षरशः आठवत आहे असं पाहून माझं मलाच आश्चर्य वाटलं.

तोंच माझ्या कानीं शब्द आला, "तपश्चर्या चाललीय वाटतं?"

मागं वळून पहातों तों—किकी माझ्यासमोर उभी होती!

प्रकरण ५ वें

# किकी गांवीं आली

निमगांवच्या प्रपंचांत मी इतका गुंगून गेलों होतों, कीं कॉलेजला सुट्टी यावेळीं व्हायची हें माझ्या ध्यानी सुद्धां नव्हतं. मुंबईहून दूर गेल्यावर माणसाच्या दृष्टीत कोणत्या प्रकारचा फरक होतो याची कल्पना मला त्या क्षणाला झाली.

किकी शेजारच्या एका खडकावर येऊन बसली. तोंपर्यंत मी कांहींच बोललों नव्हतों. एकदा मागंपुढं पाहून ती म्हणाली, " असं पहा रघुनाथराव, पहिली सूचना ही द्यायची, कीं तें माझं मुंबईचं नांव इथं काढायचं नाहीं—इथं किकी म्हणायचं नाहीं—इथं आलं कीं सारंच वातावरण बदलतं—सारा मोकळेपणा नाहीसा होतो—तुरुंगांत पडल्यासारखं वाटतं मला. आता ही मी इथं आलें आहें पण उद्यां येता येईल कीं नाहीं याची खात्री नाही. तुम्हांला काय वाटलं इथं आल्यावर ? "

" इथं मी विश्रांतीसाठीं आलों नाहीं–" मी म्हटलं, " किंवा चैनीसाठीही आलों नाहीं. कोणतीही कामगिरी करण्यासाठीं माणूस आला, कीं त्यानं परिस्थितीच्या बंधनाकडे दुर्लक्ष केलं पाहिजे—मी तर मुंबई विसरून गेलोंय—"

" मला वाटलंच तसं. " किकी म्हणाली," नाहींतर या वेळीं मी यायची त्याचा अंदाज हवा होता तुम्हांला. केवढे दचकलांत मला बघून ! "

तसं झालं होतं खरं. माझ्या मनांत चाललेल्या विचारांना तिच्या येण्यानं धक्का बसला होता. मी म्हटलं, " इथं तुम्ही आल्यावर काय कळलं ? "

" कशाबद्दल ? "

" इथल्या आमच्या कामाबद्दल "

" अजून तितकंसं कांहीं कळलं नाहीं, पण एकंदरीत तुम्हीं चांगलीच अप्रियता संपादन केली आहे यांत शंका नाहीं. "

" कुठं ? "

" या गांवांत. "

" या गांवाच्या मर्यादा काय ? हा गांव म्हणजे कांहीं नुसती ब्राह्मणवस्ती नव्हे. खरं पाहिलं तर ब्राह्मणवस्ती या गांवापासून दोन्हीबाजूला इतकी दूर आहे, कीं इतर गावच्या तुलनेनं ते दोन्हीही म्हारवाडे ठरतील— "

' खरं आहे, खरं आहे, ' म्हणत किकी एकदम हंसत सुटली. हंसतां हंसतां एकदम थांबून ती म्हणाली, " अगदीं बरोबर आहे तुमचं निदान, म्हारवाडेच आहेत हे. स्वतः कुणाला शिवत नाहींत, दुसऱ्याला शिवूं देत नाहींत, सावली सुद्धां पडूं देत नाहींत नव्या विचाराची. अगदीं कोंडल्यासारखं होतं इथं मला. सुट्टी पडली तरी येऊं नये इकडे असं प्रत्येक वेळीं वाटतं—पण बाबांचा हुकूम आहे ना ?— " एकदां पदरानं तोंड पुसून पुन्हा मागंपुढं नजर टाकीत ती म्हणाली, " या खेपेला थोडं बंड करायचं आलंय माझ्या मनांत. तुमच्या त्या शाळेकडे मधूनमधून येणार आहें मी— "

" मधुनमधून कां—रोजच येत जा ना ! "

" रोजसुद्धां येईन, पण आधीं रोज येतां नये. आमच्या तिकडे तुम्हाला बहिष्कार आहे. इकडल्या वाडींतल्या मंडळींनीं आपलीं मुलं पाठवायला सुरवात केली तुमच्या शाळेंत, म्हणून त्यांनासुद्धां बहिष्कार घालायचा विचार चालला आहे—"

" केव्हां आलांत तुम्ही ? " मी विषयान्तर करण्यासाठीं विचारलं. किकीला पहातांच मला मुंबईची आठवण झाली होती. तिकडली हकिकत विचारावंसं वाटत होतं. पण कुणाची

हकिकत विचारायची? जिव्हाळ्याचं असं मुंबईत आतां कुणीच नव्हतं. मी म्हटलं, "मुंबईची काय खबर?"

"चार दिवस झाले मला येऊन—" किकी म्हणाली, "आल्यापासून यावं म्हणून म्हणतेंय पण जेलरसाहेब बाहेर जाऊं देईनात. आज आलें आहें ती सुद्धां बिगरपरवान्यानं. याचे परिणाम काय होतात ते आधीं पहायचे आहेत—" पुन्हा एकदां मागं वळून पाहून ती म्हणाली, "मुंबईची हकिकत होय? तें सुद्धां अपंच. ट्रॅम सुरू आहे, आगगाड्या जाताहेत, मोटारी धावताहेत, कॉलेजं शाळा सुरू आहेत, बंद होत आहेत—रजा मिळते आहे—अन् आता रजा संपणार आहे!" असं म्हणून ती पुन्हा मोठमोठ्यानं हंसली.

"मुंबईची आठवण इतकी का हास्यास्पद झाली आहे?" मी गंभीरपणाचा खोटाच आव आणून विचारलं.

"आमच्या इकडच्या दृष्टीनं मुंबई हास्यास्पदच आहे." किकी खरोखरच गंभीर होऊन म्हणाली, "सुट्टींत घरीं आऊं की हेंच जाणवतं. मोकळेपणाची संवय लागते मुंबईत अन् मग इथं आलं की ही सारीं बंधनं होतात सुरू. रोज एकच ऐकावं लागतं, मुंबईत गेल्यानं माणूस कसं बिघडतं. केव्हा केव्हां असं वाटतं, कीं आता मुंबईत पाठवूंच नका असं म्हणावं—"

"इतकं छळतात?"

एक क्षणभर थांबून खिन्नपणानं हसून ती म्हणाली, "तो अनुभवच घ्यायला हवा. कसं जंगलात आल्यासारखं वाटतं इथं आल्यावर. तुम्हाला नाहीं तसं वाटलं?"

"परिस्थितीचा परिणाम मनावर होऊं द्यायचा नाहीं असा निश्चय करूनच मी इथं आलोंय. आनंदाची गोष्ट एवढीच आहे, कीं मी ज्या वस्तींत आहें त्या वस्तींत बुद्धीचा अभिमान असणारीं माणसं फारशीं नाहींत. म्हणजे तीं माणसं निर्बुद्ध आहेत असं नव्हे—तर तीं बुद्धीपेक्षां भावनेकडे जास्त लक्ष देतात—भावनेच्या डोळ्यांनीं पहातांना बुद्धीचा जुलूम होऊं देत नाहींत आपल्या मनावर—"

"अजून काय पाहिलंय तुम्ही?" किकी म्हणाली, "तीं माणसं सुद्धां बुद्धिमान आहेत. त्यांच्या बुद्धीची चमक अजून तुम्हाला पहायला मिळाली नसेल. तंटेभांडणं होऊं देत सुरू म्हणजे कळेल तुम्हांला—उत्सवाला कधीं गेलां होतां त्यांच्या?" मी हो म्हटलं

त्यावेळीं ती म्हणाली, “ मग कांहीच कळलं नाहीं का तुम्हांला ? या गांवकीच्या उत्सवांत तंटे कसे चालू असतात ते दिसले नाहींत का तुम्हाला ?”

“ तेवढं बारकाईनं पाहिलं नाहीं मी. ”

“ मग पहा तर—लहानशा गांवाचे दोन तुकडे पडले आहेत या उत्सवांच्या पायीं. यंदाच्या शिमग्यांत तुम्हांला दिसून येईल—”

गांवकीची ती उठाठेव मला नको होती. शक्य तेवढं करून या तंटेभांडणांपासून अलिप्त रहायचं मी ठरवलं होतं. गांवांतलीं तंटेभांडणं मला दिसत नव्हतीं असं नाहीं पण वादाचं मूळ शोधून काढून हीं भांडणं मिटवायचा मी निश्चय केला होता. आणि म्हणूनच अवेळीं त्या विषयाची चर्चा करायची नाहीं असंच मी ठरवलं होतं म्हणून मी म्हटलं, “ अजून इथल्या शिमग्याची मला चांगलीशी कल्पना नाहीं. मुंबईत शिमग्याला फारसं महत्त्व नाहीं. इथं शिमग्याच्या गोष्टी इतक्या बोललेल्या ऐकतोंय, कीं एका शिमग्याच्या उत्सवासाठींच बाकीच्या अकरा महिन्यांचं जीवन इथं खर्ची घालतात कीं काय असं मला वाटूं लागतं. ”

“ खरं आहे तें. ” किकी म्हणाली, “ त्या शिमग्याच्या मुळाशीं ज्या हक्कदारी आणि जमीनदारी भावना आहेत त्या मुंबईच्या माणसांना कळायच्या नाहींत. मार्क्सनं एवढं बडं पुस्तक लिहिलं पण त्याला आमची धार्मिक भांडवलशाही मुळींच माहीत नव्हती. तेव्हां हिंदुस्थानच्या दृष्टीनं तें पुस्तक अगदींच निरुपयोगी ठरलं आहे असा समज मी करून घेतला आहे—”

मी कांहीं तें पुस्तक वाचलं नव्हतं. कम्युनिझमच्या गोष्टी मी ऐकत होतों एवढंच. मी कांहींतरी तात्पुरतं उत्तर देणार होतों तोंच एकदम उठून ‘ मी जातें आतां ’ असं म्हणून किकी झट्‌कन निघून गेली.

मला आश्चर्य वाटलं. भाषणाला नुकतं कुठं तोंड लागतं आहे तोंच ही अशी कां गेली ? मी चोंहीकडे नजर फेकली. नदीपलीकडच्या ब्राह्मणवठारांतून बऱ्याचशा बायका इकडे येत होत्या. त्या बहुधा देवाला जात असाव्या. त्यांना भिऊनच का किकी निघून गेली ?

मी तसाच बसून राहिलों होतों. किकीचं येणं आणि तितक्याच अचानकपणं जाणं मला मोठं ड्रॅमॅटिक वाटलं. तिचा माझा परिचय—प्रत्यक्ष परिचय असा क्षणाक्षणाचाच होता. कॉलेजांत असतांना तिच्या उपद्व्यापांच्या हकिकती मी वारंवार ऐकत होतों. कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांच्या चळवळींपासून [illegible] मी दूर रहात असल्यामुळं कॉलेजांत चाललेले

किकीचे 'चाळे' मला चांगलेसे कळले नव्हते. जें कांहीं कळलं होतं त्याच्या धोरणानं मी पाहूं लागलों तेव्हां या खेड्यांत आल्यावर तिची स्थिति कशी होईल याची मला कल्पना येत होती. निर्भयपणें कॉलेजच्या आवारांत धुडगूस घालणारी ही मुलगी आपल्या गांवीं येतांच चोराहून चोर झालेली पाहून मला तिची दया आली.

किती तरी वेळ मी तिथं बसून राहिलों होतों. मन अगदीं कोरडं झालं होतं. एक प्रकारची उदासपणाची छाया माझ्या अंतरंगावर पडली होती. कसं अगदीं चुकल्या चुकल्यासारखं वाटत होतं. मुंबईच्या वियोगाचा का हा परिणाम ? किकीला पाहिल्यामुळं दडपून ठेवलेली शहरी मनोवृत्ती जागी झाली का ? काय होणार परिणाम या जागृतीचा ? निर्धारपूर्वक मी ही परिस्थिति पत्करली होती. इथं प्रतारणा करणं शक्य नव्हतं. तशी प्रतारणा करण्याचं मनांत आलं असतं तर त्याचे परिणाम माझ्याबरोबरच माझ्यावर विश्वास टाकणाऱ्या या गांवालाही भोगावे लागले असते. शहरी जीवनाच्या वियोगामुळं मनांत उत्पन्न झालेलं तें चांचल्य जोरजोरानं दाबून टाकायचा मी प्रयत्न करीत होतों.

काळोख पडत चालला असं पाहून मी उठून गांवांत जायला निघालो तो रस्त्यांत मला धोंडशेट भेटले. दोन्ही ब्राह्मणवठारांत चाललेल्या उलाढालीबद्दल बोलायला त्यांनीं सुरवात केली. ते म्हणाले, " कसं का होईना, त्यांचं त्यांना जाणवूं लागलं आहे. नुसत्या वेदपाठानं कांहीं प्रतिष्ठा मिळत नाहीं—वेदाची जागा इंग्रजीनं बळकावली आहे हें आतां कळूं लागलं आहे या लोकांना. आम्हांला इंग्रजी सुलभ झालं होतं पण आम्ही वेदपठणासाठीं झगडत होतों—आम्हांला एवढीच उणीव वाटत होती. तुम्हांला माहीतच असेल—वैदिक आचार मी सुरू केले आहेत म्हणून साऱ्याच गांवाचा मला विरोध आहे. तिथं ब्राह्मण ब्राह्मणेतर हा भेद नाहीं. सारेच मला नावें ठेवताहेत. ज्या ईर्ष्येनं हे आचार मी सुरू केले ती ईर्ष्या आतां जरी जागृत नसली तरीही या विरोधामुळं अभिमानाची ती जुनी ठिणगी कशीबशी तेवत राहिली आहे. ब्राह्मणमंडळीतील कांहीं लोक जितक्या पारंपरिकतेनं आपले आचारविचार चालू ठेवताहेत तितकाच माझाही बाणा यांत्रिक झाला आहे. एकदां सुरू केलं तें सुरू ठेवायचं, याच्यापलीकडे त्याला फारसं महत्त्व राहिलं नाहीं—" इतक्या मोकळेपणानं धोंडशेटबरोबर बोलायची संधी मला त्याच दिवशीं मिळाली होती. मी त्यांना त्यांचा पूर्वेतिहास विचारला त्यावेळीं आर्यसमाजाच्या अभिमानानं ऐन तारुण्याच्या उमेदींत केलेल्या झगड्यांची हकि-

कत ते मला सांगू लागले. तो इतिहास जितका मनोरंजक होता तितकाच उद्बोधक होता. त्यांनीं त्या कामीं सोसलेले क्लेश, स्वजननिंदेचे तडाखे, उच्च वर्णीयांनीं केलेला छळ आणि या दोन्ही झगड्यांत सापडल्यामुळं झालेली त्यांची दुरवस्था ऐकून त्या चरित्रांतून धडा घेण्याजोगं कांहीं तरी मला मिळालं असंच मला वाटलं.

धोंडशेट म्हणाले, " तुम्हांला इथं जपून वागलं पाहिजे. आतांच मी पाहिलं, बाबीकाकांची ती कमळी तुम्ही बसलां होतां तिकडूनच आली. तुम्ही जाऊन गांवांत पोचायच्या पूर्वी या प्रकाराची चर्चा सुरू झालेली तुमच्या कानीं येईल. त्या पोरीबद्दल लोकांच मत फारसं चांगलं नाहीं. खुद्द बाबीकाकासुद्धां तिच्या बाबतींत साशंक आहेत. शक्य तेवढं तुम्ही तिला जवळ येऊं देऊं नका. कॉलेजांतली ओळख असेल तुमची–पण इथं राहायचं म्हणजे शहरच्या ओळखी अगदीं विसरून गेलं पाहिजे. "

मी आश्चर्यचकित झालों. किकी एकदम निघून गेली ती नदीपलीकडल्या बायका दिसल्या म्हणून कीं गांवांतल्या कोणी पाहिलं म्हणून ? सुरळींतपणें चाललेल्या माझ्या कामगिरीला आतां अडथळे व्हायला सुरवात होणार असं वाटूं लागलं.

किकीबरोबरच कॉलेजांतले आणखी एकदोन विद्यार्थी सुट्टींत घरीं आले होते. त्यांच्या बरोबर त्यांचे कांहीं मित्रही आले होते. त्यांच्या फेऱ्या गांवांत सुरू झाल्या होत्या. गांवच्या लोकांचा तो चर्चेचा विषय होऊन बसला होता. गांवांत आलेले हे विद्यार्थी माझ्या परिचयाचे नव्हते असं जरी नाहीं तरीही ते मला ओळखत होते, मीही त्यांना ओळखत होतों. ते माझ्यापेक्षां ज्यूनियर होते खरे पण माझी थट्टा करणारं जे एक माझ्या बरोबरीचं टोळकं त्यावेळीं होतं त्यापैकींच ते होते. किकीचं आणि त्यांचं नातं कोणत्या प्रकारचं होतं याची मला कल्पना नव्हती. पण पुरुष विद्यार्थ्यांशीं किकीचं सहसा जमत नव्हतं असा माझा समज होता. इथं आल्यावरही ते किकीच्या बरोबर कधीं असल्याचं दिसून आलं नाहीं.

मी कॉंग्रेस कमिटीच्या वतीनं या खेड्यांत आलों होतों, आणि कॉंग्रेसची चळवळ म्हणजे कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीनं थट्टेचा विषय होता. छानछोकीची आवड असणाऱ्या परभृत विद्यार्थ्यांना कुठलाही खादीवाला डोळ्यांत सलत असे—मीही याच सदरांत होतों. आधींच ब्राह्मण मंडळींत माझ्याबद्दलचा विरोध आणि त्यांत हे विद्यार्थी आलेले, असं पाहून मी थोडासा घाबरून गेलों. त्यांनीं माझ्याविरुद्ध चळवळ करायला जरी प्रत्यक्ष सुरवात केली

नव्हती तरी आधींच विरोधी असलेल्या लोकांना माझी निंदा करायला ते शक्य तितकी मदत करीत होते.

एके दिवशीं दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणवठारांतील मंडळींनीं एक सभा बोलावली. या सभेंत या विद्यार्थ्यांपैकीं दोघांनीं माझ्या भ्रष्टाकाराबद्दल जोरजोरानं व्याख्यानं दिलीं. स्वतः इराण्याच्या आणि मोगलाच्या हॉटेलांत जाऊन वाटेल तें खाणाऱ्या या विद्यार्थ्यांनीं मला भ्रष्टाचारी ठरवावं याचं मला कौतुक वाटलं.

या प्रकारामुळं गांवची इतर मंडळी खवळली. अस्पृश्यतानिवारणाच्या बाबतींत मागं असलेली कित्येक मंडळी या विरोधामुळंच मला अनुकूल होऊं लागली.

या मुदतींत किकीची आणि माझी पुन्हा गांठ पडली नव्हती. ती स्वतःच मला टाळीत होती, कीं तिला बंदी करण्यांत आली होती हें मला कळायला कांहीं मार्ग नव्हता. मीही त्या बाबतींत मुद्दाम चौकशी करीत नव्हतों. तिचा माझा परिचय आहे याचा उल्लेख मी कधींच कुणाजवळ केला नाहीं.

दिवाळीच्या दिवसांत मला घरोघर आमंत्रणं येत होतीं. आमंत्रणं आलीं नव्हतीं काय तीं ब्राह्मण वस्तींतून. पेन्शनर सुभेदार असलेल्या चांभाराच्या घरीं मी दिवाळीच्या फराळा-साठीं गेलों तेव्हां माझ्या अनुयायी मंडळींत सुद्धां जोराची खळबळ सुरू झाली. पण निर्लेप फराळाला कांहीं दोष नाहीं असे कांहींतरीं पर्याय सांगून अण्णांनीं सर्वांची समजूत घालायचा प्रयत्न केला.

या खळबळीला गाडून टाकण्याकरितां धोंडशेटनीं फराळासाठीं साऱ्याच लोकांना आमं-त्रण दिलं. त्यानीं चांभारांनाही वगळलं नव्हतं. चांभारमंडळी धोंडशेटच्या दारासमोरील मंडपांत आली तेव्हां कित्येकांनीं हळुहळू काढता पाय घ्यायला सुरवात केली. आमंत्रण देण्यांत धोंडशेटनीं पंक्तिप्रपंच केला नव्हता. ब्राह्मणांना सुद्धां आमंत्रणं दिलीं होतीं. देण्याघेण्याच्या नात्यानं धोंडशेटशीं उपकारबद्ध असलेल्या एकदोन ब्राह्मणांनीं या समारं-भाला हजर राहून नुसतं दूध पिऊन जायचं कबूल केलं होतं.

चांभारांना एका बाजूला बसवण्यांत आलं होतं—तरीही एकाच मंडपांत सर्वांना बसवल्या मुळं कित्येकांना संकोच वाटत होता. स्वतः अण्णा या पंक्तीला बसलेले पाहून भिडेखातर कित्येक मंडळी नुसती पानावर बसली होती. ग्रामण्याचा प्रश्न निघाला तर सुटून जावं

म्हणून कित्येकांनीं फराळाच्या जिन्नसांना स्पर्श केला नाहीं. पंगत सुरू असतांना अचानक एक चमत्कार घडला—

मुंबईहून आलेल्या कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं अगदीं शेजारींच एक सभा भरवली आणि आम्हां सर्वांचा निषेध करायला सुरवात केली. कशीबशी पंगत उरकून आम्ही बाहेर पडलों आणि अण्णांच्या सल्ल्याप्रमाणें या सभेला जाऊन हजर राहिलों.

एक विद्यार्थी हिंदुधर्म आणि आर्यसंस्कृति यांची महति जोरजोरानं ओरडून वर्णन करीत होता. सांस्कृतिक परंपरेच्या संरक्षणासाठीं हिंदूंनीं कोणत्या खबरदाऱ्या घेतल्या पाहिजेत याबद्दल भाषण करतांना त्यानं काँग्रेस आणि कॉंग्रेसचे पुढारी यांना मनसोक्त शिव्या द्यायला सुरवात केली.

या सभेचे अध्यक्ष बाबीकाका होते. वक्त्यानं काढलेल्या मुद्द्यांना उत्तर देण्यासाठीं म्हणून मी अध्यक्षांकडे परवानगी मागितली ती त्यांनीं साफ नाकारली. या सभेंत बसण्याचासुद्धां आम्हांला अधिकार नाहीं असं त्यांनीं निक्षून सांगितलं. धोंडशेट आणि अण्णा हे दोघेही चिडून गेले होते. अण्णांना सभेंत बोलायची संवय नव्हती, पण पूर्वीच्या काळी आर्य–समाजाच्या चळवळींत प्रामुख्यानं भाग घेतलेल्या धोंडशेटना मात्र फारा दिवसांनीं एकदम स्फूर्ति आली. अध्यक्षाची परवानगी घेण्याच्या भानगडींत न पडतां त्यांनीं एकदम उठून उभें राहून जेव्हां बोलायला सुरवात केली तेव्हां एकच गोंधळ माजला. जिकडून तिकडून ‘ खालीं बसा, खालीं बसा ’ म्हणून आरडाओरडा सुरू झाला. आता सभा उधळली जाणार असं वाटत होतं तोंच, कुठून कुणाला ठाऊक, किकी एकदम येऊन सभेंत उपस्थित झाली. तिला पहातांच सारी गडबड एकदम थांबली.

“ मला कांहीं बोलायचं आहे ” असं तिनं अध्यक्षांना सांगताच बाबीकाका स्तंभित झाले. काय करावं हेंच त्यांना सुचेना. निघून जा म्हणून म्हणावं आणि किकीनं ऐकलं नाहीं तर चारचौघांत आपली बेअब्रू व्हावी त्यापेक्षां बोलूं द्यावं हेंच बरं, असा विचार करून कांहींच न बोलतां ते स्वस्थ राहिले. ती मौनाची संमति गृहीत धरून किकी व्यासपीठावर येऊन उभी राहिली.

*

प्रकरण ६ वें

# मी घर थाटलें

किकी येऊन समोर बोलायला उभी राहिली त्यावेळीं बावीकाकांप्रमाणेंच श्रोतेही फार अस्वस्थ झाले. व्याख्याती या नात्यानं कोणतीही स्त्री बोलायला उभी राहिल्याचं कुणालाच माहीत नव्हतं. मग ही एक लहानशी मुलगी येऊन आतां व्याख्यान देणार म्हणजे काय करणार असं प्रत्येकजण प्रत्येकाला विचारूं लागला.

किकीनं भाषणाला जी सुरवात केली तीच मोठ्या डौलानं. कॉलेजांत असतांना सुद्धां व्याख्यानांत तिचा सदोदित पहिला नंबर असे. कॉलेजच्या चिटवळ विद्यार्थ्यांपुढं बोलायची संवय असल्यामुळं इथं बोलायला तिला मुळींच भीती वाटली नाहीं.

सुरवातीला तिनं धर्माची व्याख्या सांगितली, रूढाचार आणि धर्माचार यांच्यांतला भेद समजावून दिला. परंपरेमुळं उत्पन्न झालेला अभिमान आणि बुद्धिप्रामाण्यवाद या दोहोंचा परस्पर संबंध तिनं अगदीं सोप्या भाषेंत समजावून सांगितला.

आणि मग मात्र तिनं धडाक्यानं सुरवात केली. ती म्हणाली, "रघुनाथराव मराठे हे या गांवीं शिक्षक म्हणून आले आहेत. ते नोकर म्हणून आले नाहींत. नोकरीचा पेशा त्यांना पत्करायचा असता तर यापेक्षां जास्त सुखाची आणि जास्त पगाराची नोकरी मुंबईत

यांना सहज मिळाली असती एका विशिष्ट तत्त्वासाठीं म्हणून—सेवाधर्माचं व्रत पत्करून ते इथं आले आहेत. ते इथं आले आहेत ते या गांवाच्या सेवेसाठीं—या गांवांतल्या अज्ञानांना सज्ञान करण्यासाठीं. त्या अज्ञानांत नुसत्या वयानं अज्ञान असलेल्यांचाच समावेश करायचा नाहीं, तर बुद्धीनं अज्ञान असलेल्या सज्ञानांना सुद्धां अधिक सज्ञान करण्यासाठीं त्यांनीं हें व्रत पत्करलं आहे असं मला इथं आल्यावर कळलं. त्या तत्त्वाला अनुसरून त्यांनीं आपलं कार्य चालवलं आहे अशी चौकशी केल्यानंतर माझी खात्री झाली आहे म्हणूनच मी इथं बोलायला उभी राहिलें. आतांच माझ्या एका तरुण कॉलेज-बंधूंनीं त्यांच्यावर भ्रष्टाचाराचा आरोप केला. अस्पृश्याच्या घरीं रघुनाथरावांनी फराळ केला म्हणून ते भ्रष्ट झाले आहेत—म्हणूनच आपली मुलं त्यांच्याकडे शिकवायला पाठवूं नये-असं माझ्या या धर्माभिमानी बंधूंनीं सांगितलं. चांभार म्हणजे हिंदु तरी आहेत. माझ्या या बंधूंना माझा असा सवाल आहे, कीं इराणी म्हणजे कोण? मुसलमान म्हणजे कोण? इराण्याच्या किंवा मुसलमानाच्या दुकानावर जाऊन जो वाटेल ते जिन्नस खात असेल तो सुद्धां भ्रष्टच नव्हे का?—" उत्तरासाठीं तिनं एक क्षणभर अपेक्षा केली आणि विचारलं, " कृपा करून माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या. इराण्याच्या किंवा मुसलमानाच्या हातचे मांसाचे पदार्थ खाणारा माणूस शुचिर्भूत समजायचा काय?—" सारे 'नाहीं नाहीं' म्हणून ओरडले. तेव्हां ती म्हणाली, " रघुनाथरावांवर आरोप करणाऱ्या या सद्गृहस्थांना माझा असा प्रश्न आहे, कीं ते इराण्याच्या आणि मुसलमानाच्या दुकानांत जाऊन बोकडाच्या आणि कोंबड्याच्या मांसाचे जिन्नस खातात कीं नाहीं?—" क्षणभर जिकडेतिकडे स्तब्धता पसरली. पुन्हा ती ओरडली—" रघुनाथरावांवर आरोप करणारे वक्ते कृपा करून माझ्या प्रश्नाचं उत्तर देतील काय?" तो विद्यार्थी घामाघूम होऊन कांहींच न बोलतां स्तब्ध राहिला आहे असं पहातांच श्रोते ओरडले, " उत्तर द्या, उत्तर द्या." तो कांहींच बोलेना. त्याची बोबडी वळली होती. खोटं बोलायचा हिय्या त्याला होईना. किकी पुढं बोलूं लागली, " पहा, उत्तर देण्याचं त्यांना धैर्य होत नाहीं. धर्माभिमानाच्या नांवानं आपल्यासारख्या सरळ मनाच्या खेडेगांवच्या लोकांवर छाप टाकण्यासाठीं, कांहीं सुद्धां कारण नसतां, रघुनाथरावांसारख्या निस्सीम समाजसेवकावर आघात करणारे हे गृहस्थ स्वतः अभक्ष्यभक्षण करणारे आहेत हें मी प्रत्यक्ष पाहिलं आहे—" तो विद्यार्थी 'नाहीं नाहीं' म्हणायचा प्रयत्न करीत होता, पण श्रोत्यांनीं एकच आरडाओरडा

करतांच त्यानं सभेतून एकदम काढता पाय घेतला. गांवचीं पोरं त्याच्या मागं लागलीं. एकच हुल्लड उठली. किकीला आपलं भाषण पुरं करता आलं नाहीं. ती उभी असतांनाच अध्यक्ष या नात्यानं बाबीकाका उठले आणि म्हणाले, " बंधू हो, आजचं सभेचं काम संपलं आहे." एवढंच बोलून रागानं किकीवर डोळे वटारीत कांहींच न बोलता ते निघून गेले. त्यांची अनुयायी मंडळीही त्यांच्या मागोमाग गेली.

पुढं येऊन धोंडशेट किकीला म्हणाले, " शाबास पोरी, चांगलं नाक ठेंचलंस या पोराचं. पण पुढचा काहीं विचार केलायस का? आतां घरीं गेलीस कीं बाबीकाका तुझे वाभाडे काढतील—"

" त्याची मला कल्पना आहे–" किकी म्हणाली, " पण मला तें सहन झालं नाहीं. मुंबईहून आलेल्या या तिघाचौघांनी आमच्या बाबाच्या संमतीनं हा घाट घडवून आणला होता. तें माझ्या कानी पडलं म्हणूनच मी मुद्दाम आलें. आतां काय व्हायचं तें होईल. मला त्याची पर्वा नाहीं. मी कांहीं बाबाविरुद्ध बोललें नाहीं. बोलले ती या पोरांविरुद्ध. इतकंही असून बाबाचा जर माझ्यावर रोष झाला तर त्याचे परिणाम भोगायची माझी तयारी आहे." असं म्हणून ती एकदम निघून गेली.

मंडळीची पांगापांग झाली होती. तिथून उठून आम्ही पुन्हा धोंडशेटच्या घरीं गेलों. अण्णा बरोबर होतेच. झाल्या प्रकाराची चर्चा करतांना अण्णांना अगदीं त्वेष चढला होता. ते म्हणाले, " बरीं चोरांचीं नाकं ठेचलीं. तुम्हाला वाईट वाटेल गुरुजी, पण हें असंच सर्वत्र चाललेलं असतं. आपण वाटेल तें करावं आणि दुसऱ्याला मात्र नांवं ठेवावीं. मला आश्चर्य वाटलं तें एवढंच, कीं बेछूट नाकबूल कसं केलं नाहीं त्या गृहस्थानं!"

" तिला भ्यायला वाटतं तो!" धोंडशेट म्हणाले.

" भ्यायचं कशाला!" अण्णा म्हणाले, " इथं काय पुरावा होता तिच्याजवळ? गुरुजींची साक्ष काढली असती तर ती उपयोगी पडली नसती."

" अन् मला कांहीं माहितही नव्हतं त्यांतलं," मी म्हटलं, " माझी त्यांची नुसती तोंड-ओळख आहे. यापलीकडे मला कांहीं सुद्धां माहीत नाहीं. मी कधीं वावरलोंच नाहीं त्यांच्या—बरोबर, तर मला तरी कसं कळणार? तिनं मला हटकलं असतं तर सरळसरळ मी तसं सांगितलं असतं."

" यांत कांहींतरी गोम आहे. " घोंडशेट म्हणाले, " कमळीलाच विचारलं पाहिजे. पण आतां बाबीकाका तिला इकडे येऊं देतील कीं काय हीच शंका आहे. "

बराच वेळ जरी आम्ही बोलत बसलों होतों तरी त्या चर्चेतून यापेक्षा अधिक कांहीं निष्पन्न झालं नाहीं. मला वाईट वाटलं तें एवढंच, कीं दिवाळीची संधी साधून घोंडशेटनीं योजलेलं हें महत्कार्य जावं तसं तडीस गेलं नाहीं यांतून पुढं वाद निर्माण होतील याची त्या दोघांप्रमाणें मलाही भीति वाटत होती. पूर्वी एकदां कसल्याशा उत्सवावरून मोठे बखेडे माजून या गांवांत एक खून पडला होता. त्यामुळं गांवांतल्या वस्तींत दोन तट पडले होते. इतर व्यवहारांत या दोन्ही तटांतील माणसं जरी एकमेकांत मिसळत असत तरी उत्सव किंवा मंगलकार्याच्या प्रसंगीं एकमेक एकमेकांच्या घरीं सुद्धां जात नसत. एक तट दुसऱ्या तटापासून अशा प्रकारें पूर्णपणें विभक्त झाला होता. आतां या प्रकारामुळं आणखी एक तट निर्माण होतो कीं काय अशी भीति मला पडली.

किकीची भेट झाल्याशिवाय त्या प्रकरणाचा उलगडा होणं शक्य नव्हतं. माझ्या मनाला रुखरुख लागली होती. या एकंदर प्रकाराच्या मागं कांहीतरी इतिहास आहे, आणि किकीला त्याची पूर्ण माहिती आहे असंच माझं मन मला सांगत होतं.

पण ती भेटावी कशी ? आधीं बावीकाकांच्या घरी मी गेलों नसतों—त्याचं घर कुठं आहे हें सुद्धां मला माहीत नव्हतं—त्यांतून गेलोंच असतों तर या खेडेगावात किकीसारख्या एका मुलीची एकांतांत भेट घेणं मला शक्यच नव्हतं. इतरांसमोर हा प्रश्न विचारणंही शक्य नव्हतं आणि तिलाही उत्तर देतां आलं नसतं.

किकीला पत्र पाठवावं आणि विचारावं असं एकदां माझ्या मनात आलं, पण तोही विचार मी दूर सारला. पत्र कुणाच्या हातीं गेलं असतं तर माझ्याबद्दल निष्कारण गवगवा झाला असता. कांहीतरी विशिष्ट कार्य करण्याच्या उद्देशानं मी या गांवीं आलों होतों. त्या कार्याच्या बजावणीसाठीं मला माझं वर्तन निर्दोष ठेवणं भाग होतं—एवढीशीसुद्धां ढिलाई माझ्या हातून झाली असती तर विरोधी लोकांनीं राईचा पर्वत करून माझी बेअब्रू केली असती. फाजील जिज्ञासेच्या बळीं पडून असलं संकट स्वतःवर ओढवून घ्यायचं नाहीं असा पोक्त विचार करून मी स्वस्थ राहिलों.

चारदोन दिवसांतच जो एक चमत्कार घडून आला त्यामुळं किकी स्वतः कांहींतरी उपद्याप करते आहे असा मला संशय येऊं लागला. ज्या वठारांत किकी रहात होती त्या

वठारांतील अजूनपर्यंत आमच्यां शाळेंत न आलेलीं अशीं दहा ब्राह्मण मुलं एकाएकीं शाळेंत येऊं लागलीं. सर्वांनाच आश्चर्य वाटलं. त्या मुलांत बाबीकाकांच्या घरचीं मुलं होतीं म्हणूनच मला या कामीं किकीचा हात आहे असा संशय आला. जिज्ञासा प्रबल होत असतांना देखील मी त्या मुलांना कसलाच प्रश्न केला नाहीं.

आणखी चारसहा दिवसांत दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणवठारांतील रोज एकदोन एकदोन अशीं मुलं येऊं लागलीं. अण्णांना सुद्धां आश्चर्य वाटलं. बाबीकाकांची आणि त्यांची भेट होत होती पण अण्णांजवळ ते या प्रकरणीं कांहींच बोलत नव्हते. अण्णानींही आपलं कुतूहल आवरून धरलं होतं.

सभेंत भाषण करून अस्पृश्यतानिवारणाला विरोध करणारे कॉलेज विद्यार्थी इतक्यांत निमगांव सोडून निघून गेले होते. किकी अजून गेली नसावी असा माझा समज होता.

आश्चर्याची दुसरी गोष्ट म्हणजे दोन्ही वठारांतील ब्राह्मण मंडळींनी पूर्वीं कबूल केल्याप्रमाणें आपली वर्गणी न मागतां आणून द्यायला सुरवात केली. शाळेचा फंड यामुळं वाढूं लागला. पूर्वीं ठरल्याप्रमाणं मला यापुढं स्वतंत्र रीतीनं रहाण्याइतका पगार मिळणं शक्य झालं.

आजवर अण्णांच्या घरचा एक माणूस या नात्यानं मी रहात होतों. त्यांची काकू माझ्याबद्दल विशेष काळजी घेत असे, पण त्यामुळं त्यांना त्रास होत होता हें मला दिसून येत होतं. मी मत्स्य-मांसाहारी नसल्यामुळं माझ्यासाठीं त्यांनी स्वतंत्र चूल ठेवली होती, जवळ जवळ स्वतंत्र स्वैंपाकघर इतके दिवसपर्यंत चालवलं होतं याचं मला संकट वाटत होतं. आतां पुरेसा पगार मिळूं लागल्यामुळं मी स्वतंत्र जागा घेऊन रहाण्याचं ठरवलं.

अण्णांच्या घरच्या मंडळीचा आत्मीय भावाचा लोभ जरी लागला होता तरीही यापुढं त्यांच्यावर माझ्या सरबराईचा बोजा टाकणं मला योग्य वाटेना. ते एक सुखवस्तु गृहस्थ असल्यामुळं माझ्या पगारांतून मिळणाऱ्या पैशांतले माझ्या जेवणापुरते पैसे देणं मला शक्य नव्हतं—घेणं त्यांना इष्ट वाटत नसे—देण्याघेण्याचा प्रश्न काढणंसुद्धां कठीण वाटत होतं, म्हणून मला स्वतंत्र बिऱ्हाड करणं आतां अवश्य वाटलं.

बिऱ्हाडाच्या व्यवस्थेला मी लागलों होतों. त्यासाठीं एक छोटंसं घर मी निवडलं. मला स्वैंपाक करतां येत नव्हता. शिकून स्वैंपाक करायला लागण्याइतकी फुरसतही मला

मिळत नसे म्हणून एक आचारी ठेवायचं ठरलं. अण्णांनीं एक ब्राह्मण आचारी शोधून काढला, पण मी मुद्दामच नकार दिला. मुंबईच्या हॉटेलांतून काम केलेला एक भडारी या कामासाठीं आपण होऊन पुढं आला आणि त्याच्या प्रस्तावाचा फायदा घेऊन मी माझं बिऱ्हाड थाटलं.

चौकशी करतांना मला असं कळून आलं कीं किकी यापूर्वीच निघून गेली होती. कॉलेजची सुट्टी केव्हां संपते याचा अंदाज मी कसा ठेवला नाहीं याचं माझं मलाच आश्चर्य वाटलं.

मला भेटल्याशिवाय किकी निघून गेली ही गोष्ट माझ्या मनाला लागून राहिली होती. एकदां असं वाटे, कां म्हणून तिनं मला विचारावं ? एवढा लोभ लागण्याइतका तिचा माझा परिचय तरी कुठं झाला होता ? गांवच्या ब्राह्मणांनीं माझ्याविरुद्ध यापूर्वी केलेल्या कारवाईचं निराकरण करण्याची तजवीज तिनंच केली असावी असं जरी मला वाटत होतं, तरी आपण केलेल्या कामगिरीचा तिनं स्वतः माझ्याकडे येऊन उल्लेख करावा अशी अपेक्षा मी कां करावी ! मुकाट्यानं तिनं काहीं कार्य केल होत—मुकाट्यानं तरी कसं म्हणायचं—तिकडे ब्राह्मणवठारात त्याचा काहीं बोभाटा झाला होता कीं नाहीं हें आम्हांला कळणं शक्य नव्हतं—तिनं जें कार्य केलं होतं त्याची बढाई कुणाकडे —माझ्याकडेसुद्धां तिनं कां म्हणून मिरवावी ? आजपर्यंत जें कुणालाच साधलं नाहीं तें तिनं अतिशय थोडक्या कालांत घडवून दाखवलं. यांतच तिच्या कर्तबगारीची कसोटी होती सभेंतल्या भाषणानंतर बाबीकाकांचा तिच्यावर रोष होईल असं जिथं आम्हा सर्वांना वाटत होतं, तिथं तिनंच उलट बाबीकाकांसह दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणमंडळीवर मात करून दाखवल्यावर तिनं घडवून आणलेल्या या चमत्काराबद्दल सर्वांनाच कौतुक वाटूं लागलं.

यामुळंच मला क्षणोक्षणीं तिची आठवण येई. पूर्वी घडलेल्या प्रसंगांची मी उजळणी करून पहात असें तेव्हां माझ्या मनांत किकीबद्दल कांहीं विशिष्ट प्रकारची भावना उत्पन्न झाली आहे असं मला वाटे. तें प्रेम नव्हतं. प्रेमाचे जे प्रकार मी कॉलेजांत असतांना पाहिले होते त्यांतल्या कोणत्याच प्रकाराच्या सदरांत ही भावना येत नव्हती. आदर म्हणावा तर मी तिच्याकडे एक प्रकारच्या वडीलकीच्या नात्यानं पहात होतों. लहानाबद्दल मोठ्याला आदर असणं कांहीं अशक्य नव्हतं, तरीही आदर आणि प्रेम या दोहोंचा मध्य साधून या नवीन भावनेचा माझ्या ठायीं प्रादुर्भाव झाला होता असंच मला वाटलं.

बिऱ्हाड थाटल्यापासून मी कांहीं मुलांना माझ्या फुरसतीच्या वेळीं घरीं शिकवूं लागलों. हीं मुलं अर्थातच ब्राह्मणांचीं नव्हतीं. ब्राह्मण वस्ती दूर असल्यामुळं इच्छा असती तरी अशा मुलांना माझ्याकडे शाळेच्या बाहेरच्या वेळांत शिकायला येणं शक्य नव्हतं.

बरींचशीं वर्तमानपत्रं जीं गांवांत येत असत तीं एका जागीं आणून सर्वत्रांना वाचायची सोय व्हावी म्हणून माझ्याच बिऱ्हाडीं आणून टाकलीं जात असत. माझ्यासाठीं कांहीं इंग्रजी पत्रंही सुरू करण्यांत आलीं होतीं. रात्रीच्या वेळीं गांवची प्रमुख मंडळी माझ्याकडे गोळा होई आणि मी त्या पत्रांतील मजकुराचा तर्जुमा करून त्याना वाचून दाखवीं. विशेषतः महात्माजींच्या ' यंग इंडिया 'तले लेख अथपासून इतिपर्यंत सर्वांना मराठीत तर्जुमा करून सांगणं हें माझं महत्त्वाचं काम होऊन बसलं होतं. त्यामुळं मराठी भाषेचा माझा व्यासंग आपोआप वाढत होता.

ही बरीचशी वर्दळ माझ्या घरीं होऊं लागल्यामुळं घरची इतर साफसफाई ठेवण्याकरितां कुणीतरी नोकर ठेवणं अवश्य झालं. अगदीं नाममात्र पगारांत असा नोकर मिळणं शक्य असल्यामुळं मी अण्णांना तशी कांहीं योजना करण्याची विनंति केली. त्यानीं एक म्हातारी कुळवाडी बाई या कामावर नेमली. तिला पगार महिना एक रुपया ठरवल्याचं पाहून मला आश्चर्य वाटलं. घरची झाडलोट, भांडीं घासणं, धुणीं धुणं आणि बाजारहाट करणं वगैरे सारीं कामं ही म्हातारी करीत असे. त्या कामाला मदत करण्यासाठीं तिची एक नात मधून मधून येत असे. ही मुलगी जरी कुळवाड्याची होती तरी मोठी हुषार होती. तिच्या जन्माबद्दल गांवांत प्रवाद होता. तिच्या या हुषारीचं मूळ कुठल्यातरी उच्च वर्णीयाच्या बीजांत होतं असा पुष्कळांचा समज होता. तिची आई हयात नसल्यामुळं त्याबद्दल कुणी विशेषशी चर्चा करीत नसे.

या जनीला माझ्याबद्दल फार आदर असे. एकाद्या गुरूबद्दल एखादी सनातनी शिष्यीण जेवढी निष्ठा दाखवते तेवढ्याच निष्ठेनं ती माझी व्यवस्था ठेवीत असे.

पहिल्या पहिल्यानं तिच्या या निष्ठेकडे माझं फारसं लक्ष गेलं नव्हतं. कारण ती दररोज म्हातारीबरोबर येत नसे. पण हलुहळू तिचा क्रम नित्याचा होऊं लागला तेव्हां तिची ही मुकी निष्ठा माझ्या नजरेला स्पष्टपणें दिसूं लागली. माझ्या घरीं येणाऱ्या मुलांना मी शिकवूं लागलों म्हणजे मंत्रमुग्ध झाल्यासारखी ती कोपऱ्यांत बसून तासचे तास पहात राही.

## फाटकी वाकळ

एके दिवशीं मी तिला विचारलं, "जने, मी शिकवीत असतांना नुसतीच पहात कशाला बसतेस ?"

"मग काय करूं तर ?" जनी म्हणाली, "मला शिकावंसं वाटतं, सारीं मुलं लिहितात वाचतात—मला सुद्धां वाचावंसं वाटतं; पण वाचतां येत नाहीं मग काय करूं ? नुसती पहात बसतें झालं."

"तुला शिकायचं आहे का ?" मी विचारलं. तिचा चेहरा एकदम प्रफुल्लित झाला. ती म्हणाली, "कुळवाड्याच्या मुलींनीं शिकलं तरी चालतं का ?"

तिच्या त्या प्रश्नाचं मला हसूं आलं. तेव्हां ती पुन्हा म्हणाली, "मला जर शिकवाल तर मी आजीला सांगेन, कीं तूं गुरुजींकडून मजुरी घेऊं नकोस म्हणून. आजीला सुद्धां वाटतं मी शिकावं म्हणून. पण इथं कुळवाड्याच्या मुलींना शाळेंत घालीत नाहींत ना ?—"

"बरं बरं—" मी म्हटलं, "मी तुला शिकवायची व्यवस्था करतों."

एकदम तिनं माझ्या पायांवर डोकं ठेवलं. तिच्या डोळ्यांतलीं दोन आसवं माझ्या पायांवर पडलीं.

कुळवाड्याच्या निर्मळ हृदयाची त्या दिवशीं मला पहिली कल्पना झाली.

प्रकरण ७ वें

# मी काम सुरू केलें

जनीला अक्षरओळख करून देण्याचं काम मी शाळेंतल्या एका प्रौढ विद्यार्थ्याला लावून दिलं. त्याला संकोच वाटत होता. तसं पाहिलं तर जनी ही अगदींच मुलगी नव्हती. कुळवाडी जातींत मुलींचीं लग्नं फार लवकर होत असलीं तरी त्या रूढीला अनुसरून जनीचं लग्न झालं नव्हतं. त्याच्या कारणाचा उल्लेख मी पूर्वी केलाच आहे. शुद्ध रक्ताबद्दल कुळवाडी जातींत मोठा काटेकोरपणा आहे. जरा कुठं कांहीं संशय असला तर त्या व्यक्तींचीं लग्नं होणं कुळवाड्यांत मोठं कठीण होऊन बसतं आणि त्याचे परिणामही शेवटीं अनिष्ट होतात.

शाळेचं काम सुरळित चाललं होतं. ती सुव्यवस्था लागलेली पहातांच मला असमाधान वाटूं लागलं. मी नुसता मास्तर म्हणूनच आलों होतों का? दुसरं कांहीं तरी काम करणं अवश्य होतं. पण तें काम कोणतं याचाच अंदाज मला येत नव्हता. अस्पृश्यतानिवारणाच्या प्रयत्नांना तात्कालिक यश येणं शक्य नव्हतं. रूढाचाराचीं पाळंमुळं खेड्यांत इतकीं खोलवर गेलीं आहेत, कीं त्यांच्यावर एकदम आघात करणं समंजसपणाचं झालं नसतं; म्हणून त्या प्रयत्नावर जोर देऊन आजच अप्रियता संपादन करणं योग्य नाहीं असं सर्वानुमतें ठरलं.

मग करायचं काय ? नुसतं शिकवीतच का बसायचं ? कुठलाही मास्तर आला असता तर त्यानं तें काम केलं असतं, मग मी येण्यांत विशेष तें काय ? खेडेगांवच्या चळवळीच्या सर्व बाजू मला अजून आकलन करतां आल्या नव्हत्या. कोणत्या बाबतींत सुधारणेची आवश्यकता आहे, कोणती सुधारणा हातीं घेतली तर ती अल्प विरोधानं यशस्वी होईल, कोणत्या सुधारणेमुळं गांवच्या लोकांचा तात्कालिक फायदा होईल याचा अंदाज घेण्यासाठीं एके दिवशीं आम्ही बैठक भरवली.

निश्चितपणें कुणालाच कांहीं मत देतां येत नव्हतं. जो तो आपापल्या व्यवसायांत गुंतलेला होता. त्या व्यवसायापलीकडे इतरांच्या व्यवसायाची त्याला कल्पना नसे. बारकाईनं पहातां मला असं दिसून आलं, कीं शेतकऱ्यांच्या कैवारानं जरी आम्ही झगडत होतों तरी त्यांच्याबद्दल खरी सहानुभूति वाटावी असं त्यांचं वर्तन नव्हतं. बहुतेक शेतकऱ्यांत आळसाचं प्राबल्य स्पष्टपणें दिसून येत होतं. बारा महिन्यांतले सारे तीन महिने ते राबत असत आणि बाकीचे नऊ महिने किरकोळ मोलमजुरी करण्याच्या नांवाखालीं आळसांत दिवस घालवीत असत—कित्येक गांव सोडून मुंबईला जाऊन मोलमजुरी करीत असत.

या ग्रामत्यागाला आळा कसा घालावा याचा मी विचार करूं लागलों. इथं व्याख्यानांनीं कांहीं काम होणार नव्हतं. कोणत्या उपायानं या परिस्थितींत फरक घडवून आणावा याची योग्य कल्पना कुणालाच सांगतां येईना.

म्हणूनच या शेतकरी लोकांत शक्य तितकं मिसळण्याचा मी निश्चय केला.

पूर्वी मुंबईच्या सुट्यांची मी आठवण ठेवली नव्हती. पण किकी एकदां येऊन गेल्या-पासून या सुट्यांकडे मी लक्ष ठेवूं लागलों होतों. नाताळची सुटी एकदोन दिवसांवर आली होती हें ज्यावेळीं माझ्या ध्यानीं आलं त्यावेळीं मला अस्वस्थपणा वाटूं लागला. ही सुट्टी थोड्याच दिवसांची असल्यामुळं या सुट्टींत ती गांवीं येईल कीं नाहीं याची मला शंका होती. चौकशी करीत राहणं बरं दिसलं नसतं म्हणून हें काम मी जनीवर सोपवलं. कुठंही जाऊन तिनं चौकशी केली असती तर तें गैर दिसलं नसतं.

ही कामगिरी सोपवल्यामुळं जनीला मात्र तितकंसं बरं वाटलं नसावं असं मला वाटलं. मी तिला सांगितलं तेव्हां ती म्हणाली, "तिची कशाला चौकशी करतां ? तिकडे तिला कुणीसुद्धां चांगलं म्हणत नाहीं. तिच्या घरचीं माणसंसुद्धां तिच्यावर नाराज आहेत. कुणीच तिला चांगल्या नजरेनं पहात नाहीं—" असं कां व्हावं म्हणून मी विचारलं

तेव्हां ती म्हणाली, " फार फाजील आहे ती. आईबापांचं मुळींच ऐकत नाहीं. बामणवठारांत बाबीकाकांचा केवढा दरारा. पण ती त्यांना मुळींच जुमानीत नाहीं. कुणी म्हणतात, तिच्या आईची तिला फूस आहे म्हणून, पण मला कांहीं तसं वाटत नाहीं. तिची आई बिचारी अगदींच गरीब आहे. कीडमुंगीला सुद्धां दुखवायची नाहीं. पण बाबीकाकासारख्या कर्दन-काळ बापाला ती कशी दाद देत नाहीं याचंच मला आश्चर्य वाटतं."

कशा रीतीनं तिला समजावून द्यावं याचा मी विचार करीत होतों. आधुनिकतेची वृत्ती तिच्या परिचयाची नव्हती. तिच्या दृष्टीनं किकी ही वाईट मुलगी होती. पण हा वाईटपणा म्हणजे निर्भयपणा, असं मी तिला एकदम सांगितलं असतं तर तें तिला पटलं नसतं. या प्रसंगानं किकीचा आणि तिचा परिचय घडवून आणावा, कदाचित तिची भेट झालीच तर जनीची हकिकत तिला सांगून एक प्रकारें तिला किकीच्या ताब्यांत द्यावं असा माझा विचार होता.

मोठ्या नाखुषीनं तिनं तें काम पत्करलं. तिला असं कां वाटावं याची निश्चित कल्पना मला येईना. एकाद्या कुळवाड्याच्या मुलीनं जाऊन मोठ्या घरच्या ब्राह्मणाच्या मुलीशीं बोलणं तिथं शक्य नव्हतं हें मला कळत होतं. पण किकीला भेटायची जनीची जी नाराजी दिसली तिचं कारण वेगळंच असावं असा तिच्या मुद्रेवरून मला संशय आला.

नाताळच्या सुट्टींत किकी घरीं आल्याची बातमी जनीनं आणली. पण तिची जनीची भेट झाली नव्हती. ती आल्याचं कळतांच मला एक प्रकारचं समाधान वाटलं—उगीच उत्सुकता वाटली—अगदीं प्रामाणिकपणं सांगायचं म्हणजे ती केव्हां येईल आणि केव्हां भेटेल असं मला होऊन गेलं होतं. जनीशीं बोलतांना मी ही माझी उत्सुकता तिला दिसूं दिली नाहीं. तरीही ती अगदीं तिखट दृष्टीनं माझ्या अंतःकरणाचा ठाव घेण्याचा प्रयत्न करीत होती असं मला वाटलं.

त्या दिवशीं दुपारीं रविवार असल्यामुळं आमची नित्याची बैठक बसली होती. अण्णा, धोंडशेट, रामभाऊ वगैरे मंडळी गोळा झाली होती. पुढला कार्यक्रम कोणत्या प्रकारचा ठेवावा याची चर्चा आम्ही करीत होतों. सूत काढण्यावर पुष्कळांचा विश्वास नव्हता. सारेच खादी वापरीत असत, पण खादी तयार करण्याची प्रवृत्ती मात्र कुणाच्या ठिकाणीं नव्हती. खादी तयार करण्याची योजना जर कुठं व्हायची तर ती खेड्यांतच असं मला खेड्याची परिस्थिति पाहून वाटूं लागलं होतं. कितीतरी लोक उद्योग नसल्यामुळं नुसत्या आळसांत

वेळ काढीत होते, त्यांना काम लावलं तर त्यांच्याकडून, साऱ्या खादी वापरणारांपुरती जरी नसली तरी, खादीची निर्मिती करण्याची चटक लागण्याइतकी खादी निर्माण करतां आली असती.

अण्णांना माझी योजना पटली होती पण इतरांना तिचं महत्त्व कळत नव्हतं. निदान दहा बारा तरी चरखे सुरू करणं अवश्य होतं. मोठा प्रश्न होता तो हाच, कीं हे चरखे चालवायला शिकवायचं कुणी ? मी स्वतः त्या कामीं फारसा वाकबगार नव्हतों. चरख्यावर सूत काढण्याची संवय असलेला दुसरा कुणी माणूस गांवांत माझ्या नजरेसमोर नव्हता. एवढ्याच कामासाठीं मुंबईहून कुणी मागवावा असं म्हटलं तर तें सर्वच दृष्टींनीं गैरसोईचं झालं असतं. या बाबतींत स्वतःच धडपड करून आपणच सूत काढण्याच्या कामांत तरबेज व्हावं आणि मग इतरांना शिकवावं असं मी ठरवलं.

आमची ही चर्चा सुरू असतां किकी अचानक तिथं आली. सर्वच आश्चर्यचकित झाले. मागल्या सुटींत तिनं जाण्यापूर्वी मला भेटायचं सुद्धां टाळलं आणि आतां ती स्वतः न बोलावतां अगदीं बैठकींत येऊन बसली याचं इतरांपेक्षां मलाच जास्त आश्चर्य वाटलं.

अण्णा म्हणाले, " बरं झालं तुम्ही आलांत त्या कमाताई. आम्हाला मोठा पेच पडला आहे. यांना आम्ही इथ आणलं, नुसतं मुलं शिकवीत रहाण्यानं कांहीं यांचं समाधान होत नाहीं, दुसरं कांहीं तरी काम लवकर सुरू केलं पाहिजे असं हे म्हणताहेत, आज काम कोणतं सुरू करावं हें कुणालाच कांहीं सांगतां येत नाहीं. तुम्हांला कांहीं सुचतंय का ?"

एक क्षणभर स्तब्ध राहून किकी म्हणाली, " कामं पुष्कळ आहेत पण तीं करणारीं माणसं पाहिजेत. मी तरी काय सांगणार ? चार दिवसाच्या पाहुणीसारखी मी इथं येतें, गावांत कुणाला भेटतां येत नाहीं मला, कुणाशीं बोलतां येत नाहीं कीं चर्चाही करतां येत नाहीं. या गांवांत माझा जन्म, इथंच मी लहानाची मोठी झालें पण किती जणांशीं माझी ओळख आहे ? म्हण आहे, कीं गांव आहे तिथं म्हारवाडा आहे म्हणून, पण इथं अगदीं उलटच झालंय. गांव टाकून जर कुठला वाडा असेल इथं, तर तो ब्राह्मणवाडा, इतर गांवच्या म्हारांसारखीच आमची स्थिति झालीय. कुणाशींच संबंध येत नाहीं आमचा—" अगदीं त्रासल्यासारखं करून ती म्हणाली, " केव्हां एकदां पास होऊन या कॉलेजांतनं सुटेन असं झालंय मला."

चर्चेला निराळींच दिशा लागते आहे असं पाहून मी म्हटलं, " तोंपर्यंत आम्ही काय करायचं ? "

पदरानं तोंड पुशीत ती मोठमोठ्यानं हसूं लागली, तेव्हां धोंडशेट म्हणाले, " हमण्याजोगं झालंय खरं. एवढे आम्ही गांवचे गावकरी पण काय करावं हें आम्हाला सुचत नाहीं.आमच्यापरीनं कांहींतरी करावं म्हणून आम्ही धडपड केली पण शाळा चालवण्यापलीकडे आमची मजल जात नाही. हें शिवाशिवीचं प्रकरण अगदींच नाजुक होऊन बसलंय. ब्राह्मणापेक्षां ब्राह्मणेतरच जास्त विरोध करतायत या बाबतींत--म्हणजे ब्राह्मण पाठिंबा देतायत असं नव्हे--कदाचित बाकीच्या लोकांना तेच उठवीत असतील--पण असलं विरोधाचं काम हातीं घेण्यापेक्षां सर्वांना पटेल असं कांहींतरी काढलं पाहिजे. गुरुजी म्हणताहेत, सूत काढावं, माग आणावे, खादी तयार करावी. पण चरखे आणि माग चालवणारा कुणी माणूसच नाहीं इथं--"

" मागाचं राहूं द्या सध्यां--" किकी म्हणाली, " मी आहे तोंवर चरखे चालवायचं पहातें जमलं तर. तसं मला चांगलं सूत काढतां येतं--"

मला एकदम अवसान आलं. मी म्हटलं, " तर मग आजच्या आज कुठून तरी चांगलेसे चरखे आणवायचा प्रयत्न करा. एक दिवस सुद्धां फुकट घालवायचा नाहीं या कामी--" माझ्याकडे पाहून किती अर्थपूर्ण दृष्टीनं ती हसली ! मी आपल्याशींच थोडासा ओशाळलों, माझी ती उत्सुकता मी मर्यादेबाहेर उघड करून दाखवली असं माझं मलाच वाटलं इतरांना तसं वाटलं नसावं. कारण अण्णा म्हणाले, " दोन वर्षांपूर्वी आम्ही आणले होते चरखे ते तसेच पडून राहिले आहेत. जरा इकडेतिकडे दुरुस्त करून घेतले तर आजच काम सुरू करतां येईल. तोंपर्यंत मुंबईहून चांगलेसे चरखे आणायचा प्रयत्न करूं. "

" काय दुर्दैव आहे--" रामभाऊ म्हणाले, " चरखे मुंबईहून आणायचा प्रसंग यावा ना ? आमचं खेडेगांवचं यंत्र हें, पण तेवढ्यासाठीं सुद्धां आम्हांला मुंबईकडे पहावं लागतंय ! "

चरख्याचा वर्ग सुरू करण्याचा बेत आखण्यांत आला. एकेकजण उठून निघाला. प्रत्येकजणाला कांहींना कांहीं काम होतंच. रिकामा होतों काय तो मीच. हा रविवारचा सुट्टीचा दिवस मी वाचनांत घालवीत असें. पण आज किकी आल्यामुळं वाचन बाजूला ठेवावं असं मला वाटलं. सारे उठून गेले तरी ती बसून राहिली होती. कोण काय म्हणेल याची तिनं जरी पर्वा केली नाहीं तरी मला संकोच वाटत होता. बाजूला उभी राहून जनी

टवकारून पहात होती त्यामुळं मी अगदीं अस्वस्थ झालों होतों. मुद्दाम उठून बाहेर फिरायला जाण्याचा प्रस्ताव करणं मला इष्ट वाटलं नाहीं. आम्ही दोघं बरोबर निघालों असतों तर गांवांत मोठी खळबळ उडाली असती. घरीं सुद्धां दोघांनीं एकटं बसणं योग्य नव्हतं. पण संकोच दूर व्हायला जनी होती एवढाच मला आधार होता.

बाकीची मंडळी जातांच जनीनं तिथंच बैठक मारली. मी तिकडे पाहिलं न पाहिल्यासारखं केलं आणि बोलायला सुरवात केली. मी म्हटलं, "मुंबईहून मी इथं यायला निघालों त्या वेळीं दर आठवड्याला रिपोर्ट पाठवायचा तुम्ही मला हुकूम केला होता. आठवतं ना ?—" हळुच हसून तिनं होकारार्थी मान हालवली, पण ती कांहींच बोलली नाहीं असं पाहून मी म्हणालों, "हुकूम केलात खरा पण पत्ता दिला होता का मला ? बरं, त्यानंतर तुम्ही इथं आलात, तुमची माझी भेट झाली, पण या रिपोर्टांबद्दल एक अवाक्षर सुद्धां काढलंत नाहीं तुम्ही"—एवढंच बोलून मी तिच्या उत्तराची अपेक्षा करीत स्वस्थ राहिलों.

एक क्षणभर ती कांहींच बोलली नाहीं. पलीकडे बसलेल्या जनीकडे नजर टाकून ती म्हणाली, "आतां जनीसुद्धां शिकायला लागलीय होय ? बरीच मोठी मजल मारलीत –"

"कां बरं ?" जनी चवताळून म्हणाली, "तुम्हीच तेवढं लिहावं वाचावं, यसफ्यस करावं, अन् आम्हांला नुसतं बालबोधसुद्धां वाचतां येऊं नये ?"

"कुणी म्हटलं असं ?" किक्की म्हणाली, "मी तारीफ करीत होतें तुझ्या गुरुजींची जने. त्यांत एवढं रागवायला काय झालं तुला ? शिकूं नकोस असं का मी म्हटलं ! मी इथं राहिलें असतें कायमची, तर मी सुद्धां तुला शिकवलं असतं. पण तूं कांहीं शाळेंत जात नाहींस इतर मुलांबरोबर—"

"पोरासोरांबरोबर मी का शाळेंत जाऊं ?" जनी म्हणाली, "आता मी लहान का आहें ? माझ्या बरोबरीच्यांना एकेक पोरसुद्धां झालंय !—"

"मग तूं कां केलं नाहींस लग्न ?" किक्की गंभीरपणाचा आव आणून म्हणाली, "लग्न झालं असतं तुझं, तर तुला सुद्धां झालं असतं एक पोर इतक्यांत."

"पण माझ्याबरोबर लग्न करणार आहे कोण ?" जनी केविलवाणा चेहरा करून म्हणाली, "लोक काय म्हणतात तें माहीत आहे ना तुम्हाला ? काय होणार आहे माझं कोण जाणे—"

विषयांतर होऊं लागलं असं पाहून मी म्हटलं, " आतां जनी शिकतेय, उद्यां चांगली विद्वान झाली कीं वाटेल तो माणूस लग्न करील तिच्याबरोबर. ब्राह्मण नवरा सुद्धां मिळेल तिला. "

" ही थट्टा बरी नव्हे बरं गुरुजी ! " जनी म्हणाली, " आतां मला कळूं लागलंय सारं कांहीं—इथं बसतें ना मी रोज—ऐकतें ना—मलासुद्धां वाटतं—" असं म्हणून ती एकदम थांबली.

" काय वाटतं तुला ? " किकीनं विचारलं.

" जाऊं दे तें. " जनी म्हणाली, " आज चरखा घेऊन येतें मी एक. आधीं मलाच शिकवा सूत काढायला. "

" वाः छान ! " किकी म्हणाली, " तूं तयार झालीस कीं तूंच शिकवशील इतरांना, होय ना ? "

रागावल्यासारखं करून जनी मान फिरवून स्वस्थ बसली तेव्हां मी म्हटलं, " रुसायला काय झालं जने ? आतां गांवच्या कामाचा भार आपापल्या परीनं प्रत्येकानंच उचलला पाहिजे—" किकीकडे वळून म्हणालों, " माझा प्रश्न तेवढाच राहिला ? "

किकीची मुद्रा एकदम बदलली. एक मोठा सुस्कारा टाकून ती म्हणाली, " मुंबईच्या वातावरणांत जें बोलतां येतं तें इथं कांहीं बोलतां यायचं नाहीं. फार जपून बोललं पाहिजे इथं. त्या वेळीं मी उल्लूपणानं काय वाटेल तें बोललें. पण तुम्ही तें ध्यानांत ठेवाल असं नव्हतं वाटलं मला. गेल्या खेपेला आलें त्या वेळीं काय झालं तें तुम्हाला माहीत आहेच. मोठा कोंडमारा होतो या हवेंत. तोंड दाबून बुक्क्याचा मार झालाय मला. तरी पण मुलं येऊं लागलीं ना शाळेंत आतां तिकडलीं ? "

" कसा काय झाला हा चमत्कार ? " मी विचारलं.

" चमत्कार कसला त्यांत ? " किकी म्हणाली, " मुलांना वाटत होतं शाळेंत यावं म्हणून —शूद्रांचीं मुलंसुद्धां शिकतायत तिथं ब्राह्मण मागें राहून कसं परवडणार कुणाला ?— त्यांच्या आईबापांनासुद्धां वाटत होतं. पण विरोध होता माझ्या वडिलाचाच. मीच होऊन जेव्हां प्रत्येकाला सांगूं लागलें तेव्हां काकासुद्धां उगी राहिले—काका म्हणजे माझे वडील— आणि मग येऊं लागलीं मुलं शाळेंत—"असं म्हणून ती हसली आणि म्हणाली, " पण

मला मात्र येतां आलं नाहीं इकडे. मी आलें असतें तर तें कांहीं जमलं नसतं. मुलं यायची सुरवात झाली त्यांतच सारं कांहीं आलं असं मला वाटलं. ''

ती उगीच राहिली. आणखी बोलावं असं तिला वाटत असावं असं तिच्या मुद्रेवरून दिसत होतं. पण ती पुन्हापुन्हा जनीकडे पहात होती आणि जनी तर बसल्या जागेवरून हालेल असं दिसत नव्हतं. तिला जसा कांहीं हट्ट भरला होता. उठून जा म्हणून जनीला म्हणावं तर तेंही बरं दिसलं नसतं.

बोलायला मोकळेपणा दिसायचा संभव दिसत नाहीं असं पाहून किकी म्हणाली, " आतां आपण या चरखे चालवायच्या कामाला लागूं या. पहिला धडा जनीला द्यायचा, होय ना ग जने ?—'' ती जनीकडे वळून म्हणाली.

" हा झाला पहिला धडा-'' जनी म्हणालीं, " अन् दुसरा धडा कसला देणार आहांत मला ? ''

जनीच्या भाषणांतली खोंच किकीच्या लक्षांत आली असावी, तरीही ती अगदीं शांतपणें म्हणाली, " पहिला धडा झाल्याशिवाय दुसऱ्या धड्याची गोष्ट आजच कशाला ? पुष्कळ धडे द्यायचेयत मला. उद्यां तुझ्या गुरुजींना हें निमगांव सोडून जावं लागलं तर इथलीं कामं पुढं तुलाच चालवावीं लागतील--''

" गुरुजी जाणार इथनं ? '' जनी उतावीळ होऊन म्हणाली.

" नको का जायला ? '' किकीनं घट्टन उभं रहात विचारलं, " इथं खेड्यांतच जन्मभर डांबून ठेवणार आहेस का त्यांना ?—'' असं म्हणून ती जायला निघाली. जातांना माझ्याकडे वळून म्हणाली, "आतां काय करायचं तें एकदां ठरवून टाकलं पाहिजे. सध्यांतरी मला फारशी सवड नाहीं. धीर करून आज आलें तें कितपत पचतं तें पहायचंय. बरं, जातें मी ! '' असं म्हणून ती एकदम निघून गेली.

ती जात असतांना मी तिच्याकडे पहात राहिलों होतों तोंच माझ्या कानीं शब्द आले, " पाहिलीत कशी मगरूर आहे ती ? '' जनी माझ्याजवळ येऊन उभी राहिली होती.

" काय झालं ? '' असं मी विचारलं तेव्हां नाक मुरडून माझ्याकडची मान वळवून ती म्हणाली, " तुम्हांला कांहीं तें दिसायचं नाहीं. तुम्ही देखील त्यांतलेच ! '' असं म्हणून तीही एकदम फणकाऱ्यानं निघून गेली.

मला आश्चर्य वाटलं. जनीला राग येण्याजोगं असं कोणतं वर्तन किकीच्या हातून घडलं ? तिनं तिला शिकवायचं कबूल केलं होतं, पुढलीं कामं तिलाच करावीं लागतील असं देखील मोठ्या अभिमानानं सांगितलं होतं—याचाच का जनीला राग आला ?

उच्चारले जाणारे शब्द आणि त्यांच्यामागं असलेली अंतःकरणांली वृत्ति या दोहोंत दिसणारा मेळ, पहाणारा आपल्या नजरेप्रमाणें पहात असतो. जनीचा पहिल्यापासूनच किकीवर राग होता. तिचा प्रत्येक शब्द म्हणूनच ती कुत्सित अर्थानं पहात असावी असा मला संशय आला.

सध्यां तरी या बारीकसारीक गोष्टींकडे लक्ष द्यायचं नाहीं असा मी निश्चय केला होता. ज्या माणसाचा जितका उपयोग होईल तितका पुरेपूर करून घ्यायचा आणि आपण पत्करलेलं काम प्रामाणिकपणानं पार पाडायचं, तें करीत असतांना इतर कोणत्याही भावनांना मनांत थारा द्यायचा नाहीं, असा कठोर निर्धार करून मी पुढल्या कामाला लागायचं ठरवलं.

## प्रकरण ८ वें

# मला आशा सुटली

दुसरा दिवस सोमवार होता–अर्थातच त्या दिवशीं शाळा होती. शाळा सुटतांच मी घरीं आलों तोच किकी तिथं येऊन दाखल झाली. माझ्याकडे यायला तिला कशी मोकळीक मिळाली याचं मला आश्चर्य वाटत होतं.

शाळा सुटल्यानंतर दोन चार मुलांना स्वतंत्र रीतीनं शिकवण्यासाठीं मी घरीं बोलावीत असें. नित्याप्रमाणें तीं मुलं आलीं होतीं. पण किकी आल्यामुळं मी त्यांना त्या दिवशीं सुट्टी दिली. आतां मोकळेपणानं बोलायला मिळणार अशा उमेदीनं मी बैठक मारून बसलों होतों तोंच जनी येऊन हजर झाली. रोज ती त्यावेळींच येत असे, त्याचप्रमाणं ती आजही आली होती. पण मला मात्र वाटलं, कीं ती मुद्दाम आली. इतर मुलांना जशी मी जायची परवानगी दिली तसंच तिलाही सांगून पाहिलं. पण ती कांहीं जाईना असं पाहिल्यामुळंच माझा तसा समज झाला.

चरख्यांची व्यवस्था एकदोन दिवसांत होणार होती. माळ्यावर पडलेले जुने चरखे काढून ते दुरुस्त करायला दिले होते. शिवाय जिल्ह्याच्या कॉंग्रेस कमिटीकडून कापसाचे पेळू आणल्याशिवाय सूत काढण्याचं काम सुरू करणं शक्य नव्हतं.

मी ही सारी हकिकत किकीला शक्य तितक्या विस्तारानं सांगितली. पुढं काय बोलावं हें मला सुचेना. समोर बसून राहिलेल्या जनीमुळं माझी बोलण्याची स्फूर्ति अडून पडत होती आणि किकी लवकर जावी असं तर मला वाटत नव्हतं. कांहीं तरी बोललंच पाहिजे म्हणून मी कॉलेजच्या गोष्टी काढल्या, शक्य तितका इंग्रजी बोलत राहिलों, तीही इंग्रजी बोलूं लागली, तरीही जनी बसल्या जागेवरून हालेना. संस्कृत समजत नसतांना पुराणिकाचं संहितावाचन भाविक बाया जितक्या भक्तिभावानं ऐकतात तितक्याच भक्तिभावानं—कीं कुणाला ठाऊक, दुसऱ्याच कसल्यातरी भावनेनं—जनी ऐकत बसली होती. तिचा तो हट्ट किकीच्या ध्यानीं आल्यावांचून राहिला नाहीं. ती सहज थट्टेनं म्हणाली, "आम्ही काय बोलतों तें कळतं का तुला जने?"

"न कां कळेना—" जनी म्हणाली, "पण तुम्ही बोलत असलां कीं ऐकायला बरं वाटतं मला—अगदीं सारखं ऐकत रहावंसं वाटतं."

"कांहीं कळलं नाहीं तरी?" मी विचारलं. ती नुसतं 'हो' म्हणाली. तिच्या चिकाटीचं मलाही कौतुक वाटलं. मला प्रश्न पडला तो हा, कीं एवढ्या चिकाटीनं ती कां बसते आहे? ही नुसती खेडवळ चौकसबुद्धीच का? तसं पाहिलं तर तिला माझ्याबद्दल आदर होता, माझ्याकडच्या बातम्या गांवांत नेऊन पसरवण्यासाठीं ती खात्रीनं बसत नव्हती. मग ती कां बसत होती? मला त्या प्रश्नाचा उलगडा होईना. थांबायचं नाहीं म्हणून मी पुन्हां कॉलेजच्या गोष्टी काढल्या. आतां आम्ही मराठींतच बोलूं लागलों. आमच्या बोलण्यांत कांहीं गमतीच्या हकिकती निघाल्या तर जनी अगदीं मनमुराद हसत होती. पहिल्यानं ती दूर कोपऱ्यांत बसली होती—हळुहळु सरकत सरकत तिनं आपली बैठक आमच्या बैठकीला आणून भिडवली.

आम्ही तिघंही बसून गप्पागोष्टी करीत आहों असा पहाणाऱ्याचा समज झाला असता.

थोड्या वेळांत झालंही तसंच, आमच्या बोलण्यांत जनी मधून मधून तोंड घालूं लागली. किकीला त्याची चीड येईल अशी मला शंका आली होती पण तिनंही सारं खेळीमेळीनं घेतलं. तीही मनमोकळेपणानं जनीबरोबर बोलूं लागली.

किकीला कांहींतरी सांगायचं होतं असं मला माझ्या अंतरंगांतून वाटत होतं. मुद्दाम तेवढ्याचसाठीं ती आली असावी. पण जनीनं बैठक मारल्यामुळं जें कांहीं बोलायचं होतं तें बोलायचं ती टाळीत असावी असा मला भास झाला. जनी येऊं लागल्यापासून सैंपाक

करणाऱ्या भंडाऱ्याला रजा दिली होती. आतां तीच आपल्या आजीच्या नजरेखालीं माझ्या स्वैंपाकाचं काम करीत होती.

किकीला बरोबर घेऊन फिरायला जावं, नदीकाठीं खडकावर बसावं असं माझ्या मनांत येत होतं. बरोबर जाणं तर शक्य नव्हतंच, पण नदीकांठीं सुद्धां आम्हांला बोलायला एकांत मिळाला नसता. कोण केव्हां येऊन गोळा झाले असते तें सांगतां आलं नसतं. आणि तसं झालं असतं तर आमच्या वर्तनाबद्दल गांवांत उगीच बभ्रा झाला असता. ही मुंबई नव्हती. गर्दी असल्यामुळंच मुंबईला कुठंही एकांत सुलभ होतो. कोण कुणाकडे फारसं लक्ष देत नाहीं. पण या खेडेगांवांत प्रत्येक माणसाची प्रत्येकाच्या हालचालीवर अगदीं बारकाईची नजर असते, जसं कांहीं पोलीस तपासाचंच काम चालू असावं. या बंदिस्त परिस्थितीमुळंच मला सदोदित फार जपून वागावं लागे. एका विशिष्ट भावनेनं गांवचे लोक माझ्याकडे पहात होते. त्यांनीं माझं आसन शक्य तितकं उंच करून ठेवलं होतं. माझ्याकडून एवढीशी ढिलाई झाली असती तर तें आसन एकदम कोसळून पडलं असतं म्हणूनच मला जपून वागावं लागत होतं.

मी पूर्वींच सांगितलं आहे कीं आयुष्याच्या पुढल्या मार्गक्रमणासाठीं कॉलेजांत असतांनाच मी हें स्थळ हेरून ठेवलं होतं. त्यावेळीं आमची एकमेकांना ओळखसुद्धां नव्हती. आतां ओळख झाली, थोडासा लोभही जडला, संधि मिळाली पण मोकळ्या मनानं बोलतां येणंही अशक्य झालं हें पाहून माझा जीव कासावीस झाला.

किकीच्या गृहस्थितीची माहिती करून घेणं माझ्या दृष्टीनं मला अवश्य होतं. पण जनीसमोर मोकळ्या मनानं तिनं माझ्या प्रश्नांचीं उत्तरं दिलीं नसतीं म्हणूनच ते प्रश्न करायचं मी टाळलं. कॉलेजांतल्या आमच्या सहाध्यायी मित्रांच्या गोष्टी निघाल्या तेव्हां त्यांतल्या कुणाकुणाचीं लग्नं कोणत्या प्रकारें झालीं त्याजबद्दलच्या हकिकती किकी सांगूं लागली. त्यांतल्या दोघांतिघांचीं लग्नं कॉलेजांतल्या परिचयामुळंच जमून आलीं होतीं त्या संबंधांच्या हकिकती किकीनं सांगितल्या तेव्हां जनी मधेंच म्हणाली, " तुमचं असं कांहीं जमलं नाहीं वाटतं कमाताई ? "

" तुला काय वाटलं ग जने ? " चढेलपणाचं उसनं अवसान आणून किकी म्हणाली, " आतां ज्या मुलींची हकिकत मी सांगितली तसली का मी आहें ? "

" म्हणजे त्या कशा काय होत्या ? " जनीनं विचारलं.

" मग ऐकलंस काय आतांपर्यंत ? " किकी हंसत म्हणाली, " अन् त्या कशा होत्या हें तुला सांगून तरी कसं कळणार आहे ? कॉलेज कसं असतं, तिथं विद्यार्थी लोक एक-मेकांशी कसे वागतात, मुलामुलींच्या कशा ओळखी होतात, त्या ओळखींतून बरेवाईट प्रकार कसे बाहेर येतात हें जोपर्यंत तुला नीटसं कळलं नाहीं तोंपर्यंत तुझ्या प्रश्नाचं उत्तर कसं देऊं ? "

" तें कशाला कळायला हवं ? " जनी म्हणाली, " तुमचं आपलं कुठं जमलं असलं तर तेवढंच सांगा मला--अन् कसं जमलं तेंही पण सांगा हं. "

" तसं कांहीं जमलं नाहीं माझं अजून " किकी जरा गंभीर होऊन म्हणाली, " पण खोटं कशाला सांगूं तुला ?—पण तसं कांहींतरी जमेल असं अलीकडे मला वाटूं लागलंय. मला मुळीं लग्नच करायचं नाहीं असं पूर्वीपासून मी म्हणत असें—अजूनसुद्धां तसंच सर्वांना सांगतें—पण तें खरं नाहीं हो. लग्नाशिवाय रहाणं कांहीं सोपं नाहीं—तुला नाहीं असं वाटत जने ? "

"वाटलं तरी काय उपयोग ? " जनी म्हणाली, "कोण करणार आहे माझ्याबरोबर लग्न ! मला कांहीं इथले लोक आवडत नाहींत. आमच्या जातीचीं माणसं पाहिलीं कीं मला अगदी राग येतो त्यांचा–अन् वाटतं, इतरांसारखं लहानपणीं माझं लग्न झालं असतं तर आज मला रडत रहावं लागलं असतं. अन् आतां आतां तर गुरुजी आल्यापासून मला रोज रोज नवं नवंच ऐकायला मिळतंय. त्यांतून आज जें हें पहायला मिळालं त्यानं तर मला कांहींच्या कांहींच वाटूं लागलं आहे तुम्हा ब्राह्मणांच्या घरांतसुद्धां अशीं दोन परकी माणसं कधीं एकाजागीं बोलत नाहीं बसत. नवराबायको सुद्धां कधीं दुसऱ्याच्या समोर अशीं बोलत नाहींत. अन् तुम्हीं हीं बोलत बसलां तरी कशीं, याचंच मला आश्चर्य वाटतंय !—" जनीचं तें भाषण ऐकून किकी मोठमोठ्यानें हसूं लागली तेव्हां जनी चिडून म्हणाली, " हसतां काय, मी खोटं का बोलतेंय ? आळ का घेतेंय तुम्हां लोकांवर ? आम्हा कुळवाड्याघरचीं नवराबायको जशीं उघडउघड बोलतात एकमेकांबरोबर तसे बोलतात का तुमचे बामणलोक ? "

" खरं आहे तें. " किकी म्हणाली, " अजून माझी आई आमच्यासमोर सुद्धां काकांजवळ बोलत नाहीं. मोठी बारीक नजर आहे तुझी जने. चांगली निरखून पहातेस वाटतं सारीं घरं ?–"

" अशी चुकवाचुकवी करूं नका. " जनी खट्याळपणानं म्हणाली, " आधीं माझ्या प्रश्नाचं उत्तर द्या. कुठं जमवलंयत हें स्थळ ? "

तिच्या प्रश्नाचा तो आविर्भाव पाहून मला सुद्धां हसूं लोटलं. मलाही जिज्ञासा होतीच.

" या सांगायच्या का गोष्टी आहेत ! " किकी नाजुकपणें हसत मला डोळा घालीत म्हणाली, " या असल्या गोष्टी कुणी कुणाला विचारूं नयेत अन् कुणी त्या सांगूही नयेत कुठं जुळलेलं केव्हां कसं फिसकटेल हें सांगतां का येतंय ? पुरुषांची जात म्हणजे खेडे-गांवच्या कुत्र्यासारखी--रागावूं नका हं गुरुजी--गावांतून फिरतांना वळचणीला पडलेला भाकरीचा तुकडा दिसला, कीं खेड्यांतलं कुत्रं जसं शेपूट हलवीत वसूकन ढास मारतं अन् तितक्यांत पलिकडे एकादं हाडुक पडलेलं दिसलं कीं तोंडची भाकर टाकून त्या हाडकामागं धांवतं—अन् मग तसंच तोंडांतून रक्त येईपर्यंत हाडुक चघळीत बसतं, तसंच असतं पुरुषजातीचं ! समजलं ना मी काय म्हणतें तें ? असं आहे आमच्या कॉलेजांतलं वातावरण !"

" चांगलं समजलं मला ! " जनी म्हणाली, " कॉलेजांतलंच कशाला, या खेडेगांवांत तरी काय चालतंय ? लग्नाच्या बायका टाकून शहाणीसुर्ती माणसं कुणब्यामाळ्यांच्या बायकांमागं इथंसुद्धां धावतातच नाहीं का ?—" बोलतां बोलतां तिचा चेहरा खर्रकन उतरला,--किकीही एकदम गंभीर झाली.--क्षणभर सारंच बोलणं बंद पडलं.

"मी जातें आतां." असं म्हणून किकी उठली, " चरखे आले कीं मला कळवा. पेळूंमुळं अगदींच कांहीं अडायचं नाहीं. चांगलासा कापूस मिळाला तर आपण इथंच पेळू करूं. मला आमच्या देवकापसाचा प्रयोग करून पहायचा आहे-" असं अर्धवटच बोलून ती निघून गेली.

बसल्या जागेवरून जनी हालली नाहीं. मी दारांतच उभा होतों. जनी सारखी माझ्याकडे टक लावून पहाते आहे असं मला वाटत होतं. मी मागं वळून पाहिलं त्यावेळीं माझा अंदाज खरा ठरला. खरोखरच जनी डोळे तारवटून सारखी माझ्याकडे पहात होती.

" काय झालं जने ? " असं मी विचारलं तेव्हां ती एकदम दचकली.

" कांहीं नाहीं ! " ती घाबरल्यासारखं करून म्हणाली, " पाहिल्यापासूनच आमच्या कमाताई भारी दांडग्या. बाबीकाकांचा तिच्यावर भारी राग. लहानपणीं मी त्यांच्याच घरीं वाढलें की नाहीं--अगदीं बरोबरीनं वागत होतों आम्ही ! बाबीकाकांना तें आवडत नसे. नको म्हटलं तरी मला मुद्दाम शिवून ती मिठी मारायची अन् मग तिची आई तिला साडी बदलायला लावायची. तिची आई मोठी देवमाणूस आहे हो. कधीं कुणाला टाकून बोलायची नाहीं. बोलूं नये पण बोलतेंच—बाबीकाकांचा स्वभाव मात्र भारी वाईट. कुणाचं बरं बघवत नाहीं त्यांना. लहानपणीं किती मारायचे कमाताईला. अजूनसुद्धां मारीत असतीलसं वाटतं मला. माणुसकी कशी ती नाहींच त्यांना--"

" याच गोष्टी का आठवीत होतीस ? " मी मधेंच विचारलं.

" नाहीं—तसं नाहीं––" जनी ओशाळून म्हणाली, " हें आपलं मी नुसतं सांगितलं तुम्हाला. मला आपलं तिसरंच कांहीं वाटलं होतं—" असं म्हणून ती गालांतल्या गालांत हसून उगीच राहिली.

" काय वाटलं होतं ? " मीही हसतच विचारलं.

" मला वाटलं होतं,-" जनी म्हणाली, " कीं तुमची तिची ओळख असावी––पूर्वींची. म्हणजे आपली अगदीं चांगलीच ओळख असावी––"

" कां असं वाटलं तुला ? " मी जरा गंभीर होऊन विचारलं.

" नाहीं आपलं उगीच ! " असं म्हणून जनी पुन्हा हसली आणि म्हणाली, " पण आतां नाहीं वाटत तसं. तुम्ही सांगितलं मला चौकशी करायला त्यावेळीं वाटलं होतं मला. म्हटलं, एकच जात आहे––आपली ओळख असायची ! अन् पुढं––" पुन्हां थांबून ती म्हणाली, " पण आतां नाहीं वाटत तसं. तिचं तुमचं जमायचं नाहीं. भारी दांडगी आहे ती. अन् तुम्ही तर अगदीं थंडे—डोहांतल्या पाण्यासारखे. तिचं तुमचं नाहीं जुळायचं. "

" पण तिचं माझं जुळायच्या गोष्टी बोलत होतं तरी कोण ? " मी विचारलं.

" नाहीं, मीच आपली म्हणत होतें ! " जनी म्हणाली, " अगदीं आपल्याशींच म्हणत होतें––तशी मी बोललें नाहीं बरं कुणाजवळ. अन् आतां सुद्धां बोलायची नाहीं. तसा नाहीं हो माझा स्वभाव. दुसऱ्या कुणी चुगल्या केल्या तरी सुद्धां मला नाहींत आवडत. मी नाहीं बरं बोलायची कुणाजवळ ! "

" पण बोलायला आहे काय ? "

" आतां ही ती इथं आली होती, तुमच्याबरोबर बोलत बसली होती, गांवांत एवढं कळलं तरी सुद्धां केवढी गडबड होईल चोहींकडे ! कुणालासुद्धां आवडायचं नाहीं तें. अण्णांना––धोंडशेटना सुद्धां नाहीं आवडायचं. "

" नाहीं आवडलं तर नाहीं आवडलं. पण या लोकांना आवडत नाहीं म्हणून मी काय माझ्या मनासारखं वागूं नये ? नाहीं आवडलं त्यांना तर मी निघून जाईन इथून––"

" नाहीं नाहीं ! " जनी एकदम घाबरून म्हणाली, " कुणाला कळूं द्यायची नाहीं मी यांतलं कांहीं. पण तुम्ही जाऊं नका इथनं. तुम्हाला नको असलं, तर ती आल्यावर मी बसायची सुद्धां नाहीं इथं–" असं म्हणून ती केविलवाण्या नजरेनं माझ्याकडे पाहूं लागली.

" असं का वाटलं तुला तुला जने ? " मी तिच्याकडे रोखून पहात विचारलं, " ती आली तर बसणार नाहीं असं कां म्हणतेस तूं ? "

" खरं सांगूं–" जनी काकुळतीला येऊन म्हणाली, " मी आज अगदीं हट्टानं बसलें इथं. मला वाटत होतं, कीं मी बसलें हें कांहीं तुम्हाला आवडलं नाहीं. तरीही मी बसून राहिलें–उठून जावंसं वाटलं तरी सुद्धां बसून राहिलें–म्हणूनच मला वाईट वाटतंय आतां. राग नाहींना आला तुम्हाला ? आतां यापुढं असं कांहीं करायची नाहीं मी–तुम्ही थांब म्हटल्याशिवाय इथं बसायची नाहीं मुळींच !––" तिच्या त्या चमत्कारिक भाषणाचं मला मोठं कौतुक वाटलं. कुणबीपणाच्या बाहेरच्या बोजड आवरणाखालीं झाकून पडलेलं तिचं सोज्वळ अंतःकरण मला तिच्या त्या काकुळतवाणींत दिसत होतं. नुसते ते शब्द वाचून तिच्या त्या वेळच्या मनःस्थितीची कल्पना करतां येणार नाहीं. ज्या जिव्हाळ्यानं आंतडं पिळवटून ती बोलत होती, त्या कोवळ्या मनाच्या केविलवाण्या आणि साध्या भाषेनं बोललेल्या उद्गाराचं यथातथ्य स्वरूप लिहिलेल्या शब्दांनीं कळायचं नाहीं. खरोखरच मला तिची दया आली. तरीही कठोरपणानं मी तिला म्हटलं, " एवढं विवळायला काय झालंय तुला ? मी तुला रागं भरलों होतों का ? एका शब्दानं तरी तसं कांहीं बोललों का ? "

" तुम्ही बोललां नाहींत पण माझी चूक मला कळते ना ? " जनी म्हणाली, " आतां राग राहिला नाहीं ना तुमचा ? "

" पण मी रागावलों असं तुला कां वाटलं ? "

" मी केलंच तसं मग कां राग येऊं नये तुम्हाला ? राग आला नाहीं म्हटलंत तरी मला खरं वाटायचं नाहीं. "

" मग नाइलाज आहे माझा ! " मी डोक्यावर टोपी ठेवीत म्हणालों, " आतां गेलं पाहिजे मला. आज भात टाकूं नकोस. नुसता दशमी झुणका कर म्हणजे झालं. " असं म्हणून मी घराबाहेर निघालों.

थोड्या अंतरावरून मी मागं वळून पाहिलं, तों दारांत उभी राहून जनी पदरानं आपले डोळे पुशीत होती असं मला दिसून आलं.

प्रकरण ९ वें

# मी गांवकींत सांपडलों

चरखे आले आणि सूत कातण्याचे वर्ग सुरू झाले. पांढरपेशे लोक या वर्गाची थट्टा करीत होते. गांवांत नसलेली इंग्रजी शाळा सुरू झाली याजबद्दल विरोध नसला तरी असमाधान व्यक्त केलं जात नव्हतं. वाणी, मराठे, कुणबी यांचीं मुलं इंग्रजी शिकत आहेत याबद्दल जेवढं कांहीं वैषम्य दाखवलं जात होतं तेवढंच. पण आतां ब्राह्मणांचीं बहुतेक मुलं शाळेंत येऊं लागल्यापासून तो विरोधाचा अंशही नाहींसा झाल्यासारखा झाला होता.

चरख्याचे वर्ग सुरू झाल्यानंतर मात्र लगेच या विरोधानं उचल खाल्ली. सूत कांतण्याचं काम शिकवण्यासाठीं किकी येत होती तरीही प्रत्यक्ष तिच्या घरच्या मुलांना या कामीं भाग घेण्याची मनाई करण्यांत आली होती. दोन्ही बाजूच्या ब्राह्मणवठारांतील एकदोनच मुल खुषीनं चरखे चालवूं लागलीं होतीं. इतर मुलं चरख्यावर बसत असलेलीं पाहून बाकीच्या मुलांना आपणही तेंच काम करावं असं वाटे पण घरच्या बंदीमुळं त्यांचा नाइलाज होई.

हें चरख्याचं शिक्षण घ्यायला किकीलाही फारसे दिवस मिळण्याचा संभव नव्हता. पण दोनतीन दिवसांतच दोनतीन मुलं आणि जनी याकामीं चांगलीं तरबेज झालीं. या सर्वांनीं पहिल्यानं जवळ जवळ सारा दिवस हें काम शिकायला खर्ची घातला म्हणूनच या थोड्या मुदतींत दुसऱ्यांना शिकवण्याइतकी त्यांची तयारी झाली. हें नवीन शिक्षण देण्याच्या कामीं किकी सारखी गुंतून राहिल्यामुळं तिच्याशीं बोलायची संधी मला मुळींच मिळेना. ती स्वतःही या कामांत अगदीं गढून गेली होती. तीं स्वतः खादी वापरीत नसल्यामुळं चरखे चालवण्याच्या कामीं ती इतकी रंगून जाईल अशी मला कल्पना नव्हती. या चार दोन दिवसांतच मला असं दिसून आलं, कीं सूत काढण्याचं तिला अगदीं वेड होतं. कोकणच्या देवकापसाचं अगदीं बारीक सूत काढण्याचा प्रयोग तिनं याच वेळीं केला, आणि तो फार यशस्वी झाला. एवढ्या साध्या चरख्यावर इतकं तलम सूत निघेल अशी माझी सुद्धां कल्पना नव्हती. या नवीन शोधाचे जास्त मोठ्या प्रमाणांत प्रयोग करण्यासाठीं देवकापूस मिळवण्याचे व्यवस्थित प्रयत्न आम्ही सुरू केले.

लवकरच किकीला मुंबईला जाणं भाग होतं. सुट्टीच्या बाहेरही तिनं तीनचार दिवस रहाण्याचं ठरवलं आणि त्या मुदतीत या आमच्या नव्या प्रयोगाबद्दल जी जी व्यवस्था केली पाहिजे होती ती सर्व करून दिली.

हें सारं कांहीं व्यवस्थित चाललं होतं खरं, पण इकडे माझा जीव तडफडत होता. एकदां मन मोकळं करून तिच्याशीं बोलावं असं मला वाटत होतं. पण मी काय बोलणार होतों? ती तसं कांहींच बोलली नव्हती. कुठंच कांहीं धागादोरा नव्हता. मी कांहींतरी बोलायला गेलों असतों आणि त्याचा भलताच परिणाम झाला असता तर साराच डोलारा कोसळून पडला असता. किकी घरची फार श्रीमंत नसली तरी कोकणच्या मानानं बाबीकाकांचं घर समृद्ध समजलं जात असे. म्हणूनच तिला कॉलेजांत जाणं शक्य झालं होतं. मला कुणी विचारलं असतं तर मी माझ्या गृहस्थितीबद्दल काय सांगणार होतों? मला घरदार नव्हतं, जमीन-जुमला नव्हता, वतनवाडी नव्हती—फार काय, माझी नोकरी होती तीसुद्धां एका माणसाच्या अन्नवस्त्रापुरती होती. माझी गृहस्थिति अशी असतांना मी जर कांही बोलायचा प्रयत्न केला असता तर तें व्यावहारिक दृष्टीनं गैर झालं असतं.

अशा संबंधांत व्यावहारिक दृष्टीखेरीजही एक दृष्टि असते. विशेषतः कॉलेजांत वावरणाऱ्या मुलांचं जीवन या दृष्टीवरच आधारलेलं असतं. या दृष्टीच्या पायीं पुढल्या आयुष्यांत

कोणत्या प्रकारचे प्रसंग येतील याची अव्यवहारी असलेल्या भावनात्मक अशा कॉलेजांतल्या विद्यार्थ्याला मुळींच कल्पना नसते—इतकंच नव्हे, तर ती कल्पना करून परिस्थितीचा पडताळा घेण्याचं तो बुद्धिपुरस्सर टाळीत असतो.

भावनेच्या अन्नावर माणूस जगत नाहीं. भावनेच्या धुक्यावर तरंगतांना आयुष्याची वाटचाल किती बिकट होत असते याची त्याला कल्पना येत नाहीं. माझं तसं नव्हतं. भावनात्मकता अंतरंगांतल्या कोपऱ्यांत कुठंतरी जागी असली तरी मी तिच्या आहारीं जात नव्हतों. व्यवहार मला फारसा कळत नव्हता खरा पण अव्यवहारीपणाचा आरोप माझ्यावर येऊं नये म्हणून मी फार खबरदारी घेत होतों.

वस्तुस्थिति अशी असतांना मी किकीबरोबर काय बोलणार होतों ? मला वाटलं, चाललं आहे तेंच ठीक आहे. आज आपण कसलाही प्रस्ताव केला तरी तो अंमलांत आणणं शक्य नाहीं, मग बोला तरी कशाला ? जनीच्या प्रश्नाला उत्तर देतांना तिनं जी अंधुकशी कल्पना दिली होती तीमुळं माझं मन साशंक झालं होतं. कुठंतरी आणि कांहींतरी लागा-बांधा उत्पन्न झाल्याचं तिनं जें ध्वनित केलं तें कुणाच्या बाबतींत असावं याची मला कल्पना येत नव्हती खरी, पण केव्हा केव्हां वाटे, त्या उल्लेखाशीं माझा तर संबंध नसेल ?

असं वाटायला कांहीं कारण होतं असं मुळींच नाहीं. ती नुसती कल्पना होती—आशाळ-भूतपणाची कल्पना होती. त्या कल्पनेविषयी निराकरण करून घेऊन पुढल्या आशेला ठोकर देणं योग्य होणार नाहीं असं ठरवून मी स्वस्थ राहिलों.

सूत काढण्याच्या बाबतीत जनी अगदीं रंगून गेली होती. पहिल्यानं सक्तीनं तिनं तें काम हातीं घेतलं, पुढं चुरस उत्पन्न झाली, थोड्या अवधींत तिला त्या कामाची गोडी लागली आणि एक आठवड्याच्या आंत ती त्या कामांतली एक्सपर्ट् बनली. किकीला सुद्धां जनीचा अभिमान वाटूं लागला. ती म्हणाली, "आतां मला जायला हरकत नाहीं. जनी या कामीं अगदीं तरबेज झाली आहे. आतां तुम्हांला पुढल्या कामाला लागलं पाहिजे. सूत काढून त्याच्या गुंड्या वळून ठेवल्या म्हणजेच कांहीं सारं झालं नाहीं. कुठं तरी दुसऱ्या गांवीं सूत पाठवून कपडे तयार करून आणण्यांत मोठासा पुरुषार्थ नाहीं. आपल्या अन्ना-प्रमाणं आपलं वस्त्र आपणच तयार करून वापरण्यांत जो आनंद आहे—जो कैफ आहे-तो अनुभवल्याशिवाय या कार्याचं महत्त्व कुणाला पटायचं नाहीं—"

"थांब." मी म्हटलं, "मला सुद्धां हें पटतं. मागाच्या व्यवस्थेला लागायला मी आधींच अण्णांना सांगितलंय. पण मला आश्चर्य वाटतं तें हेंच, कीं एवढ्या कळकळीनं खादीचा अभिमान बाळगणाऱ्या माणसाच्या आंगावर हे गिरणीचे कपडे कां? स्वतःचं अन्न आणि स्वतःचं वस्त्र वापरायचं हें तत्त्वज्ञान नुसतं बोलण्यापुरतंच का आहे?"

किकी मोठमोठ्यानं हसूं लागली. तिचं तें हसणं मोठं केविलवाणं होतं. ती सारखी हसत होती. हसणं तिला आवरतां येत नव्हतं. एवढं हसायला काय झालं असं मला वाटूं लागलं आणि मी तसं विचारलं सुद्धां—तेव्हां ती म्हणाली, "प्रत्येकाच्या आयुष्यांत कांहीं गमती असतात. त्या गमती दुसऱ्याला सांगतां येत नाहींत. दुसऱ्याला सांगितल्यावर त्या गमती आहेत असं त्या ऐकणाराला कदाचित वाटायचंही नाहीं. तसलीच ही एक गंमत आहे. ती गंमत आठवली म्हणूनच मला हसूं लोटलं. पण तिचं वर्णन करून सांगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वेळ येईल त्यावेळीं तुमच्या या प्रश्नाचंही मी उत्तर देईन. आज मला कांहींच विचारूं नका."

अर्थातच मी तो विषय तेवढ्यावर सोडून दिला.

दुसऱ्या दिवशीं किकी मुंबईला निघून गेली. मला अगदीं चुकल्याचुकल्यासारखं वाटूं लागलं. रोज ती तिथं येत होती, सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखी काम करीत होती, आळीपाळीनं एकेकाला शिकवीत होती, तिचा तो अनावर उत्साह पाहूनच माझ्या डोळ्यांचं समाधान होत होतं, मला स्वतःलासुद्धां ती धडे देत होती, मीही सूत काढीत बसत होतों, त्यावेळी आम्ही फारसे बोलत नव्हतों—फारसे कां, क्वचितच बोलत होतों—नव्हे ती धडे देत असे तेवढं ऐकत होतों, तरीही मला एक प्रकारचं समाधान वाटत होतं. पण ती निघून गेल्यावर तिची उणीव मला तीव्रतेनं भासूं लागली. शाळेंतील मुलांच्या मनांत सूत काढण्याची आवड इतक्या थोडक्या अवधींत तिनं निर्माण केली तसं करणं मला शक्य झालं नसतं. न बोलतां ती काम करीत होती. एकाद्याच शब्दानं आपल्या विद्यार्थ्यांमधें चुरस उत्पन्न करीत होती. त्या चुरशीच्या कैफांत मुलं जोरजोरानं काम करित होतीं.

मला वाटलं, तें तसलं प्रोत्साहन देण्याचं सामर्थ्य माझ्या ठायीं नाहीं.

कल्पनेचे मनोरे बांधायची मला संवय नव्हती. पण या अगदींच थोड्या दिवसांच्या कार्यक्रमांतून मला नवी दिशा दिसली. काम करण्याची मला आवड होती खरी पण त्या आवडीची आत्यंतिकता, तें कामाचं वेड—तो कैफ जेवढ्या प्रमाणांत किकीच्या आंगीं

होता तेवढा माझ्या ठायीं नाहीं असं माझं मलाच जाणवूं लागलं. म्हणूनच मी कल्पनेचे मनोरे बांधूं लागलों. माझ्या ठायीं असलेली ही उणीव भरून काढायला किकीच समर्थ आहे असं पुनःपुन्हा मला वाटूं लागलं.

मुंबईत कॉलेजांत असताना किकीबद्दलचे जे प्रवाद होते त्यांच्याशीं मी नव्या अनुभवाचा मेळ घालून पाहूं लागलों, तेव्हां कुठंच कांहीं जमत नाहीं असं मला दिसून आलं. तिथं तिला सारे लोक फाजील म्हणत होते, उनाड म्हणत होते—बेफाम वर्तनाच्या निरनिराळ्या आरोपाखालीं तिचं नांव बद्दू होत होतं. त्यावेळीं तिचा माझा परिचय नव्हता—मी जे कांहीं अंदाज केले होते ते या प्रवादांच्या अनुरोधानंच. तरीही तिच्याबद्दल त्या वेळींही मला सहानुभूती होती. ते तसले प्रवाद असतांना सुद्धां मीं तिला हेरून ठेवलं होतं यांतच माझ्या मनोभावनेची साक्ष पटत होती. या अगदींच थोड्या कालाच्या अनुभवानं त्या प्रवादांच्या खरेपणाबद्दल मला शंका उत्पन्न होऊं लागली.

पण शंका तरी कशी म्हणूं? तिचं वर्णन बरंचसं दुटप्पीं होतं. सूत काढण्याचा तिला एवढा अभिमान पण तीं स्वतः खादी वापरीत नव्हती कां ! मुंबईत तीं नित्यनियमानं सूत काढीत होती कीं काय हें मला माहीत नव्हतं—मी तिला विचारलंही नव्हतं-पण हा जर तिचा नित्यक्रम असेल तर तिच्या संग्रहाला बरंच सूत पडलं पाहिजे होतं. त्या सुताचा कपडा तिनं काढून घेतला नसेल का? आणि घेतला असला तर ती तो वापरीत कां नाहीं? कीं आपल्या नुसत्या सुताच्या गुंड्या रचून ठेवल्या होत्या तिनं? हे प्रश्न कां मी तिला विचारले नाहींत?

माझा उणेपणा मला जाणवूं लागला. तिच्यासमोर मी हतप्रभ होत होतों असं मला वाटलं आणि म्हणूनच तिच्या जोडीशिवाय माझी उणीव भरून यायची नाहीं असा माझा समज होऊं लागला.

मला आश्चर्य वाटूं लागलं तें जनीचं. चरख्याचं तिला वेड लागलं होतं. दिवस नाहीं, रात्र नाहीं, हातचं काम संपलं कीं ती सारखी सूत काढीत बसत असे. नको म्हटलं तर ऐकत नसे. तोंपर्यंत तिच्या हट्टी स्वभावाची मला कल्पना आली नव्हती.

किकी मुंबईला निघून गेल्यानंतर आठदहा दिवसानीं बाबीकाका मला भेटायला आले. त्यावेळीं मी एकटाच घरीं होतों. तसंच कांहीं काम असल्याशिवाय ते माझ्याकडे येणार

नाहींत हें मीं जाणत होतों. म्हणून ते येतांच आज माझ्यावर कांहींतरी मारा होणार अशी अपेक्षा करूनच मी त्यांचं स्वागत केलं.

बाबीकाका म्हणाले, "हें कसलं काम चालवलंय तुम्हीं ! आमचा समज होता, कीं शाळा चालवण्यासाठीं तुम्हाला आणलं आहे. तें टाकून हीं नवीं ढोंगं कसली सुरू केलीं आहेत तुम्हीं ?"

त्यांचा रोख चरख्यावर होता याची मला कल्पना आली. पण प्रत्यक्ष त्यांनीं तसा आरोप करीपर्यंत सरळ उत्तर द्यायचं नाहीं असं ठरवून मी म्हणालों, "आपला समज चुकीचा झाला आहे असं मला वाटतं. मुंबईच्या कॉंग्रेस कमिटीच्या वतीनें मी इथं आलों आहें. मला कॉंग्रेसनं आखून दिलेले कार्यक्रम अमलांत आणायचे आहेत. शाळा चालवणं ही त्यांतली एक बाब आहे—तेवढ्याच एका कामासाठीं मी इथं आलों नाही."

"मग काय काय आहेत हे तुमचे कॉंग्रेसचे कार्यक्रम ?" बाबीकाका खवचटपणानं म्हणाले.

"कॉंग्रेसचे कार्यक्रन जगजाहीर आहेत. मला वाटतं आपल्याला सुद्धां माहीत असतील.—"

"छे छे, नाहीं हो. पहिल्यापासूनच आम्ही या कॉंग्रेसच्या भानगडींत पडलों नाहीं. आम्ही आपले टिळकवाले लोक आहोंत. हीं तुमचीं नवीं ढोंगं आमच्या परिचयाचीं नाहींत आणि त्यांचा परिचय करून घ्यायची आम्हाला जरूरीही वाटत नाहीं.'

"होय ना ? मग आपण इकडे पाहूं नका. आमचं काम आम्हाला करूं द्या. त्याचा परिणाम काय होतो तें आपण स्वस्थपणें पहा. तोपर्यंत उगीच गैरसमज करून घेऊं नका, एवढीच माझी तुम्हाला विनंति आहे."

बाबीकाका कांहीं वेळ स्वस्थ बसले. खिशांतील आडकित्ता सुपारी काढून कातरीत कातरीत ते म्हणाले, "तें एक राहूं द्या, पण आमची कमा इथं येत होती ?"

"हो."

"कां येत होती इथं ?"

"तुम्हाला सांगितलं नाहीं तिनं ?"

" मला कशाला सांगेल ती ? आम्ही काय तिच्या खिजगणतींत आहों ? "

" असं कसं होईल ? ती कां येत होती हें आपल्याला कळलंच असलं पाहिजे. "

" तसं कळतंय मला, पण तिनं होऊन कांहीं सांगितलं नाहीं. कां येत होती ती ? "

" तिनं सांगितलं नाहीं आपल्याला—पण आपण कां नाहीं विचारलं तिला ? "

" मी पुष्कळ विचारलं, पण ती सांगायला हवी ना ? म्हणूनच तुम्हाला विचारतोंय. "

मला विचार पडला. तिनं कांहीं सांगितलं नाहीं तर आपण तें सांगणं इष्ट होईल का ? ती कां येत होती हें साऱ्या गांवाला माहीत होतं, बाबीकाकांना तें कळलं नसेल असं म्हणतां आलं नसतं, मग मलाच विचारण्यांत काय उद्देश होता त्यांचा ?

मी उगीच राहिलों असं पाहून बाबीकाकांनीं बोलायला सुरवात केली. ते म्हणाले, " असं पहा रघुनाथराव, आम्ही आपलीं जुन्या काळचीं माणसं आहों. नवे ढंग आम्हाला आवडत नाहींत आणि पटतही नाहींत. मग ते ढंग घरगुती असोत कीं राजकारणाचे असोत. आम्ही आपले जुन्या मळलेल्या वाटेनं जाणारे लोक आहोंत. तुम्हीं इथं जे आलां आहांत ते कांहींतरी विशेष उद्देशानं आलां आहांत. त्या तुमच्या उद्देशाला आम्हा लोकांचा पाठिंबा नाहीं. हे वाणी उदमी लोक नाचताहेत—आम्ही म्हणतों नाचेनात का—नवं मिळालं कीं अशीच चार दिवस त्यांची बकवा चालते आणखीन् चार दिवसांनीं सारं कांहीं सामसूम होतं—तसेंच हे उद्यां सारे थंडावतील आणि तुम्हांला मुंबईला जावं लागेल. म्हणून म्हणतों, इथं आहांत तोंपर्यंत भलत्या भानगडी करूं नका—"

मला त्यांच्या भाष्याची चीड आली. त्यांच्या प्रत्येक शब्दांत अंतःकरणांतलं विष भरून राहिलं होतं. मी मधेंच म्हणालों, " भलते आरोप माझ्यावर केलेलेही मला खपणार नाहींत. कसल्या भानगडी म्हणतां आपण ? "

" आतां स्पष्टच सांगतों. " अवसान आणून बाबीकाका डोळे फिरवीत म्हणाले, " इथं ही सुभद्रेची पोरगी असते तुमच्या घरीं—तिच्याच हातचं जेवतां तुम्ही—त्याच्याशीं आम्हाला कांहीं कर्तव्य नाहीं म्हणा, आतां कोण धर्माला विचारतोय—पण ती इथंच रहाते—"

" ती इथं रहात नाहीं. " मी ठासून सांगितलं.

" बरं बरं ! " बाबीकाका थंडावून म्हणाले, " इथं नसेल रहात. पण तिचं तुमचं चांगलं जुळलंय म्हणतात—"

" कोण म्हणतात ? " मी चिडून विचारलं.

" सारा गांव बोलतो. "

" कांहीं नाहीं सारा गांव बोलत. गांवाबाहेरचीं आपलीं चार घरं बोलत असतील. हेंच विचारायला आलां होतां का आपण ? "

" बरं तें राहूं द्या, " कातरलेली सुपारी तोंडांत टाकीत बाबीकाका म्हणाले, " उभा दिवस आमची कमी इथं येऊन काय करीत होती ? "

" तुमच्याच मुलाबाळांना विचारा तें. "

" पण तुम्ही सांगा ना—सरळ असलं तर सांगायला कां हरकत वाटते तुम्हांला ? "

" मला कांहीं सांगायचं नाहीं. माझ्या पद्धतीप्रमाणं मी माझं काम चालवलंय. मला प्रश्न करायचा अधिकार ज्यांना आहे त्यांची कांहींच तक्रार नाहीं. ते तक्रार करतील त्यावेळीं मी उत्तर देईन. "

" पण माझ्या मुलीचा प्रश्न आहे हा. माझी मुलगी इथं कां येत होती, इतका वेळ कां रहात होती, काय करीत होती , तें मला कळलं पाहिजे. "

" तें तुम्ही आपल्या मुलीलाच विचारा. तुम्हाला उत्तर द्यायला मी बांधलेला नाहीं. "

" हें बरं नव्हे रघुनाथराव ! " आवाज चढवून बाबीकाका म्हणाले, " आम्ही तुम्हाला बोलावलं नसेल, पण आम्ही सुद्धां गांवकरीच आहोंत. गांवचे मानकरी या नात्यानं आम्हा-लाही कांहीं अधिकार आहे याची तुम्हाला कदाचित कल्पना नसेल. ही मगरुरी बरी नव्हे एवढंच मी तुम्हाला सांगून ठेवतों. "

" अन् मीही तें ऐकून ठेवतों ! " मी शांतपणानं उत्तर दिलं. " याशिवाय कांहीं विचारायचंय ? "

एक शब्दसुद्धां न बोलतां बाबीकाका रागारागानं उठून गेले.

मी आपल्यापरीनं डोकं शांत ठेवायचा प्रयत्न केला होता. पण त्या माणसाचं वागणं इतकं चमत्कारिक होतं, इतकं मस्तवालपणाचं होतं, कीं तें पाहिल्यावर एकादा स्थितप्रज्ञ योगी सुद्धां चिडला असता. किक्रीबद्दल विचारलं त्याचं मला कांहीं वाटलं नाहीं. जनीची उठाठेव यांनीं कां करावी ? कुणाच्या कल्पनेंत सुद्धां नसलेले आळ माझ्यावर कां घ्यावे ? मला वाटलं, हा त्यांचा डाव असावा. माझं नांव बद्दू होण्यासाठीं माझ्यावर हा असला

घाणेरडा आरोप घालून मला इथून घालवून लावण्याचा हा त्यांचा बेत असावा. यांत त्यांचे दोन उद्देश सिद्ध झाले असते. एक माझी नाचक्की झाली असती, आणि त्यामुळं किऱ्हीच्या मनांतही माझ्याबद्दल संशय आला असता; आणि दुसरा, गांवच्या लोकांनीं त्यांच्या संमतीविरुद्ध सुरू केलेली चळवळ मी गेल्यानं बंद पडली असती. एकदां मी निघून गेल्यावर दुसरा माणूस आणणं कदाचित कठीण गेलं असतं.

मी त्याच वेळीं जाऊन सारी हकिकत अण्णांना सांगितली आणि म्हटलं, " मला वाटतं जनीला रजा द्यावी आणि दुसरा कुणीतरी पुरुष घरकामासाठीं ठेवून द्यावा. "

" छे छे ! मुळींच नाहीं—" अण्णा म्हणाले, " अशी पड खाल्ली तर ते लोक शेफारून उठतील. प्रत्येक प्रकरणांत नव्या नव्या क्लृप्त्या काढतील ! आणि प्रत्येक बाबतींत मग आपल्याला पड खावी लागेल. ते कांहीं नाहीं. जसं चाललंय तसंच चालू द्या. आमचा तुमच्यावर विश्वास आहे. उघड्या डोळ्यांनीं आम्ही पहातों आहोंत. एवढ्या मुलाबाळांत तुम्हीं वावरतां आहांत, तिथं भलतीं कुभांडं तुमच्यावर घेण्याइतका हलकटपणा आम्हीं करणार नाहीं. "

तेवढ्यापुरतं माझं समाधान झालं खरं पण मनाला लागलेली रुखरुख कांहीं केल्या थांबेना. अंदाज घ्यावा म्हणून मी जनीला म्हटलं, " मी आतां दुसरा माणूस ठेवणार आहें जने. यापुढं तुझं इथं येणं बंद आणि शिक्षणही बंद. "

" अस्सं ! " जनी डोळे मुरडून म्हणाली, " बाबीकाका भेटले वाटतं ? "

" बाबीकाकांचा यांत काय संबंध ? "

" मला सारं कांहीं माहीत आहे. बामणवठारात जातें कीं नाहीं मी—तिकडे चाललीं-यत हल्लीं खलबतं. कमाताई येत होती ना इथं, ती मिरची झोंबलीय त्यांना. चरखा म्हटला कीं त्या लोकांची पायाची तिडीक मस्तकाला जाते. अन् कमाताई इथं येऊन चरखा चालवायला शिकवीत होती म्हणून डोंब झालाय त्यांच्या अंगाचा. त्याचं उट्टं असं काढता-यत माझ्यावर आग पाखडून ! मला अन् तुम्हाला जन्मांतून उठवायचा बेत आहे त्यांचा. त्यांचं ऐकून का घालवून देणार मला तुम्हीं ? "

जनीचा तो करारीपणा पाहून मला माझी लाज वाटली. अण्णा तसंच म्हणतात, जनीही तसंच म्हणते, मग मी कां कुणाला भ्यावं ?

मी विचारलं, " तुझ्या आजीच्या कानावर गेलीय का ही कळ ? ती काय म्हणते ? "

" माझी आजी होय ? " जनी तुच्छतेनं हसत म्हणाली, " त्या सगळ्यांच्या बारश्याच्या घुगऱ्या खाऊन बसलीय माझी आजी. सगळयांचीं अंडींपिल्लीं माहीत आहेत तिला. अजून तिच्या कानीं कांहीं गेलं नाहीं; पण जर का गेलं तर ती एकेकाचीं बिंगं चवाठ्यावर मांडील अन् मग तोंड दाखवायला सुद्धां जागा राहायची नाहीं कुणाला. "

गांवच्या भानगडींची मला कांहींच कल्पना नव्हती आणि असल्या प्रकरणीं फार खोलांत शिरायची मला इच्छाही नव्हती. मी तिला म्हटलं, " इतरांच्या भानगडींशी मला कांहीं कर्तव्य नाहीं. माझी अब्रू मला सांभाळली पाहिजे—"

" खोट्या आरोपाला भिऊन का तुम्ही मला घालवून देणार आहांत ? " जनी चिडून म्हणाली, " मग इथं येऊन आम्हां लोकांना तुम्ही शिकवणार काय ? हाच का तुमचा गुरूपणा ?—"

" बरं बरं—" मी म्हटलं, " सध्यां त्या गोष्टीचा विचार नको. सध्यां तरी मी तुला घालवून देत नाहीं. "

जनीचा चेहरा आनंदानं फुलून उठला.

यापुढं आपल्याला फार जपून वागलं पाहिजे याची खूणगांठ मी त्या दिवशीं बांधली.

## प्रकरण १० वें

# मी किकीची वाट पाहूं लागलों

वरील प्रकार घडल्यानंतर काहीं दिवसपर्यंत आमचे सर्व व्यवहार सुरळित चालले होते. देवकापसाचं सूत काढायचे प्रयोग मी स्वत: सुरू केले होते. जनी त्या कामीं मला चांगलीच मदत करीत होती. चरख्यावर तिचा हात आतां चांगला चालत होता. देवकापसाचा धागा फारच सुंदर निघत होता.

दोन माग आणवण्यांत आले. ते चालवण्यासाठीं जे दोन कोष्टी आणवले होते त्यांनीं पहिल्यापहिल्यानं आम्हाला फारच त्रास दिला. गिरणीच्या सुताची त्यांना संवय लागली असल्यामुळं हातसुताचं काम करायला ते पहिल्यानं तयार होत नव्हते. हें आमच्याकडचं पहिलं सूत सुद्धां तितकं चांगलं नव्हतं. पण जनीनं काढलेल्या पिळदार धाग्याच्या बाबतींत त्यांना तक्रार करतां येईना. हळुहळु त्यांना आमचं धोरण पटूं लागलं. गिरणीच्या सुतावर अवलंबून राहिल्यामुळं आपण कसे परावलंबी झालों आहोंत याची जाणीव त्यांना जेव्हां करून दिली तेव्हां ते आमच्याशीं मिळतं घ्यायला तयार झाले.

पहिला कपडा बराच बोजड निघाला होता. पण स्वतःच्या सुताचा कपडा म्हणून प्रत्येक मुलगा त्याचं कुडतं घालून अभिमानानं मिरवूं लागला. सबंध लुगड्याला पुरेल एवढं सूत काढायची जनीनं तयारी चालवली होती. माझ्या सुतांत दोन सद्र्यांपुरतं कापड निघालं. त्याचे सद्रे करून जेव्हां मी आंगांत घातले तेव्हांच आजपर्यंत मला ज्या भावनेचं पूर्ण आकलन झालं नव्हतं त्या भावनेमागील भूमिका हृदयगम्य झाली. 'माझ्या सुताचा सद्रा' असं म्हणतांना जो अभिमान वाटत होता त्याचं आविष्करण करणं शक्य नव्हतं. ती प्रत्यक्ष अनुभवाची गोष्ट होती. दुसऱ्याला सांगून पटवण्याजोगी अशी कोणतीच चर्चा त्या प्रकरणीं करतां आली नसती.

प्रयोगासाठीं म्हणून काढलेले हे लहान लहान तुकडे पुढल्या कामाला उत्तेजन यायला साधनीभूत झाले. गांवांतली चरख्यांची संख्या वाढूं लागली. घरीं रिकाम्या असलेल्या बायका जनीला बोलावून सूत काढायला शिकूं लागल्या. हा मुलांनीं सूत काढून तयार केलेल्या कपड्यांचा परिणाम होता हें जेव्हां मला कळलं तेव्हां खादीची निपज वाढवण्याचा मला हुरूप येऊं लागला. या कामीं जनी अगदीं वेडी झाली होती. मुद्दाम प्रत्येकाच्या घरीं जाऊन आपला चरखा घेऊन ती सर्वांना सूत काढून दाखवीत असे. चालत असलेला माग पहायला सर्वांना घेऊन येत असे. या तिच्या प्रयत्नामुळं गांवच्या बायकांना या विषयाची गोडी लागली. नुसत्या चकाट्या पिटीत बसण्यापेक्षां सूत काढीत चकाट्या पिटणं त्यांना आवडूं लागलं. अण्णांनीं एका घराची एक मोठी ओटी या कामासाठीं मिळवून दिली आणि तिथं गांवच्या दहाबारा बायका बसून रोज सूत काढूं लागल्या.

शाळेची प्रगतीही चांगली होत होती. मुलांची संख्या मात्र फारशी वाढली नव्हती. गांवच्या मानानं शाळेची फी जरा जास्तच होती पण एवढी फी ठेवल्याखेरीज खर्चाची तोंड-मिळवणी झाली नसती.

कामाचा व्याप आतां एवढा वाढला होता, कीं मला क्षणभरसुद्धां फुरसत मिळत नव्हती. आतां कुणीतरी जोडीला सहकारी पाहिजे असं मला वाटूं लागलं. निमगांवीं मी आलों त्याला आतां जवळ जवळ वर्ष होत येत होतं. एवढ्या मुदतीच्या मानानं ही प्रगती समाधानकारक झाली असं अण्णा, धोंडशेट प्रभृति गांवकऱ्यांना जरी वाटत होतं तरी तेवढ्यानं माझं समाधान होत नव्हतं. बाहेरच्या जगाशीं माझा संबंध तुटल्यासारखा झाला होता. वर्तमानपत्रं वाचून जेवढं कांहीं कळेल तेवढ्यावरच समाधान मानून घेण्याखेरीज दुसरा

उपाय नव्हता. वर्तमानपत्रांतील बातम्यांवरून परिस्थितीची यथार्थ कल्पना येत नाहीं असा माझा समज वर्तमानपत्राच्या ऑफिसांत कांहीं दिवस काम केल्यामुळें झाला होता. तरीही हें गांव सोडून मुंबईला जावं असं मला वाटत नव्हतं. गांवांतील लहानथोर मंडळींशीं माझा लोभ जडला होता. प्रत्येक जण आपुलकीच्या दृष्टीनं माझ्याकडे पाही, तसंच कांहीं असलं तर मला आपल्या घरीं बोलावी, त्यांच्या उत्सवांत, लग्नकार्यांत मी तितक्याच आपुलकीनं भाग घेई, त्यामुळं या गांवाचा मला लोभ जडूं लागला होता.

ब्राह्मणवठारांतील मंडळीचा विरोध मात्र पूर्वीइतकाच कायम होता. पहिल्यानं जीं कांहीं ब्राह्मणांचीं मुलं शाळेंत आलीं त्यानंतर तिकडलीं फारशीं मुलं अजून येऊं लागलीं नव्हतीं. जीं आलीं होतीं ती किकीच्या प्रेरणेमुळंच, असं आतां मला वाटूं लागलं.

परिक्षा संपून त्याचवेळीं किकी गावीं आली. ती आल्याची वर्दी जनीनं मला दिली. बाबीकाकांची जी मुलाखत कांहीं दिवसांपूर्वी झाली होती त्यानंतर किकी मला भेटायला येईल कीं नाहीं याची शंका होती.

जनीला हल्लीं बाबीकाकांचं घर वर्ज झालं होतं हें त्या दिवसापर्यंत तिनं मला सांगितलं नव्हतं. किकीला भेटून ये असं मी सांगितलं त्याचवेळीं या बंदीचा उल्लेख तिनं माझ्याकडे केला. बाहेरून तिला बातमी कळली तेवढी तिनं येऊन मला सांगितली.

किकी भेटायला येणार या अपेक्षेनें मी अगदीं उतावीळ झालों होतों. माझ्या या उत्कंठेबद्दल माझी मलाच लाज वाटूं लागली. कां मला असं वाटावं ?; ज्या या वातावरणांत मी स्वतःला सामावून घेतलं होतं तें वातावरण माझ्या मूळ प्रकृतीशीं अनुरूप नव्हतं. सक्तीनं मी ही परिस्थिति पत्करली होती. ही सक्ती सरकारी नोकरीची असती तर मला दुःसह झाली असती. पण मी बुद्धिपुरस्सर—मागल्या पुढल्या गोष्टींचा विचार करून—त्यागबुद्धीनं इथं येऊन राहिलों असल्यामुळं तक्रार करण्याचा प्रश्नच निघत नव्हता.

मी आपल्या मनाशीं विचार करून पाहूं लागलों त्यावेळीं मला वाटलं, कीं ही तक्रार नव्हती—मुद्दाम केलेल्या त्यागाचा पश्चात्तापही मला होत नव्हता—निराळ्या दर्जाच्या वातावरणांत सक्तीनं सांपडल्यामुळं उत्पन्न झालेली ती विरक्तीही नव्हती—मग किकीच्या भेटीसाठीं मी इतका उतावीळ का झालों ?

समान मनोभूमिकेचीं माणसं दुरावल्यामुळं उत्पन्न झालेल्या आसोसानं किकीला भेटण्यासाठीं मी उतावीळ झालों होतों, कीं त्याला दुसरंच कांहीं कारण होतं ?

' दुसरंच कांहीं कारण ' हा विचार माझ्या मनांत येतांच मला एक प्रकारचा धक्का बसला. हें दुसरं कारण कोणतं ? तारुण्यसुलभ मनोधर्मांच्या प्रकर्षानं उत्पन्न झालेली समानधर्मी युवती क्षणभर भेटावी अशी ती उत्कंठा होती का ? कीं यापेक्षांही जास्त भावनात्मक अशी दुसरीच कांहींतरी सूक्ष्म वृत्ती होती ?

ती उत्कंठा अगदीं अनावार झाली होती हें माझं मला कळत होतं. लोक नांव ठेवतील ही भीति नसती तर मी सरळ जाऊन किकीला भेटलों असतों, इतका मी उतावीळ झालों होतों. पुनः पुन्हा मी जनीला विचारूं लागलों तेव्हां ती म्हणाली, " ती आपली मालकीण कुठाय ? दैत्यासारखा हा बाप—त्यानं जाऊं नको म्हटलं तर जायची छाती तिला व्हायची नाहीं. "

" मग पूर्वी कशी येत होती ? "

" त्यावेळीं त्यांनीं नको—होय कांहींच म्हटलं नव्हतं—विचारलंसुद्धां नव्हतं. आतां प्रकरण अटीतटीवर आलं आहे तुमची त्यांची इथं चकमक झाली तेव्हांपासून ते बाहेर काय बोलतात तें तुम्हांला कळलं असतं तर हा प्रश्नच केला नसता तुम्हीं ! "

मी उगीच राहिलों. बोलायला गेलों तर माझी अनावर उत्कंठा जनीच्या ध्यानीं येईल म्हणून मी उगी राहिलों खरा पण तीक्ष्ण दृष्टीच्या जनीसमोर तें झाकून राहिलं नाहीं. मी बोलत नाहीं असं पाहून ती म्हणाली, " काय करूं ? माझा अगदीं नाइलाज झालाय. ती कुठंच घराबाहेर पडत नाहीं. नाहींतर मी तिला कुठंतरी गांठली असती. मला कळतंय—तुम्ही सांगायची जरूरी नाहीं—तुमच्या जागीं मी असतें तर मला दिखील असंच वाटलं असतं—"

" काय वाटलं असतं ?" मी थोड्याशा रागाच्या आवाजांत विचारलं.

जनी हसली—नित्याच्या सरावाप्रमाणें माझ्याकडे पहात डोळे मुरडून मानेला हिसडा देत म्हणाली, " तें बोलायला कशाला लावतां मला ? कुणब्याची पोर असलें तरी माझं काळीज माणसाचंच आहे. " असं म्हणून झट्‌कन ती तिथून निघून गेली.

मी अगदींच शरमलों होतों. उतावीळपणामुळं जनीसमोर आपलं रहस्य उघडं पडलं असंच मला वाटलं. असं व्हायला नको होतं. जनीनं तें उक्त केलं नसतं, पण माझ्याबद्दल तिचा जो आदर होता त्या सात्त्विकतेच्या भावनेवर असला आघात व्हायला नको होता.

## मी किकीची वाट पाहूं लागलों

असेच आणखी चारपांच दिवस गेले. नित्याचीं कामं मी लक्षपूर्वक करीत होतों खरा पण मनाची हुरहुर कांहीं थांबत नव्हती. हा माझा कमकुवतपणा आहे हें मला कळत होतं. पण कळत असूनही मला मन आवरतां येत नव्हतं. किकीच्या भेटीसाठीं मी अगदीं व्याकुळ झालों होतों. ती माझी आतुरता न दिसूं देतां काय करावं याचा विचार मी करीत असतां अण्णा तिथं आले. येतां येतांच ते म्हणाले, "काय गंमत पहा गुरुजी, बाप हा असा–पण मुलगी पहा कशी निपजली ती—"

"कुठला बाप ?" मी विचारलं, "अन् कुठली मुलगी ?"

"हे आमचे बाबीकाका––" अण्णा म्हणाले, "––असला हा नतद्रष्ट बाप, पण त्याची मुलगी तिकडे भटवाडींत काय करतेय पहा."

"काय करतेय ?"

"मुंबईहून येतांना तिनं कसले घडीचे चरखे आणलेयत म्हणे—खूप पेळूही आणलेयत ! अन् बक्षिसं लावून पोरांकडून सूत काढून घेतेय. एक चांगला अड्डाच बसवला आहे तिनं करुणेश्वराच्या देवळांत ! मारे आग झालीय सगळ्या लोकांची ! पण पोरांना काय, आणा दोन आणे बक्षिसाची लालूच पुरेशी होते. मला वाईट वाटत तें हेंच, कीं आम्हाला कसं हें सुचलं नाहीं ? आम्ही अशीं बक्षिसं लावलीं असती तर कितीतरी पोरं इथं चरख्यावर बसलीं असतीं. मोठी विलक्षण पोर आहे ही !"

माझं हृदय भरून आलं होतं पण मी बोलायला तोंड उघडलं नाहीं. मला आश्चर्य वाटलं तें हेंच, कीं या गोष्टी जनींला कशा कळल्या नाहींत ! कीं कळून सवरून तिनं मुद्दामच मला सांगितल्या नाहींत ? बाबीकाकांच्या घरीं जायला तिला बंदी होती पण देवळांत जर बैठक भरत होती, तर तिथं तिनं कां जाऊन येऊं नये ?

मी कांहींच बोलत नाहीं असं पाहून अण्णा म्हणाले, "एकंदरींत तिनं बरा चालवलाय हा प्रचार. अजून ती इकडे कशी आली नाहीं म्हणून मला आश्चर्य वाटत होतं. आमचे हे माग दाखवायचे होते तिला—कपडा काढलेला दाखवायचा होता––पण ती या कामांत गुंतली होती मग येईल कशी ? एकदां स्वतःच जाऊन पाहून आलं पाहिजे मला."

अण्णांचा तो बेत ऐकून मला समाधान वाटलं. आतां कळेल मला !

"मग याच एकदां जाऊन—" मी शांतपणानं म्हणालों, " तिकडे काम चाललंय हें

कांहीं वाईट नाहीं. उलट बरंच आहे—पण ती इकडे आली असती तर आपल्याला बरीच मदत झाली असती—नाहीं ?"

"होय तर!" अण्णा म्हणाले, "म्हणूनच तर मी जाऊन येणार आहें. इतके दिवस झाले, पण एकसुद्धां फेरी टाकली नाहीं तिनं या बाजूला. असं कां झालं तें मला पाहिलं पाहिजे."

माझं काम आयतंच झालं असं मला वाटलं. जनी आली त्यावेळीं मी तिला म्हणालों, "हें कां ग चोरून ठेवलंस माझ्याकडून ? तुझ्या कमाताईनं काय चालवलंय तिकडे ?"

"तें होय!" जनी तुच्छतेचा आव आणून म्हणाली, "त्यांत काय आहे एवढं ? पैशाची लालूच दाखवून का असलीं कामं होतात ? पैसे मिळतायत तोंपर्यंत चार पोरंपोरी गोळा होतील, अन् उद्यां पूर्वीच्यासारखे चरखे पडतील माळ्यावर."

"पण मला सांगितलं नाहींस तूं ?"

"काय सांगायचं त्यांत ?"

"तसं नव्हे, पण तिनं ही बैठक देवळांत ठेवलीय ना ? देवळांतच हे सुताचे वर्ग सुरू आहेत ना ?"

"हो!"

"मग ती तुला कशी नाहीं भेटली ?"

"कशी भेटेल मला ? मी गेलें तिकडे तर मला भेटणार ना ? अन् मी जाऊं कशाला ? काय माझं एवढं अडलंय ? तिनं तरी एकदां कां येऊं नये माझी चौकशी करायला ? माझं घर म्हणजे कांहीं म्हारवडा नव्हे. मग तिला तरी एवढा दिमाख कशाला ?"

मी थक्क झालों. हाच का तो कुणब्याचा अभिमान ?

"खरं आहे तें." मी म्हटलं, "तिलाच जर कळकळ नाहीं तर आपण तरी कशाला एवढी चौकशी करायची ?"

जनी हसली आणि म्हणाली, "मला वाटतं तिची चढाओढ चाललीय आमच्या बरोबर. पण म्हणावं, आमची सर कांहीं तुला यायची नाहीं. बामणांचीं नुसतीं चार घरं—काय दिवे लावणार आहेत तें माहीत आहे मला. चार दिवस खेळ खेळतील अन् उद्यां विसरून जातील. घरीं खायला आहे ना ? आम्ही इथं खपतों, रोज चारदोन आणे मिळ-

वर्तो ते संसाराला लागतायत आमच्या. ती पोरांना पैसे देते ते जातायत पेपरमिंटच्या वड्यांना—आणि म्हणे चरखे चालवते! उद्यां सूत घेऊन इथंच यावं लागेल म्हणावं. कीं पूर्वीसारख्या गुंड्या गुंडाळून लक्ष वाती लावणार आहेत देवासमोर?"

तिची ती वृत्ती पाहून मला मोठं कौतुक वाटलं. एक धडाही मिळाला. खेळ म्हणून हीं कामं होणार नाहींत. तिथं पोटतिडिक पाहिजे. जरुरीची आंच पाहिजे. भुकेची आग पाहिजे. आमच्याकडे जीं मुलं येत होतीं त्यांना सुताचे पैसे आम्ही देत होतों. ते त्यांच्या प्रपंचाला लागतात हें मला माहीत होतं. कित्येकांची शाळेची फी त्यांतूनच निघत होती. म्हणूनच कुणब्यामाळ्यांच्या मुलांची शाळेंत वाढ होत होती. दोन्ही कामं परस्परांना पूरक होत होतीं पण त्यांचा परस्परांशी संबंध आहे याची जाणीव जनीच्या या भाषणानंतरच मला आली. मला वाटलं, अजून कितीतरी शिकायचं आहे मला.

"मी सांगतें तुम्हाला गुरुजी," जनी म्हणाली, "तुम्ही तिच्याकडे लक्ष देऊं नका. इंग्रजी बोलायला मिळत नाहीं म्हणून तुमचा जीव खालींवर होतोय तें मला माहीत आहे—" माझ्याकडे पाहून डोळे मिचकावीत ती म्हणाली, "इंग्रजी बोललं म्हणजे बरं वाटतं नाहीं? अन् बायकांच्या तोंडचं इंग्रजी मोठं गोड लागतं नाहीं? आतां हें मला बाळबोध वाचतां येऊं लागलं. आतां इंग्रजी केव्हां शिकवणार आहांत मला?"

"म्हणूनच तर मी किकीची वाट पहात होतों—" मी चटकन बोलून गेलों आणि मग सावध झालों.

"किकी" जनी उद्गारली, "कोण किकी?"

"तिला किकी म्हणत तिकडे मुंबईला."

"कुणाला? कमाताईला? बरं मिळालं हें. आतां जानें हं तिला भेटायला—" असं म्हणून ती आंत जाऊन कामाला लागली.

नित्याप्रमाणें मी नदीकांठीं फिरायला निघालों होतों तों वाटेंत धोंडशेटची गांठ पडली. बोलत बोलत आम्ही दोघेही नदीकडे निघालों. ते म्हणाले, "चाललं आहे हें ठीक आहे, पण हे इथले लोक कसे चिकटून रहाणार याचीच मला काळजी वाटतेय. आपलं मुख्य काम अजून व्हावं तसं होत नाहीं. चांभारांचीं चारदोन पोरं येतात, पण तीं येतात म्हणून घरीं

गेल्यावर बाकीच्या मुलांचीं आईबापं त्यांना कपडे बदलायला लावतात, हें कांहीं बरं नाहीं; ही शिवाशीव गेली पाहिजे पहिल्यानं. पुरुषांपेक्षां बायकांनाच ही शिवाशीव जाणवते. या बायकांत थोडा प्रचार केला पाहिजे. अन् बायकांत प्रचार करायचा म्हणजे तें काम पुरुषांकडून व्हायचं नाहीं. किती दिवस मी विचार करतोंय याचा—"

" मलासुद्धां जाणवतंय तें. " मी म्हटलं, " पण असं वाटतं, सारेच प्रचार एकदम सुरू केले तर इथल्या लोकांना ते पेलणार नाहींत. एकाच्या पायीं दुसरं कार्य बिघडेल, म्हणून अस्पृश्यतानिवारणाची मी घाई करीत नाहीं. "

" तें खरं आहे, " धोंडशेट म्हणाले, " पण कांहींतरी धार्मिक कार्यक्रम पाहिजे. धर्माचं नांव काढल्याशिवाय जाग यायची नाही या लोकांना. "

धोंडशेटचं म्हणणं खरं होतं. पण या धार्मिक समजल्या जाणाऱ्या प्रकारांवर माझी श्रद्धा नव्हती. गांवच्या उत्सवांत मी मिसळत होतों. त्यांच्या भजनांत सुद्धां सामील होत होतों, पण त्याची माझी मलाच शरम वाटत होती. तो माझा दांभिकपणा होता. धार्मिक समजल्या जाणाऱ्या गोष्टींवर खेड्यांतल्या लोकांचा केवढा विश्वास होता, त्यापायीं ते किती निष्कारण खर्च करीत होते, किती उधळमाधळ करीत होते—ऋण काढून सण करीत होते तें पाहिल्यावर तसल्या गोष्टींना उत्तेजन द्यावं असं मला मनःपूर्वक वाटत नव्हतं.

" धार्मिक कार्यक्रम काय करायचा ? " मी धोंडशेटना विचारलं, " तुम्ही आर्यसमाजी आहांत, तुम्हाला त्याची कल्पना आहे. सार्वत्रिक दृष्टीनं कोणता धार्मिक कार्यक्रम या लोकांना रुचेल याची कल्पना मला नाहीं—"

" खरं आहे तें. " धोंडशेट पुनः म्हणाले, " मला सुद्धां तोच पेच पडला आहे. यांच्या उत्सवासाठीं मी पैसे देतों पण मी कांहीं त्यांत मिसळत नाहीं एवढ्यासाठीं हे लोक नाराज आहेत माझ्यावर. नुसतें पैसे देऊन त्यांचं समाधान होत नाहीं. पैसे दिले नाहींत तरी चालेल पण त्यांच्या मेळाव्यांत मिसळल्याशिवाय त्यांना समाधान वाटत नाहीं—आणि तें कांहीं मला पटत नाहीं. मी जातीचा भंडारी असलों तरी आमच्या आर्यसमाजाच्या नियमाप्रमाणें होमहवन करतों, म्हणून या लोकांचा राग आहे माझ्यावर. तिथं मी कांहीं सुचवलं तर उगीच अप्रियता मात्र उत्पन्न होईल. तेव्हां तुम्हीच कांहीं तरी नवी योजना काढा. "

मला वाटलं, या वेळीं किकी पाहिजे होती. दोन्ही प्रकारच्या लोकांचा तिला अनुभव

होता. अशिक्षितांचीं चरित्रं तिनं पाहिलीं होतीं, सुशिक्षितांच्या नास्तिकतेंत ती वावरत होती, या दोन्ही मनोभूमींचा मध्यबिंदु साधून कांहीं तरी योजना केली पाहिजे असं मला वाटूं लागलं.

आम्हीं नंतर बराच वेळ या विषयाची चर्चा केली, पण त्यांतून निश्चित असा कार्यक्रम कांहीं निघाला नाहीं. या कामीं अण्णांचा सल्ला घेण्यांत अर्थ नव्हता. ते अत्यंत श्रद्धाळू होते. ठरलेल्या मार्गाच्या बाहेर जाणं त्यांना पसंत पडलं नसतं. या विशिष्ट परिस्थितींत त्यांच्या धार्मिकतेवर आघात होईल अशी कोणतीही योजना अमलांत आणणं जसं शक्य झालं नसतं, तसंच धार्मिकतेला राष्ट्रीय वृत्तीची जोड देण्याची कल्पनाही त्यांना सुचवतां आली नसती.

त्या दिवशीं मी घरीं आलों तेव्हां मला कळून आलं, कीं तेवढ्यांतल्या तेवढ्यांत वेळ काढून जनी ब्राह्मणवठारांत जाऊन आली होती, ती म्हणाली "एकदां केलं तुमच्या मनासारखं, भेटून आलें तिला, केव्हां येणार म्हणून विचारलं, पण ती कांहीं निश्चित सांगेना. मोठी घुमी बनली आहे ती अलीकडे. माझ्याशीं धड बोलली सुद्धां नाहीं. आधीं पाहीना सुद्धां माझ्याकडे. पण मीच जरा लघळपणा केला. तेव्हां म्हणाली, 'हें पहा जने, तूं इकडे येत जाऊं नकोस. काकांनीं बंदी केलीय तुला. तूं म्हणशील, कीं बंदी केली ती घरीं म्हणून, पण तें घर आणि हें देऊळ दोन्ही मला सारखींच आहेत.' एवढं तुटक बोलली तरीसुद्धां मी बोलत राहिलें. तुम्ही वाट पहातां आहां म्हणून सांगितलं तेव्हां हे एवढे मोठाले डोळे केले तिनं माझ्यावर. माझं मलाच वाईट वाटलं. म्हटलं कुठली झक मारली आणि इथं आलें. माग पहायला ये म्हणून सांगितलें तेव्हां नुसतं हूं म्हणाली. एवढी मस्ती आलीय तिला!"

आधींच वैषम्य मनांत धरून ती गेली होती. त्यांत तिची अशी संभावना झाल्यामुळं तिचं पित्त खवळलं होतं. तिनं पुष्कळच सहनशीलपणा दाखवला असं मला वाटलं. यापुढं तिकडे जाऊं नकोस असं मी तिला सांगितलं तेव्हां ती म्हणाली, "आतां तर मुद्दाम जाणार मी. किती माझा अपमान करते आहे तें पहाणार आहें मी. आतां बी. ए. होणार आहे ना ती, तेव्हां एवढा दिमाख आला आहे तिला. पण म्हणावं, मी सुद्धां चांगली खंबीर आहें. लाथ मारलीन तिनं तरी सुद्धां सहन करीन, पण आतां अगदीं पाठपुरावा करणार आहें तिचा!'' ' असं म्हणून ती पुन्हा आपल्या कामाला लागली.

मला आश्चर्य वाटलं. आधीं ती जात नव्हती याचं मला आश्चर्य वाटत नव्हतं. पण आतां ती गेली, किकीकडून अपमान करून घेऊन आली—एवढा अपमान झाला असता तर माझ्यासारख्यानं पुनः तिकडे ढुंकूनही पाहिलं नसतं—पण अपमान झाला म्हणूनच पुनःपुन्हा जायला ही कां तयार झाली ? ही कसली वृत्ती? सदा लाथेखालीं तुडवलं जाण्याची कुणब्याला जी सवय आहे तींतूनच या वृत्तीचा उगम झाला आहे का ?

जनीच्या या विलक्षण निर्धाराबद्दल मला जितकं कौतुक वाटलं, तितकीच त्याचा परिणाम काय होतो हें कळून घेण्याकडे माझी जिज्ञासा धावूं लागलीं. यांतून काय निष्पन्न होतं हें स्वस्थपणें पहाण्याचा मी निश्चय केला.

प्रकरण ११ वें

# मला बरेंच कळूं लागलें

आणखी दोनतीन दिवस गेले. किकीच्या भेटीसाठीं मी अधीर झालों होतों. माझा हा दुबळेपणा मला जाणवत होता. पण मला वाटतं, जनी म्हणाली त्याप्रमाणें इंग्रजी बोललेलं ऐकण्यासाठीं मी उतावीळ झालों होतों. म्हणजे अगदीं कुणीतरी इंग्रजी बोलणारं मला भेटलं असतं तर माझं समाधान झालं असतं का, असा मी आपल्या मनाशीं प्रश्न केला तेव्हां त्याचं उत्तर मला देतां येईना.

माझ्या उत्कंठेची छाननी मी करून पाहूं लागलों त्यावेळीं माझं मलाच दिसून आलं, कीं नुसती इंग्रजी भाषा ऐकण्यासाठीं मी उतावीळ झालों नव्हतों; नुसत्या सुसंस्कृत व्यक्तीच्या—कुठल्याही व्यक्तीच्या भेटीनं माझं समाधान झालं नसतं--किकीच्याच भेटीसाठीं माझा जीव तळमळत होता.

मला प्रश्न पडला, कां असं मला वाटावं? एवढा कुठं तिचा माझा परिचय झाला आहे? लोभ लागण्यासारखं असं तरी काय घडलं आहे? या उत्कंठेच्या मुळाशीं कोणत्य प्रकारची भावना होती याचं निदान मला ठरवतां येईना.

## फाटकी वाकळ

प्रेम म्हणतात तें हेंच का? प्रेमीजनांच्या विरहाची वर्णनं मी काव्य-नाटकांतून वाचलीं होतीं. त्यांतल्या कोणत्याच प्रसंगाशीं किकीच्या आणि माझ्या गांठीभेटीचा हा प्रसंग जमेना. या आमच्या प्रसंगांत कसलंच काव्य नव्हतं—रोमान्स नव्हता. तशा आमच्या फारशा बैठकाही झाल्या नव्हत्या. प्रेमाच्या गोष्टी तर आम्ही मुळी बोललोंच नव्हतों. जो चालला होता तो काँग्रेसचा प्रचार-खादीचा प्रचार—गांवची गांवकी—असल्या या रुक्ष विषयांतून का प्रेमाचा उद्भव होत असतो!

मुंबईहून निघायच्या दिवशीं किकीची जी पहिली भेट झाली त्यावेळचं भाषण मला आठवलं. मी निमगांवलाच जातों आहे हें कळलं तेव्हां जो विषय बोलण्यासाठी ती आली होती तो विषय टाळून तिनं काँग्रेसच्या प्रचाराच्या गोष्टी सुरू केल्या होत्या. त्यानंतर झालेल्या भेटींत त्या टाळलेल्या गोष्टीचा तिनं कधींच उल्लेख केला नव्हता. ती टाळलेली गोष्ट काय होती याचा मी विचार करूं लागलों. त्यावेळीं कॉलेजांत किकीच्याबद्दल कांहींतरी बोललं जात होतं आणि त्याचा पत्ता मला लागला नव्हता, असा त्या मुंबईतल्या भेटीच्या बोलण्याचा तिचा रोख होता. आठवण करूं लागलों तसतशी ती एकच गोष्ट पुनः पुन्हा मला जाणवूं लागली. किकी भेटली कीं तिला पहिल्यानं हा प्रश्न करायचा असं मी ठरवून टाकलं

पण किकीची भेट होण्याचा संभव दिसत नव्हता. जनी तिच्याकडे खेटे घालीत होती पण ती जनीशीं बोलायचंसुद्धां टाळीत होती। खरोखरच आमच्याबरोबर तिनं चढाओढ चालवली होती का?

एके दिवशीं बाबीकाका पुन्हा मला भेटायला आले. पूर्वी मी अपमान केला असतांही ते आल्याचं पाहून मला आश्चर्य वाटलं. त्यांची मुद्रा पाहिल्यावर ते कांहीं सलोख्याच्या बुद्धीनं आले होते असं वाटलं नाहीं. पडवींत उभे राहूनच आम्ही बोलूं लागलो. ते स्वतः होऊन बसले नाहींत आणि मीही त्यांना बसायचा आग्रह केला नाहीं.

ते म्हणाले, "मी आलों याचं तुम्हाला आश्चर्य वाटलं असेल. पण माझा नाइलाज झाला. त्या आमच्या पोरीनं तिकडे देवळांत बाजार मांडला आहे. वाडीतलीं पोरं गोळा करून सुतं काढीत बसत असते. पोरांना दटावून पाहिलं तर तीं कांहीं ऐकत नाहींत, त्यांनासुद्धां नाद लागलाय तो. हीं असलीं ढोंगं आमच्या वाडींत नकोत असं आम्हा

साऱ्यांनाच वाटतं. तीं पोरं तुमच्याइकडे आलीं सुतं काढायला तर तुमची हरकत आहे का ? ”

“ मुळींच नाहीं. ” मी म्हटलं, “ एक उद्योग म्हणून आम्ही हा व्याप सुरू केला आहे. तें काम इथं फुकट चालत नाहीं. आम्ही पेळू देतों, त्याचं सूत काढून घेतों आणि त्याबद्दल मजुरी देतों. तुमच्या तिकडचीं मुलं चांगला पिळदार धागा काढीत असतील तर त्यांना दिवशीं दोनचार आण्यांचं काम मिळणं शक्य आहे. ”

बाबीकाका मोठमोठ्यानं हसले आणि म्हणाले, “ मोठा जबरदस्त उद्योग दिसतो हा तुमचा ! रोज दोनचार आणे मिळतात अं तुम्हा लोकांना ? मोठं जबरदस्त उत्पन्न आहे म्हणायचं !—”

चांगलं सणसणीत उत्तर द्यावं असं माझ्या मनांत आलं होतं. पण मी आत्मसंयमन केलं. क्षणभर थांबून ते म्हणाले, “ तो चरख्याचा विटाळ नको आमच्या देवळाला. ते सारे चरखे उद्यां इकडे पाठवून देतों. आलीं कुणी तिकडचीं पोरं तर ठीकच, नाहीं तर इकडच्या माणसांना द्या ते चरखे. मात्र त्या चरख्यांवर आमची मालकी राहील हें ध्यानांत ठेवा ! ” असं म्हणून बाबीकाका एकदम निघून गेले.

मला मोठा आनंद झाला. पण तो आनंद कसला होता ? आणखी चरखे मिळाले म्हणून का ? कीं ब्राह्मणांचीं मुलं आमच्या याही वर्गांत येणार आहेत म्हणून ?

खरं म्हणायचं म्हणजे मला आनंद झाला होता तो निराळ्याच कारणानं. करुणेश्वराच्या देवळांतला चरख्याचा पसारा बंद झाल्यावर किकीला तिथं काय उद्योग रहाणार होता ? कांहींतरी काम होतं म्हणून किंवा कांहींतरी काम आहे असं सांगण्याकरितां हा चरख्याचा पसारा घालून ती इकडे येत नव्हती. तो एक उद्योगही होता. त्या उद्योगामुळं ती गुंतून पडली होती. आतां ती काय करील ?

मी विचार करीत बसलों होतों तितक्यांत जनी आली आणि म्हणाली, “ ही गंमत कळली का गुरुजी ? ”

“ कळली ! ” मी म्हटलं, “ त्या करुणेश्वराच्या देवळांतल्या चरख्याबद्दलच ना ? ”

“ काय कळलंय तुम्हाला ? ”

“ ते वर्ग बंद केले ना बाबीकाकांनीं ? ”

" पण कसे बंद केले तें आहे का माहीत ? "

" आताच ते आले होते. त्यानीं ते चरखे आम्हांला देऊन टाकलेयत. तिकडलीं मुलं आलीं तर त्यांनीं वापरायचे, नाहींतर आम्ही वापरायचे असं सांगितलंय त्यांनीं. "

" पण ते आम्हांला कां दिले तें कळलं का तुम्हांला ? "

" तें कसं कळणार मला ! "

" मग तें कळेपर्यंत स्वस्थ बसा तर. " असं म्हणून ती जाऊं लागली.

" थांब जने, " मी म्हटलं, " मग गंमत सांगणार होतीस ती कसली ? "

" तुम्ही कळलं म्हणून म्हटलं नसतं तर मी सांगितली असती ती गंमत. कळलं ना तुम्हाला सारं कांहीं ? मग आतां मी कशाला सांगायला हवं ? "

तिच्या उत्तराचं मला मोठं कौतुक वाटलं. मी आपल्या परीनं तिच्यावर मात करायला गेलों होतों त्याचंच तिला वैषम्य वाटलं. ती पुन्हा जायला निघाली असं पाहून मी म्हटलं, " अशी रागावूं नकोस जने. मला वाटलं, तेवढंच असेल; पण त्याच्या मागं आणखीही कांहीं घडलं असेल अशी मला मुळींच कल्पना नव्हती. काय झालंय ? "

जनी गंभीर होऊन म्हणाली, " मी गंमत म्हणून म्हणालें इथंच चुकलें. संवयीनं शब्द आला तो माझ्या तोंडांत. पण ती कांहीं गंमत नव्हती. ऐकलंत तर तुम्हांला देखील आश्चर्य वाटेल. कसला हा मेला बाप ? आतां ती लहान का ? आतां ती बी. ए. होणार म्हणे—अन् तिला का यांनीं भर देवळांत मारावं ?—"

" किकीला मारलं ? कुणी ? बाबीकाकांनीं ? "

" हो. " म्हणून जनी उगीच राहिली.

" कां ? "

" या तुमच्या चरख्याच्या पायीं. "

" मारलं अं किकीला ! " मी आपल्याशींच पुटपुटलों.

" माझ्यासमोर मारलं. " जनी म्हणाली, " तसं म्हटलं तर मीच गेलें म्हणून मारलं त्यांनीं तिला. नवा चरखा दिसला—अगदीं नव्या प्रकारचा—म्हणून एका मुलाकडून मागून घेऊन मी सूत काढूं लागलें. तें पाहिलं वाटतं बाबीकाकांनीं—"

" अन् तुला नाहीं मारलं त्यांनीं ? "

"पहिल्यानं मलाच मारलं ना त्यांनीं—" जनी हसत हसत म्हणाली, "सडकून एक लाथ मारली माझ्या पेकाटांत. पाय तिठला असेल बिचाऱ्याचा—"

माझ्या आंगाचा भडका झाला होता. आधीं मला हें कळलं असतं तर बाबीकाकांना मी याचा जाब विचारला असता. जनी सांगत होती, "—अन् मग त्यांची संक्रांत कमाताईकडे वळली. मारे दोघांचं भांडण सुरू झालं. सारीं पोरं चरखे टाकून पळून गेलीं. अन् मग बाबीकाकांनीं कमाताईला अशी थोबडावलीय म्हणतां—" तें सांगतांना तिची सुद्धां मुद्रा पालटली होती.

"मग काय झालं ?" जनी थांबली म्हणून मी विचारलं.

"अगदीं मुकाट्यानं सहन केलं बिचारीनं. जाग्यावरून हालली नाहीं कीं पळून गेली नाहीं. बाबीकाका थांबले तेव्हां तिनं विचारलं, 'झालं !' त्यासरशी बाबीकाकांना पुन्हा चेव आला अन् पुन्हां त्यांनीं तिच्या आंगावर हात टाकला. तेव्हां मलाही त्यांच्या हातून आणखी थोडं बक्षिस मिळालं. अशी गंमत झाली ती !"

"मग ती कुठं गेली ?"

"कुठं जाणार ? गेली असेल आपल्या घरीं !"

"तुला कांहीं म्हणाली ?"

"अवसर दिला कुठं त्यांनीं ? लोटीत घेऊन गेले ते तिला घरीं. अन् मीही आलें इकडे निघून."

"तूं भेटली नाहींस तिला ?"

"बाबीकाका इकडे आले हें मला कळलं असतं तर मी तिला भेटायचा प्रयत्न केला असता."

"मग आतां भेटून येशील ?"

"छे-नाहीं !" जनी म्हणाली, "आपल्याला नाहीं जायचा धीर होत."

स्वतःच जाऊन एकदां तिची चौकशी करून यावं असं मला वाटलं होतं. पण तसं करणं योग्य होणार नाहीं असं विचारांतीं मला वाटलं. काय म्हणावं या माणसाला ? चारचौघांच्या देखत मुलीच्या आंगावर हात टाकायला याला शरम कशी वाटली नाहीं ? एकदां वाटलं, अण्णांना सांगून त्यांच्याकडून चौकशी करावी. पण ती बातमी इकडे आली नसल्यास

आपणच होऊन तिचा बोभाटा केल्यासारखं होईल. स्वस्थ बसण्याखेरीज दुसरं गत्यंतर नव्हतं. जनीची आजी आली असती तर तिला पाठवली असती. पण तिची प्रकृति बरी नसल्यामुळं आज पांचसात दिवस ती आली नव्हती. मी जनीला विचारलं, " तुझ्या आजीची प्रकृति कशी आहे ?"

" कां ? " ती म्हणाली, " तिला पाठवायचा विचार आहे वाटतं ? मला सुचलं होतं तें. म्हणूनच मी घरीं जाऊन आलें. पण आजी अजून कांहीं बिछान्यावरून उठत नाहीं. अन् मला कांहीं तिकडे जायची छाती व्हायची नाहीं. "

समोर नजर गेली—मी एकदम थक्क झालों. किकीच येत होती.

जनी भिंतीआड उभी असल्यामुळं किकी येत असलेली तिला दिसली नाहीं म्हणून ती आपल्या आजीच्या प्रकृतीची हकिकत सांगत तशीच बोलत राहिली होती. तिच्या बोलण्याकडे माझं लक्ष नाहीं हें तिच्या ध्यानीं येऊन ती म्हणाली, " काय, ऐकूं येतंय का ?—"

" हें काय ? " मी दारांत येऊन पोंचत असलेल्या किकीला पाहून ओरडलों, " तूं इकडे ? "

" कोण ? " जनी उद्गारली—पुढं डोकावून पाहिल्यावर किकी दिसतांच ती म्हणाली, " आलांत ? बरं झालं. या आतां अन् सांगा तुम्हीच यांना काय तें. माझं डोकं उठवलंय यानीं. "

हसतमुखानं किकी आंत आलेली पाहून मलाही कौतुक वाटलं. ' अशी गंमत झाली ' असं म्हणणारी जनी आणि एवढा प्रकार झाला असतांही चेहऱ्यावरचं हसं कायम ठेवणारी किकी, या दोघींची वृत्ति पाहून मला प्रश्न पडला, सुशिक्षित आणि अशिक्षित स्त्रीजातीच्या मनोभूमिकेंत खरोखरच का फरक नाहीं ?

आम्ही तिघंही आंत आलों. एक क्षणभरच किकीचा चेहरा गंभीर झाला होता—एकदम मोठमोठ्यानं हसत ती म्हणाली, " जनीनं सांगितली ना ती गंमत ? "

अगदीं तोच शब्द ! हिलाही ती गंमत वाटते ? ती हकिकत ऐकून मला चीड आली, माझ्या आंगाचा भडका झाला, बाबीकाकाच्या घरीं जाऊन त्याला एकदम बडवून काढावं असं जी हकिकत ऐकतांच मला वाटलं, ती या दोघींच्या लेखीं गंमत ठरावी अं ?

" गंमत का ती ? " मी चिडून म्हटलं, " बाप झाला म्हणून काय झालं ? ही पशुवृत्ति—"

" पशुवृत्ति नाहीं कुठं ? " किकी म्हणाली, " पशूच असतो माणूस. तो चांगला माणसाळला तरच माणूस होतो. नाहींतर पशुवृत्ती ही साऱ्यांनाच स्वाभाविक असते. "

किकीच्या तोंडचं हें नवं तत्त्वज्ञान ऐकून मला राग आला कीं कौतुक वाटलं तेंच सांगतां यायचं नाहीं. माझा अंतरात्मा पेटत होता. त्या पेटत्या खाईच्या ठिणग्या सोडीत मी म्हणालों, " पशुवृत्तीला पशूचंच बक्षिस दिलं पाहिजे. बडवून काढलं पाहिजे असल्या लोकांना. "

" हाच का १९३० सालचा धडा घेतलात ? " किकी संथपणें म्हणाली.

तो डाग माझ्या वर्मी लागला. माझं व्रत मी विसरलों होतों. निःशस्त्र प्रतिकार, असहकार वगैरे कॉंग्रेसनं प्रचारित केलेल्या महात्मा गांधींच्या तत्वांवर मी व्याख्यानं देत होतों, मुलांना शिकवीत होतो—त्याची माझी मलाच कशी विस्मृति झाली ? मी चपापून उगीच राहिलों तेव्हां किकी म्हणाली, " हा फेस-मसाज फार सुंदर झाला. तुम्ही पाह्यला हवे होतां. मी पूर्वी पोलिसांचे लाठीहल्ले पाहिले होते. तडाखे बसत असतांना चांगलीं तालीमबाज माणसं-सुद्धां हात वर कशीं उचलीत नाहींत याचं त्यावेळीं मला आश्चर्य वाटत होतं. आमच्या घरीं त्या प्रकाराची थट्टा होई. मी खूप विचार करून पाहिला होता त्यावेळीं. त्याचाच हा परिणाम— " एक क्षणभर थांबून बोलतांना आलेला गंभीरपणा टाकून ती हसत हसत म्हणाली, " आई म्हणाली तेंच खरं. अनत्याचाराचं तत्त्व पाळणं आज केव्हांपासून बायकांच्या आंगवळणीं पडलं आहे. किती नवरे बायकांवर हात टाकतात—निष्कारण हात टाकतात-पण कुठली बायको नवऱ्याला कांहीं उलटून मारीत नाहीं. त्यांना बरोबर कळतं हें तत्त्व. मला असंच म्हणाली आई, ' हें असंच चालायचं कमा. तेव्हां तूं लहान होतीस, तुझ्या ध्यानांत नसेल तें—पण तेव्हांपासून मी मार खात आलें आहे. चांगली तुझ्यापेक्षां दिखील मोठ्या वयाची होतें. अन् आम्हां दोघांच्या वयांत सारा तीन चार वर्षांचा फरक होता. मनांत आलं असतं—नव्हे मनांत येत होतं तसं केलं असतं—तर रोज मारामारी जुंपली असती. मी दिखील कांहीं अगदींच लेचीपेची नव्हतें. पण मुकाट्यानं तो मार सहन केला ना मी ! तसंच हें ! ' आई असं म्हणाली पण त्याचा मला मोठासा अभिमान वाटला नाहीं. खुळ्या संस्कारामुळं उत्पन्न झालेला तो दुबळेपणा होता—जाऊं दे, ती चर्चाच

नको आतां. मी आलें आहें ज्या कामासाठीं तें आधीं बोलून टाकूंदे मला—" असं म्हणून ती आंत येऊन बसली.

जनी बाजूला उभी राहिली होती असं पाहून ती म्हणाली, "अशी दूर कां रहातेस जने? इथं येऊन बैस ना; तुझ्यामुळं तर हें सारं झालं; तूं दूर राहून कसं चालेल ?"

बारकाईनं मी पहात होतों, किकीच्या वर्तनांत आज एक अवास्तव पोक्तपणा आला होता. बाबीकाकानीं दिलेल्या मारामुळं तिची नित्याची खेळकर वृत्ती नाहींशी झाली होती का? तसं झालं असतं तर मला बरं वाटलं नसतं.

"वेळ मोठी कठीण आली आहे." किकी म्हणाली. "तुमच्या अण्णांचाही सल्ला घेतला पाहिजे मला. झाल्या प्रकारानंतर घरीं रहाणं मला अशक्य झालं आहे. काका आपल्या मनांत चूर असतात खरे पण बाहेरचा आविर्भाव पाहून मला विचार करावा लागला आहे. यंदा मीं पास होणार यांत शंका नाहीं. प्रश्न हा आहे, कीं आतां करायचं काय ? मुंबईला जाऊन राहिलें तर कुठं नोकरी करणं अशक्य व्हायचं नाहीं मला—" पुन्हा एकदां तोंडभर हसून तसंच पदरानं तोंड पुशीत ती म्हणाली, "एकाद्या पुरुषासारखं मी बोलतेंय तें ऐकून तुम्हाला आश्चर्य वाटलं असेल नाहीं ? हें असं व्हायचंच—" असं म्हणून उत्तराची अपेक्षा करीत माझ्या तोंडाकडे पहात ती क्षणभर स्वस्थ बसली.

मी जनीला म्हटलं, "अण्णांना बोलावून आणशील का जने ?"

"कशाला ?" किकीनं विचारलं.

"तुम्हीच म्हटलं ना आतां ?"

"हो खरंच," किकी म्हणाली, "ते आले तर बरं होईल."

कांहीं न बोलतां जनी मुकाट्यानं निघून गेली तेव्हां किकी म्हणाली, "मुंबईला जाऊन नोकरी करण्यापेक्षां इथंच गांवाच्या सेवेला लागावं असं वाटतंय मला. पण पुन्हां मन मागं-पुढं होतं. तुमच्यासारखंच इथं कांहींतरी काम करीत रहायचं म्हणजे घरांत काहीं मला थारा मिळणार नाहीं, अन् घर टाकून गांवांतच रहायचं म्हटलं, तर मी रहायचं कुठं ? पुरुष असतें तर गोष्ट निराळी होती—"

"इथंच रहायचं ?" मी विचारलं, "मोठं कठीण आहे तें. कुठं रहाणार ? कुणाकडे रहाणार ? मी इथं आलों तेव्हां वाण्याच्या घरीं जेवायला राहिलों म्हणून केवढा हलकल्लोळ

केला या लोकांनीं. इथला कुठलाही ब्राह्मण तुम्हाला आपल्या घरीं थारा देईल असं वाटत नाहीं मला. ”

“ म्हणूनच मीं विचारांत पडलें आहें,” किकी म्हणाली, “ कांहीं सुचत नाहींसं झालं आहे अगदीं. किती दिवस हा जाच सोसायचा ? मन मारून असं किती दिवस रहायचं ? आतां ते लग्नाच्या गोष्टी बोलूं लागले आहेत. लग्न म्हणजे वाटतं तरी काय यांना ? मग शिक्षण कशाला देतात आम्हाला हे ? बी. ए. स्वैंपाकीण करण्यासाठीं ? तिकडे मुंबईला त्या काकाकडे तसा कोंडमारा होत होता--इथं आलें ती ही अशी शोभा झाली ! मनाला वाटतं तसं करायचं तरी केव्हां ? किती वाट पहायची ?—” किकी बोलतां बोलतां मधेंच स्तब्ध झाली. तिचा आवाज भरून आला होता. डोळयाच्या कोपऱ्यांत दोन टिपं आलेलीं दिसत होतीं. पहातां पहातां तीं टप्कन खालीं पडलीं.

औपचारिक भाषा विसरून चट्कन मी बोलून गेलों, “ रडतेयस किकी ? ”

एकदम डोळे पुसून चट्कन तिनं वर माझ्याकडे पाहिलं. तिच्या त्या डोळ्यांत अजूनही टिपं सळसळत होतीं. त्या तशाच आसवं भरलेल्या डोळ्यांनीं हसत ती माझ्याकडे पाहून म्हणाली, “ आतां मला बरं वाटलं. बरं झालं, हें अहो जाहो बंद झालं. हेंच पाहिजे होतं मला ! ”

पदरानं डोळे पुसून ती माझ्याकडे सारखी टक लावून पहात होती. माझ्या छातींत धडकी भरली होती. अननुभूत अशा एका विशिष्ट भावनेनं माझ्या मनांत कल्लोळ माजवला होता ! कांहीं न बोलतां मी तसाच बसून राहिलों होतों. तोंच अण्णांना घेऊन जनी आली.

## प्रकरण १२ वें

# मला पुन्हां तंबी मिळाली

अण्णांना पहातांच किकी बैठकीवरून उठून बाजूला बसली तेव्हां अण्णा म्हणाले, " असा संकोच नको धरायला कांहीं. मला सारं कांहीं कळलंय. मला माझ्या मुली-सारखीच आहेस तूं, पण या वेळीं इथं आलीस हें कांहीं बरं केलं नाहींस "

" तर काय करूं ? " किकी म्हणाली, " आतां तिथं रहाणं मला अशक्य झालंय. घराचा घरपणा संपल्यासारखा वाटतोय. आईखेरीज आतां कुणाचाच आधार नाहीं मला. पण ती तरी बिचारी काय करणार ? तिनं आपल्यापरीनं काकांची समजूत घालायचा प्रयत्न केला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. तिथंच पुन्हा कुरुक्षेत्र माजतंय कीं काय अशी भीती वाटली मला—" एक क्षणभर थांबून ती म्हणाली, " आतां विचार करायची जरूरी राहिली नाहीं. अविचारच करायचा असं ठरवलंय मी. घर सोडून निघायचं असा निश्चय झालाय माझा—आतां सांगा, माझ्यासाठीं तुम्ही काय करणार आहांत ? "

" हा पेचच आलाय मोठा ! " अण्णा म्हणाले, " जळांत राहून माशाशीं वैर कसं करा-यचं ? आमचा हा पसारा वाढला आहे, माणसाची जरूरी आहे आम्हाला, बाहेरून कुणीतरी आणायचं म्हणून अलीकडे बेत चालले होते आमचे—पण हें कसं जमायचं ? कुणी पुरुष

असता तर गोष्ट निराळी होती. आधीं तूं मुलगी, त्यांतून या गांवचीच—मला वाटतं, असं विकोपाला नेऊं नकोस. इथलं काम घेतलंस हातीं, तर हवंच आहे आम्हाला—पण घर सोडूं नको एव्हांच."

"तुम्हाला कल्पना नाहीं अण्णा," जनी मधेंच तोंड घालून म्हणाली, "प्रकरण फारच विकोपाला गेलंय!"

"तरीसुद्धां सहन केलं पाहिजे!" अण्णा म्हणाले, "आपण होऊन घरांतून बाहेर पडण्यापेक्षां त्यांनाच काय करायचं तें करूं दे, तोंपर्यंत थोडं सहन केलं पाहिजे."

"अन् त्यांनीं घालवून दिलं घरांतून तर–" किकीनं विचारलं.

"तर–तर—" असं म्हणून अण्णा उगीच राहिले.

"मोठा पेच आलाय हा!" मी म्हटलं, "बाबीकाकांना सांगून कांहीं मिळतं घेतां यायचं नाहीं का?"

अण्णा अजूनही स्तब्ध होते. मलाही विचार पडला होता. हा पेचप्रसंग मोठा बिकट होता यांत शंका नाहीं. पण त्यांतून कांहीतरी मार्ग काढल्याखेरीज गत्यंतर नव्हतं.

"विचार करण्याजोगी गोष्ट आहे." अण्णा म्हणाले, "ठीक आहे. मी एकदा विचारतोंच बाबीकाकांना—कांहींच कळलं नाहीं असं धरून विचारतों त्यांना. मग पुढं काय होतं तें पाहूं. असं पहा कमाताई, आम्ही वाणीउदमी माणसं. तुझे वडील आहेत सावकार. पदोपदीं संबंध येणार त्यांचा आमच्याशीं. त्यांना दुखवून चालायचं नाहीं आमचं. इथली ब्राह्मण मंडळी मूठभर आहे खरी, पण त्यांच्याविरुद्ध जातां येत नाहीं आम्हांला. किती झालं तरी तीं मोठीं माणसं आहेत हें विसरून चालत नाहीं, म्हणून दमादमानं घेतलं पाहिजे. आतां तुम्हीं घरीं जा. कुणीतरी चुगली करील आणि उगीच त्रास होईल."

किकीचे डोळे पुन्हा भरून आले होते. तिची मुद्रा पाहून अण्णांनाही गहिंवर आला. तशाच गहिंवरल्या शब्दांनीं ते म्हणाले, "अजून फार अनुभव यायचा आहे. एव्हांच असा धीर सोडून कसं होईल? पुरुषाची गोष्ट निराळी असते. बायकांचं जिणं मोठं परस्वाधीन. तिथं शिक्षणबिक्षण कुणी पहात नाहीं. एकादाच ब्राह्मण जरी आमच्या बाजूला असता तर मी डगमगलों नसतों—"

"अन् मी इथंच राहिलें तर?" किकीनं विचारलं.

" छे छे—" अण्णा घाबरून म्हणाले, " तें जमायचं नाहीं. व्हायचंच असलं तसं काहीं तर निराळी व्यवस्था करावी लागेल. पण इथं—छे छे ! "

तसल्या त्या मनःस्थितींत सुद्धां किकीला हसूं आल्यावांचून राहिलं नाहीं. ती म्हणाली, " आतां माझा भार मी तुमच्यावर सोपवलाय. तुम्हाला सारं कांहीं माहीत आहे. माझं हितअहित—सुखदुःख तुम्हाला कळतंय. माझ्या सहनशक्तीच्या पलीकडे गेलंय सारं कांहीं, हें ध्यानीं घ्या आणि मला हुकूम करा." असं म्हणून ती नमस्कार करून एकदम निघून गेली.

" गरीब बिचारी पोरगी !" अण्णा उद्गारले, " हें असं चाललंय जिकडे तिकडे. पण करायचं काय ? ही कांहीं मुंबई नाहीं. या टीचभर गांवांत पंचाऐशीं बाजू सांभाळाव्या लागतात. मला वाटतं कांहीं दिवस ही मुंबईला जाऊन राहिली तर बरं होईल. तसं सांगणार होतों मी, पण या वेळीं तिला तें पटलं नसतं—ती इरेला पेटली आहे—बापाच्या नाकावर टिच्चून इथंच रहायचं आहे तिला. बाबीकाकांचीच मुलगी कीं नाहीं ती ! बऱ्यासाठीं असो कीं वाइटासाठीं असो, अभिमानाच्या बाबतींत दोघंही सारखींच. मला वाटतं, धोंडशेटना घेऊन मी एकदां बाबीकाकांकडे जातों. मग पुढं काय व्हायचं तें होईल."

बराच वेळ त्या विषयाची चर्चा करीत आम्ही बसलों होतों. जनी अगदीं मुकाट्यानं ऐकत होती. तिच्या मनांत चाललेली खळबळ तिच्या मुद्रेवरून मला दिसत होती. पण अण्णांचं तिकडे लक्ष गेलं नव्हतं. अण्णा निघून गेल्यावर ती म्हणाली, " कशाला एवढे भितायत त्या बामणाला ? काय झालं ती इथं येऊन राहिली तर ? मी आहेंच इथं, आजीलाही आणूं हवी तर !"

" तिच्या हातांत चूल द्यायचीय वाटतं तुला ?" थट्टेवर नेण्याच्या उद्देशानं मी म्हटलं.

" त्याची तुम्हाला काय पंचाईत ? आम्ही आमचं काय तें पाहून घेऊं."

" वेडी आहेस जने—" मी म्हटलं, " या खेड्यांत तसलं कांहीं चालायचं नाहीं. मुंबई असती—"

" मी कुठं पाह्यलीय मुंबई ? " जनी म्हणाली, "इथंच गेला ना माझा सारा जन्म ! इथंच बसून सांगतेंय मी, कीं कांहीं कुणाला भ्यायची जरूरी नाहीं."

" चुकतेयस जने ! " मी म्हटलं, " इथं आम्ही नुसते घरचे घरवाले म्हणून रहाणार

नाहीं. आम्हाला इथं दर्जा आहे तो राखायला हवा. कुणी नांव ठेवील असं कांहीं आमच्या हातून घडलं तर हातीं घेतलेल्या कामाला खीळ पडेल. तुझं म्हणणं मला पटतं—पण जोंपर्यंत आम्ही हें काम हातीं घेतलंय तोंपर्यंत काय्याकुय्यांतून चालल्यासारखं जपून वागलं पाहिजे आम्हाला."

" भागूबाई आहांत झालं ! " असं म्हणून फणकाऱ्यानं जनी आंत निघून गेली. तिचा तो आवेश पाहून मला मोठं कौतुक वाटलं. कुणब्याची पोर ही, जन्मभर गावानं छळलेलं, रोज खाटत राहिल्याशिवाय अन्न मिळायची पंचाईत—पण केवढा दिमाख या पोरीचा ! खेड्यांतसुद्धां अशीं माणसं असतात याची कल्पना शहरच्या लोकांना कुठं आहे ?

या एकीलाच मीं पहात होतों. मला वाटलं, घरोघर अशा मुली नसतात कशावरून ? असे मुलगेही असतील ! स्वतंत्रतेची सळसळणारी ज्योत वडील माणसं फुंकर घालून विझवीत असतील. त्या कोंडमाऱ्यानं कासावीस होऊन किती तरुण मुलांमुलींच्या आयुष्याचा नाश झाला असेल ! कोण करतंय त्याची चौकशी ? इतके दिवस मी या गांवीं आहें पण कुणाच्या घरीं काय चाललं आहे याचा पक्का अंदाज मला तरी कुठं आला आहे ? अजून आम्ही जपून चाललों होतों. चढावाचं धोरण अजून आम्ही स्वीकारलं नव्हतं. केव्हां तरी हा चढाव करणं भाग होतं. अस्पृश्यतानिवारण करायचं म्हणजे महारमांगाचीच अस्पृश्यता का ? ज्यांना आम्हीं अस्पृश्य समजत नाहीं त्यांच्यांतील प्रच्छन्न अस्पृश्यता घालवण्याचा कार्यक्रम कुठं कुणी आखला होता ?

हा नवा विचार माझ्या मनांत आला तेव्हां माझं मलाच समाधान वाटलं. अण्णांची शिष्टाई काय होते तें पाहून थोडंसं चढाईचं धोरण स्वीकारायचं असं मीं ठरवलं. त्यासाठीं कदाचित् मला पुन्हां अण्णांच्या घरीं जाऊन रहावं लागलं असतं. ब्राह्मण शूद्र एका जागीं राहून एका चुलीवर संसार थाटूं शकतील; पण विवाहसूत्रानं न बांधलीं गेलेलीं तरुण आणि तरुणी एका घरीं रहाणं मोठं कठीण होतं याची मला कल्पना होती. कुणब्याची पोर असलेली जनी माझ्यासारख्या अविवाहिताच्या घरीं येऊन काम करते याचा दिखील केवढा बोजवारा केला जात होता. मग किकी जर इथं येऊन राहिली असती—एका बिऱ्हाडांतच राहिली असती—तर गांवाला आग लागल्याएवढा मोठा हलकल्लोळ उडाला असता ! म्हणूनच मला वाटलं, कीं किकीला घर सोडावं लागलं तर आपण पुन्हा अण्णांच्या घरीं जाऊन रहावं आणि हें बिऱ्हाड किकीच्या हवालीं करावं.

## फाटकी वाकळ

शाळेचा व्याप एवढा मोठा वाढला होता, कीं तो आवरणं मला एकट्याला कठीण जात होतं. त्याशिवाय सुताचे वर्ग सुरू होते ते निराळेच. पण तें काम आतां सुरळितपणें चालू झाल्यामुळं मला तिकडे फारसं लक्ष द्यावं लागत नसे. या सुताच्या वर्गांचा प्रपंच बहुतेक जनीनंच पत्करला होता. पण शाळेच्या कामांत मला दुय्यम शिक्षकाची उणीव अतिशय जाणवत होती. आणि म्हणूनच किकी आली तर माझा तो भार बराच हलका झाला असता. माझ्यासारखाच कुणी तरी एकादा बाहेरचा मनुष्य येऊन त्यानं पुन्हा मुळापासून सुरवात करण्यापेक्षां गांवचीच असलेली किकी माझ्यापेक्षांही जास्त जिव्हाळ्यानं हा कार्य-भाग उचलूं शकली असती !

मी तसं म्हटलं तेव्हां जनीला राग आला. जेवायला वाढीत असतांना आमटीचं पातेलं माझ्या पुढ्यांत टाकून ती फणफणत निघून गेली. तिला कां राग यावा हेंच मला कळलं नाहीं. खरं पाहिलं, तर तिला आनंद व्हायला हवा होता. किकीचं आणि तिचं नातं गांवां-तल्या इतर कुणाही ब्राह्मण स्त्रीपुरुषांपेक्षां जास्त लोभाचं होतं. पूर्वीच्या काळांत जनीची तरफदारी करण्यासाठीं किकी आपल्या आईबापांबरोबर भांडल्याच्या हकिकती मला जनी-नंच सांगितल्या होत्या. मग तिला राग कां आला ? मी सरळ सरळ विचारलं तेव्हां ती म्हणाली, " गांवच्या लोकांना कांहीं हें पटायचं नाहीं. किती झालं तरी ती बायकोमाणूस, तिनं का मुलांना शिकवायचं ? ही आहे मुलांची शाळा, अजून एकसुद्धां मुलगी येऊं लागली नाहीं शाळेंत, मुलींची शाळा असती तर गोष्ट निराळी होती. "

" पण आमटीचं पातेलं माझ्यासमोर आदळण्याइतका तुला जो राग आला तो कांहीं एवढ्याचसाठीं नव्हे ! "

" नव्हे ना ? मग झालं तर. मला नाहीं ती आवडत. असली बाई नको या आमच्या संसारांत यायला ! "

" काय केलं तिनं ? "

" कांहीं केलं नाहीं अजून. पण ती मास्तरीण म्हणून आली तर काय करील नि काय न करील हें कांहीं मला सांगतां यायचं नाहीं. त्यापेक्षां एकादा पुरुषमास्तरच आणा. "

" तो ब्राह्मण असला तरी चालेल का ? कीं एकादा मराठा किंवा कुळवाडी हवा ? "

" मला समजतेय बरं ही खोच ! " असं म्हणून तिनं ताकाचं भांडं आणून माझ्या समोर आदळलं, " पण मी इतकी कांहीं उठवणीला आलें नाहीं अजून. "



कांहीं केलं तरी मग ती बोलेचना. तिचा उद्देश काय होता याचा थांग तिनं मला लागूं दिला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं अण्णा बाबीकाकांना भेटून आले. बाबीकाका किकीवर भयंकर चिडले होते. तिच्या नांवाचा उल्लेख सुद्धां त्यांना सहन होईना. या बाबतींत आपल्याला कांहीं सुद्धां बोलायचं नाहीं असं त्यांनीं स्पष्टपणें सांगून टाकलं.

त्याच दिवशीं संध्याकाळीं बाबीकाकांची संक्रांत माझ्याकडे वळली. ते येत आहेत असं पाहून जनी एकदम दृष्टीआड झाली. मी एकटाच आहें अशा समजुतीनं त्यांनीं बोलायला प्रारंभ केला. ते म्हणाले, "असं पहा रघुनाथराव, हें चाललं आहे हें कांहीं ठीक नाहीं. तुम्ही पहिल्यानं आलां, वाण्याच्या घरीं जेवायला राह्यलां म्हणून तुम्हाला मी विरोध दाखवला, त्याचा सूड उगवायचा बेत तुम्ही चालवला आहे अशी माझी खात्री झाली आहे. मुंबईला असतांना तुमचं आणि कमीचं कितपत जुळलं होतं तें कांहीं मला माहीत नाहीं. पण इथं आल्यापासून तुम्ही तिला फुसलावण्याचा प्रयत्न करतां आहां. ती सज्ञान आहे, कायदेशीर रीतीनं मी तिच्यावर ताबा चालवूं शकत नाहीं. पण नीति म्हणून जगांत कांहीं आहे कीं नाहीं ? दुसऱ्याच्या पोरी फुसलावणारे तुम्ही—तुम्ही काय आमच्या मुलांना शिक्षण लावणार ?"

बाबीकाकांचा एकंदर आविर्भाव पाहून मला चीड आली. पण शक्य तेवढं आत्मसंयमन करून मी म्हणालों, "आपण मला निष्कारण दोष देत आहां. या कामीं माझा कोणताही संबंध नाहीं. तिनंच अण्णांकडे हा प्रस्ताव केला आणि त्यांनीं तुम्हाला विचारलं."

"असं आहे ना ?" बाबीकाका तिरमिरून म्हणाले, "तर मग असं करा—तिला या शाळेंत काम करूं द्यायचं नाहीं असं या लोकांना स्पष्टपणें सांगा."

"तसं मी कसं सांगूं ?" मी शांतपणें म्हणालों, "एक नोकर म्हणून मी इथं आलों आहें. या शाळेच्या व्यवस्थेंत मला कोणताही हात घालतां येत नाहीं. मला जो कुणी असिस्टंट देण्यांत येईल त्याच्याकडून योग्य रीतीनं काम करून घेणं एवढीच माझी जबाबदारी आहे."

"मग असं करा तर—" बाबीकाका जरा थंडावून म्हणाले, "त्या कुणी जर तिची नेमणूक केली तर तिला नालायक ठरवून काढून टाका !"

"तिनं योग्य रीतीनं आपलं काम केलं तरीही ?"

" हो, तरीही. असिस्टंट कुणी पुरुषच असावा असा आग्रह तुम्ही कां धरूं नये ? "

" मी हुकुमाचा ताबेदार आहें. देतील तो असिस्टंट घेऊन मला काम चालवलं पाहिजे. "

" समजलों—समजलों—" बाबीकाका ताड्कन उठून म्हणाले, " हें तुमचंच कवटाळ आहे सगळं. कशी ती इथं येते आणि मास्तरकी करते तेंच आतां पहातों ! "

रागाच्या तिरमिरींत चंची विसरून बाबीकाका निघून गेले. मी चंची घेऊन त्यांच्या मागून धांवलों तेव्हां त्यांनीं माझ्याकडे ढुंकून सुद्धां न पहातां चंची घेऊन खिशांत टाकली.

मी परत आलों तेव्हां जनी मला म्हणाली, " आतां माझी कबुली आहे गुरुजी. काल बोललें तें आतां रद्द. कमाताई आतां आलीच पाहिजे. होऊन जाऊं द्या म्हणावं ! "

मी तिला उत्तर दिलं नाहीं.

मला मोठा पेंच पडला होता. भलतीं प्रकरणं उपस्थित होत होतीं. मी हातीं घेतलेल्या माझ्या कार्याला तीं विघातक होतील कीं काय अशी भीति मला वाटूं लागली. किकीसारखी सहकारी मिळणं खरोखरच भाग्याचं होतं. काँग्रेसच्या प्रचाराची कल्पना माझ्यापेक्षां तिलाच जास्त अवगत होती. तिनं तो अभ्यास केला होता. मी नुसतं आंधळेपणानं तें काम पत्करलं होतं. प्रत्येक बाबतींत ती मला मार्गदर्शक झाली असती असं जरी मला वाटत होतं, तरी बाबीकाकांचा तो आवेश पाहून मला माझ्या भवितव्याची काळजी वाटूं लागली.

कांहीं तरी नवा कार्यक्रम सुरू करण्यासाठीं मी उतावीळ झालों होतों. नुसती मास्तरकी करण्याच्या उद्देशानं मी इथं आलों नव्हतों हें पदोपदीं मला जाणवत होतं. असा नवा कार्यक्रम कोणता असावा याची अचुक कल्पना मला येत नव्हती. प्रस्तुत परिस्थितींत निमगांवच्या लोकांना पटेल अशाच एकाद्या कार्यक्रमाची योजना करणं अवश्य होतं. तो असा कार्यक्रम काय असावा हें गांवच्या कुणा स्थानिक माणसालाच सुचवतां आलं असतं. तसा कांहीं कार्यक्रम सुचण्याइतकी व्यापक दृष्टी अण्णांना नव्हती. धोंडशेटचीं मतं आर्यसमाजी असल्यामुळं त्यानीं सुचवलेला कार्यक्रम गांवच्या लोकांना एकाएकीं पचला नसता. अशा वेळीं अशा कामीं कार्यक्रम सुचवण्यापासून तों तो अंमलांत आणण्यापर्यंत किकीचं सहाय्य बिनमोल झालं असतं असं मला पुनः पुन्हा वाटत होतं. म्हणूनच शिष्टाईसाठीं मी अण्णांना

बाबीकाकांकडे जायचा सल्ला दिला. पण त्यांतून कांहींच निष्पन्न न होतां प्रकरण उलट विकोपास जात असल्याचं पाहून मी फार अस्वस्थ झालों.

आणि इकडे जनीला तर चेव आला होता. चोवीस तासांत तिचं मत कां बदललं याचा मला अंदाज येईना. बाबीकाका विरोध करतील याची कल्पना तिला पहिल्यापासूनच असली पाहिजे होती. केवळ बाबीकाकांनीं येऊन मला तंबी दिली एवढ्यामुळंच तिचं मत बदललं असं मला वाटेना. बाबीकाकांची तंबी हें तात्कालिक कारण झालं असेल पण तिला चेव येण्याच्या मुळाशीं दुसरंच कांहींतरी कारण असलं पाहिजे अशी शंका मला येऊं लागली.

जनीचा स्वभाव जितका मोकळा होता तितकीच ती आंतल्या गांठीची होती. गावांतल्या सगळ्या लोकांकडून जन्मादारभ्य छळ होत गेल्यामुळं तिचा कुणावरच विश्वास नव्हता. कुणावरही विश्वास टाकायला पक्का अंदाज घेतल्याशिवाय ती सहसा धजावत नसे. इतके दिवस झाले तरी अजूनही माझ्याशीं वागतांना ती हात राखून बोलत असे. किकीचं आणि तिचं रहस्य कितपत होतं तें मला कळणं शक्य नव्हतं. पण यापूर्वी तरी त्यांचं दोघींचं नातं इतरांच्या पेक्षां जास्त आपुलकीचं होतं अशी माझी अटकळ होती.

किकीचा तरी मला तितकासा परिचय कुठं होता? नुसत्या बोलण्यावरून माणसाची कर्तबगारी कळत नाहीं. नुसत्या तात्विक चर्चेनं माणसाच्या अंतःकरणाचा ठाव लागत नाहीं. दिखाऊपणा आणि टिकाऊपणा यांच्यांत जमीनअस्मानाचं अंतर असलं तरी सकृद्दर्शनीं दिसणाऱ्या दिखाऊपणाची मजल केव्हां कशी थांबते हें सांगतां येणंही कठीण असतं. विद्यार्थीदशेंत माणूस भावनाप्रवण असतो. त्या भावनेच्या भरांत तो एकाद्या कामाला हात घालतो. तें काम मी पत्करलेल्या कामासारखं सार्वजनिक स्वरूपाचं असलं तर तें तडीला नेण्याची जबाबदारी फार मोठी असते. १९२० सालानन्तर पुष्कळांनीं कॉंग्रेसच्या चळवळींत त्यागबुद्धीनं भाग घ्यायला सुरवात केली होती. पण त्यांतलीं शेंकडा नव्वद माणसं कच खाऊन मागं हटलीं आणि शेवटीं कॉंग्रेसविरोधी बनलीं, हें मी माझ्या डोळ्यानीं पाहिलं होतं. तसल्याच भावनात्मकतेनं किकी जर आली तर विरोधाला तोंड देत टिकून रहाणं तिला कठीण जाईल असं मला वाटलं.

भावनात्मकता सर्वसाधारण असते; पण निष्ठेचीं उदाहरणं मात्र अगदीं विरळ असतात. मला तरी माझी स्वतःची खात्री कुठं वाटत होती?—भावनावश होऊनच मी ही उडी

घेतली होती. या कामीं विरोध निर्माण होईल--नव्हे, त्या विरोधाला सुद्धां नवेनवे फाटे फुटतील--असा अंदाज त्या वेळीं मला मुळींच आला नव्हता. अजूनही विरोधाची मजल कुठवर जाईल हें मला सांगतां आलं नसतं. पण तितकाच निष्ठावान सहकारी मिळेल तर माझी निष्ठा दृढमूल होऊन या दिव्यांतून मी पार पडेन असं मला वाटत होतं.

जनी मोठ्या खुषींत आली होती. स्वतःचं घर टाकून किकी आमच्या जोडीला खात्रीनं येणार असा तिचा ठाम समज झाला होता. न घडलेली गोष्ट घडावी--गांवांतली मुलगी बापाला विरोध करून त्याच गांवांत सवा हात तुरा लावून मिरवीत रहावी, ती तशी मिरवित असतांना ' चांगलं बापाचं नाक ठेचलं ' असं जगानं म्हणावं--विशेषतः अशा रीतीनं बाबीकाकांचीच फटफजिती व्हावी असं तिला वाटत होतं.

पहिल्यापासूनच बाबीकाकांवर तिचा राग होता. तिच्या घराण्याच्या छळांत बाबीकाकांचा हात प्रामुख्यानं होता. तो छळ कशा प्रकारें झाला होता याची मला कल्पना नव्हती. वारंवार त्या छळाचा उल्लेख जरी जनी करीत असे तरी त्याचा तपशील सांगण्याचं अचुक टाळीत असे. किकी घर सोडून निघाली तर जनीला आनंद होण्यांत या छळांतला कोणता तरी विशेष प्रकारचा तपशील कारणीभूत होत असावा अशी शंका येऊन मी अपेक्षित घटना कशा प्रकारें घडून येतात याची वाट पहात स्वस्थ राहिलें.

प्रकरण १३ वें

# आमचं कुटुंब वाढूं लागलं

आणखी एक आठवडा निघून गेला. किकी अण्णांना येऊन भेटत होती असं मला कळलं पण मी तिकडे लक्ष दिलं नाहीं. जनीलाही या बाबतींतील कांहीं तरी माहिती असावी असा माझा समज होता. ती होऊन बोलत नाहीं मग मी तरी कशाला विचारूं, असं म्हणून मी स्वस्थ बसत होतों.

त्या रविवारीं मुख्य व्यवस्थापक मंडळीची सभा भरवण्यांत येऊन त्या सभेला हजर रहाण्यासाठीं मला आमंत्रण आलं यापूर्वी अशा सभांना मी हजर रहात नसें. सभेंतील चर्चा सदोदित व्यावहारिक स्वरूपाची असल्यामुळं माझ्या हजर रहाण्याची जरूरीही नसे. पण या सभेला मला आमंत्रण आल्यामुळं हें प्रकरण किकीसंबंधाचंच असावं असं मला वाटलं.

अण्णा, धोंडशेट, रामभाऊप्रभृति पंचमंडळी गोळा झाली होती. विषयाचा उपक्रम अण्णांनीं केला. विषय तोच होता. रामभाऊ म्हणाले, " आधींच त्या लोकांशीं आमचं सूत जुळत नाहीं. त्यांत हा अर्ज जर आपण मंजूर केला तर गांवांतला विरोध वाढवल्याचा

आरोप आपल्यावर येईल; त्यापेक्षां पुन्हा मुंबईला कॉंग्रेस-कमिटीला लिहून तिकडूनच शिक्षक मागवून घ्यावा."

"मला विरोधाची भीति वाटत नाहीं." धोंडशेट म्हणाले, "ती मुलगी मोठी उत्साही आहे. या गांवचीच आहे. पगाराच्या बाबतींत तिची फारशी अटही नाहीं. घर सोडून ती निघणार असल्यामुळं तिच्या अन्नवस्त्राची तजवीज झाली म्हणजे पुरे, एवढीच तिची मागणी आहे. ते लोक पूर्वीपासूनच आपल्याला विरोध करताहेत. आतां आणखी जास्त काय करतील? फारतर आपली मुलं शाळेतून काढून घेतील. आहे हाच पसारा मोठा झाला आहे तेव्हां त्यांतून कांहीं मुलं निघालीं तर कांहीं वाईट होणार नाहीं. आपलीं मुलं बाहेरगांवीं पाठवायची त्यांची ताकद आहे. ज्यांना तें शक्य नाहीं त्यांच्याकरतांच ही शाळा आहे. त्यांची तक्रार जोंपर्यंत नाहीं तोंपर्यंत बाकीच्यांची पर्वा करायची जरूरी आहे असं मला वाटत नाहीं. मला वाटतं, कमला जोशी हिचा अर्ज आपण मंजूर करावा."

माझं मत विचारण्यांत आलं. तेव्हां मी बाबीकाकांना ज्या भाषेंत उत्तर दिलं होतं तीच भाषा थोडी मऊ करून मी माझं मत सांगितलं. शाळेच्या किंवा आश्रमाच्या व्यवस्थेंत कोणत्याही प्रकारचा हात घालायची माझी इच्छा नाहीं, असं मी सांगितल्याचा परिणाम एकंदरींत चांगलाच झाला.

किकीचा अर्ज मंजूर करण्यांत आला. सभा बरखास्त झाल्यावर अण्णा आणि धोंडशेट तेवढेच मागें राहिले होते. अण्णांनीं मला खाजगी रीतीनं विचारलं तरीही मी कोणत्याच प्रकारे माझं मत द्यायचं नाकारलं. माझा विरोध असावा अशी त्यांना शंका आली—तसे अण्णानीं उद्गार काढले तेव्हां मी म्हणालों, "इथं मी एक प्रचारक म्हणून आलों आहें---नोकर असं मी फार तर म्हणत नाहीं. प्रचारकाचं काम म्हणजे हुकुमाची अंमलबजावणी करणं. व्यवस्थापकांच्या त्या अधिकारांत मी हात घालूं इच्छित नाहीं. मला सांगायचंय तें एवढंच, कीं मिस जोशी यांची व्यवस्था जिथं मी रहातों तिथं करावी. मी पूर्वीसारखा अण्णांच्या घरीं राहीन."

"काय म्हणून कुणाला एवढं भ्यायचं!" धोंडशेट म्हणाले, "जनी तिथं असतेच. तिची आजीही तिथं येऊन राहील मग तुम्ही तिथं रहायला काय हरकत आहे? वाटेल तर तिलाच एकदां विचारून पहा तिची हरकत नसली तर या कामीं आपण विरोध करण्याचं कांहीं कारण नाहीं."

अण्णांना तें तितकंसं पटलं नाहीं. लोकापवादाची भीती मलाही वाटत होतीच. तरी पण किकी काय म्हणते तें पाहिलं पाहिजे होतं. जनी तर पाहिल्यापासूनच या प्रस्तावाला अनुकूल होती.

झालेल्या ठरावाची हकिकत बाबीकाकांच्या कानीं गेल्यावांचून राहिली नाहीं. अण्णांच्या दुकानीं जाऊन त्यांनीं केवढा तरी थयथयाट केला. अण्णांनीं एका शब्दानंही उत्तर दिलं नाहीं, तेव्हां बाबीकाकांचा मोर्चा माझ्याकडे वळला. आतां त्यांनीं पूर्वीचा प्रश्न सोडून ती कुठं रहाणार याची चौकशी माझ्याकडे करायला सुरवात केली. तोंपर्यंत कांहींच ठरलं नव्हतं त्यामुळं मी तरी त्यांना काय उत्तर देणार होतों ? माझ्याकडून निश्चित बातमी कांहीं मिळत नाहीं असं पाहून अगदीं स्वच्छ भाषेंत मला शिव्या देत बाबीकाका निघून गेले.

दुसऱ्याच दिवशीं किकी मला भेटायला आली. मी गंभीरपणाचा आव आणला होता. ती म्हणाली, " एव्हांपासूनच वरिष्ठपणाचा अधिकार गाजवायला सुरवात झाली वाटतं ? "

"यांत वरिष्ठपणा कसला ? हा व्यवहार आहे. अन् वरिष्ठपणा तरी मी कुठं गाजवला आहे?"

" लिंगायताच्या मढ्यासारखा थाट आणून जे बसलां आहांत ते काय म्हणून ? मोकळेपणानं बोललांत तर बिघडेल का ? काय करावं हें विचारायला मी आलें आहें—"

" आतां काय विचारायचं राहिलं आहे ? अर्ज दिला, तो मंजुर झाला, नेमणूक झाली, आतां फक्त कामाला सुरवात करायची राहिली आहे. आतां मला विचारायचं काय राहिलं आहे ? "

" समजा, मी आधीं विचारलं असतं तर तुम्ही कोणता सल्ला दिला असता ? "

" तें आतां सांगण्यांत कोणता अर्थ ? "

" पण सांगा तर खरं. "

" मी सांगितलं असतं, गावांतल्या गावांत राहून चालत्या गाड्याला खीळ घालण्यापेक्षां सरळ मुंबईची वाट धरा ! बरा पगार मिळाला असता तुम्हाला अन् निमगांवांतही विरोध माजला नसता. "

" अजूनही असंच वाटतं का तुम्हांला ? "

" आतां सांगण्यांत काय अर्थ ? मी होय म्हटलं म्हणून ठरलंय तें थोडंच बदलणार आहे ! "

" एकंदरींत तुम्हाला आवडलं नाहीं म्हणायचं ! " असं म्हणून ती क्षणभर उगीच राहिली.

ती कांहींच बोलत नाहीं असं पाहून मी म्हटलं, " हा एक अविचार झालाच, पण हें संकट माझ्यावर कां ? इथंच रहाण्याचा आग्रह कां ? "

" मी कुठं आग्रह केला ? " ती मिस्किलपणें हंसत म्हणाली, " व्यवस्थापकांनीं जी व्यवस्था केली त्याप्रमाणें वागणं मला भाग आहे."

" अगदीं मुकाट्यानं कबूल केलं ? "

" कुणी ? "

" तुम्ही ! "

" आतां आलं का तुम्ही ? " ती तोंड वेंगाडून म्हणाली. मी अस्वस्थ झालों. शक्य तेवढं तें सर्वनाम टाळायचा मी आतांपर्यंत प्रयत्न केला होता.

मी म्हटलं, " शाळेंत काम करायचंय आपल्याला–तिथं तुम्हीच म्हटलं पाहिजे. "

" अन् इथं घरीं ? "

" म्हणजे ? इथं रहाणारच तूं तर! "

" आतां कसं बरोबर आलं ! " ती मोठमोठ्यानं हंसत म्हणाली.

" घरीं एक आणि शाळेंत एक—अशा दोन भाषा वापरणं कांहीं मला खपायचं नाहीं ! " रागाचं उसनं अवसान आणून मी म्हणालों.

" तें आतां पाहूंच तर—" असं म्हणून किकी एकदम उठून आंत गेली.

आमचं भाषण ऐकण्यासाठीं जनी आंत दाराआड उभी राहिली असावी अशी मला शंका होती. किकी आंत जातांच दोघीही मोठमोठ्यानं हसल्याचा आवाज मला ऐकूं आला. मी पुन्हां अस्वस्थ झालों. त्या एकीनंच मला टेकीला आणलं होतं; आतां या दोघी आल्या. या दोघींनीं संगनमत करून मला वठणीला आणायचं ठरवलं तर मी तरी काय करणार होतों ?

माझा अस्वस्थपणा वाढत होता. खेडेगांवांत कुठंही अस्तित्वांत नसणारी ही विचित्र कुटुंबव्यवस्था गांवच्या लोकांना कितपत पसंत पडली असती याचा कुणालाच अंदाज नव्हता. शहरांतसुद्धां अशा प्रकारची बिऱ्हाडाची योजना कितपत पटली असती याची शंका होती. आधींच ब्राह्मणमंडळीचा विरोध होता. त्यांनीं इतरांनाही खिजवलं असतं तर मुळावरच

घाव पडल्यासारखा झाला असता. जें काम करायचं त्याची जबाबदारी स्वतःवर न घेतां पुढील व्यवस्थेचा भार अण्णावर सोपवायचें मी आपल्या मनाशीं ठरवलं.

एक प्रकारें हा माझा भेकडपणा होता. पण ज्या अपरिचित वातावरणांत मी येऊन पडलों होतों, तिथं शक्य तितकं जपून वागणं मला भाग होतं.

शेवटीं त्या दोघींनीं आपला हट्ट चालवला. किकीनं अण्णांची समज कशा रीतीनं घातली तें कांहीं मला कळलं नाहीं. पण ते स्वतःच ज्यावेळीं तिला तिच्या सामानसुमानासह घेऊन माझ्या बिऱ्हाडीं आले तेव्हां मला बोलायला जागाच राहिली नाहीं.

आपल्यावरची जबाबदारी सोडवून घेण्यासाठीं मी म्हणालों, " असं पहा अण्णा, तुम्ही हिला इथं घेऊन आलांत, ती ही आतां इथंच रहाणार आहे का ? " अण्णांनीं नुसती होकारार्थी मान हालवली तेव्हां मी म्हणालों, " गांवांतले लोक काय म्हणतील याचा विचार केला आहे का ? "

" त्याची तुम्हांला काळजी नको. " अण्णा म्हणाले, " गांवांतल्या लोकांना म्हणायला काय जातं ? हिच्या बिऱ्हाडासाठीं स्वतंत्र जागा आणि स्वतंत्र स्वैंपाकी ठेवायला खर्च द्यायला कुणी येतंय का ? तुम्ही कांहीं काळजी करूं नका गुरुजी. कोण कांहीं म्हणूं लागलं तर तें आमचं आम्ही पाहून घेऊं. "

माझा जीव खालीं पडला. मी न सांगतां किकीनं या कामीं अण्णांना इरेस घातलं तें बरं केलं. दूरदर्शीपणानं तिनं जबाबदारीचा बोजा मोठ्या युक्तीनं माझ्या खांद्यावरून उचलून अण्णांच्या माथीं चढवला.

त्या दिवशीं नित्याप्रमाणें जेवण जनीनंच केलं होतं. तिची आजी प्रकृति बरी होतांच येणार होती. मी आणि किकी जेवायला बसलों—जनी वाढीत होती—वाढीत असतांना किकी जनीला पुनः पुन्हा डोळा घालून कां हसत होती तें मला कळेना. जेवीत असतांना मी मुळींच बोलत नाहीं असं पाहून किकी म्हणाली, " जेवतांना न बोलायचा तुमचा नियम आहे वाटतं ? "

" छे छे, तसं कांहीं नाहीं. कसलेच नियम पाळीत नाहीं मी. ते सारे नेमधर्म तुमच्या त्या सनातनी लोकांनाच लखलाभ होवोत. "

कांहीं वेळ पुनः स्तब्धता पसरली.

## फाटकी वाकळ

" जनी जेवण चांगलं करते—नाहीं ? " जनी वाढायला आली असतां किकी मला म्हणाली.

" चांगल्यावाइटाचा मी फारसा विचार करीत नाहीं. " मी म्हटलं, " कित्येक वर्षे खाणावळींत गेल्यामुळं मला जेवणाची रुचि राहिलेली नाहीं. "

सैंपाकघराच्या दाराशीं उभी राहून जनी म्हणाली, " कमाताईला देखील जेवण करतां येतं बरं का. आळीपाळीनं आम्ही चुलीचा ताबा घेणार आहोंत. "

" एवढ्याचसाठीं हिला इथं रहायचा आग्रह केलास वाटतं ? " मी हंसत विचारलं.

" तसंच का म्हणाना—" जनी म्हणाली, " पण मला वाटलं होतं जेवण करायचा सारा भार कमाताई घेईल. मी आपली हाताजवळ काम करीन—चूल फुंकायची माझी दगदग तरी चुकेल म्हणून मी एवढा आग्रह केला तिला इथं येऊन रहायचा. पण ही म्हणते काय 'जने, मला तुझ्याहातचं जेवण चालेल !' शिकलेल्या मुलींना जेवण कुठं करतां येतं ? मी तसं म्हटलं तेव्हां कुठं आळीपाळीनं जेवण करायला कबूल झाली. मला वाटतं, एक दिवसाआड तुम्हाला उपास पडणार ! "

आम्हीं सारींच मोठमोठ्यानं हसलों. वातावरण निवळत चाललं होतं. मलाही हळुहळु मोकळेपणा वाटत होता. मुंबईला असतांना आई हयात असल्या वेळची आठवण झाली. आजवर जनी जेवण करून वाढीत होती खरी पण घराच्या घरपणाला आपुलकीची छाया आली नव्हती. आज किकी आल्यामुळं हें घरसं वाटूं लागलं !

मला वाटलं, हा माझा सांस्कारिक दृष्टिदोष होता. इतके दिवस जनी घरांत वावरत होती, पण त्या कौटुंबिकतेला वास्तवपणा येत नव्हता. किकी आल्यामुळं जी आपुलकी वाटूं लागली ती समानधर्माच्या जाणीवेनं, सुशिक्षितपणाच्या जाणिवेनं, कीं एक-जातीच्या जाणिवेनं ?

यापूर्वी जनी घरकाम आटोपून आपल्या घरीं जात असे. आजपासून ती इथंच रहाणार होती. त्यापूर्वी मी जेवण झाल्यावर एकटाच कांहींतरी वाचीत पडत असें, पण आज शेजारीं किकी येऊन बसली तेव्हां मला कसंसंच वाटलं. जनी केव्हांही अंतर ठेवूनच वागत असे. ती एक नोकर आहे हें मी विसरत नव्हतों. पण किकी येऊन ज्यावेळीं अगदीं जवळ बसली त्यावेळीं मला प्रश्न पडला, कीं कोणत्या नात्यानं आम्ही आतां या घरांत वावरणार आहों ?

ती नोकर होती खरी–पण माझी नोकर नव्हती. नोकर या नात्यानं तिचा माझा दर्जा वस्तुतः सारखाच होता. शिक्षणाच्या दृष्टीनंही आतां ती माझ्याच दर्जाची होती. एकाच दर्जाचे दोन सहकारी या नात्यानं आम्ही वागलं पाहिजे होतं, शाळेंत आम्ही तशीं वागलों असतों, इतर चळवळींतही तोच दर्जा ठेवला असता; पण एका घरांत रहातांना आम्ही दोघांनीं एकमेकांशीं वागण्यांत कोणतं धोरण ठेवावं हें मला निश्चित ठरवतां येईना.

ज्या अर्थी ती एकदम येऊन अगदीं आपलेपणाच्या भावनेनं इतक्या जवळ बसली त्याअर्थी तिनं आपलं धोरण निश्चित केलं असावं असं मला वाटलं. तिला संकोच वाटत नव्हता—पण तिला संकोच वाटत नव्हता म्हणूनच मी अस्वस्थ झालों होतों. तसं पाहिलं तर तिच्या स्वभावाचा मला मुळींच परिचय नव्हता. कॉलेजांत असतांना तिच्याबद्दल ज्या गोष्टी बोलल्या जात होत्या त्यांत दोन गटांत दोन प्रकारचं स्वरूप होतं. कुणी तिला फाजील म्हणत तर कुणी सडेतोड म्हणत. पण असभ्य वर्तनाचा आरोप तिकडे कुणीही तिच्यावर केला नव्हता. बाहेरच्या कुणी माणसानं पाहिलं असतं तर तिच्या या सलगी-मुळं आमचा फार दिवसांचा परिचय असावा असा त्याला भास झाला असता. परि-स्थितीचा आढावा घेत मी आपल्याशींच विचार करीत स्वस्थ बसलों आहें असं पाहून ती म्हणाली, “ कां ? विचार कसला चाललाय ? ”

“ तुझ्या धैर्याचं मला कौतुक वाटतं—” मी गंभीर होऊन म्हटलं, “ आधीं हें खेडेगांव, गांवचे सारे लोक जुन्या संस्काराचे, तूं घरांतून भांडून निघालेली—गांवांत घर असतांना परक्या माणसाच्या बिऱ्हाडांत येऊन रहाण्याचा धीर तुला झाला तरी कसा ? पुरुषाला-सुद्धां हें कठीण गेलं असतं. ”

“ कठीण तर आहेच—” किकी म्हणाली,“ पण मनाचा धडा करून—चांगला मागला पुढला विचार करून मी हें व्रत पत्करलंय. जगाचे आघात कसे होतील याची मला कल्पना आहे. पण या वेळीं तुम्ही मला धीर द्यायला हवा. तुमचा धीर खचला—नव्हे, तुम्हाला नुसता संकोच जरी वाटूं लागला तरी मला इथं रहाणं मुष्किलीचं होईल. येईल त्या संकटाला तोंड द्यायची माझी तयारी आहे. कसाही छळ झाला तरी पाऊल मागं घ्यायचं नाहीं असा मी निश्चय केलाय. अण्णा आणि धोंडशेट या दोघांनींही माझी बाजू सांवरून धरायचं कबूल केलं आहे. आतां काय तें तुम्हींच थोडं धैर्य दाखवलं पाहिजे. !

एवढ्या पोक्तपणानं ती बोलत होती कीं मला सुद्धां तिच्या पुढं आपण क्षुद्र आहों असं वाटूं लागलं. मी म्हणालों, " खरं सागूं किकी, मी घाबरलोंय. कौटुंबिक जीवनाचा मला अनुभव नाहीं. भरल्या घरांत मी कधीं वावरलों नाहीं. आधीं मुंबईची वस्ती–त्यांत आम्ही होतों तेव्हां मोजकीं माणसं—पुढं अगदीं फकिराचा संसार—अशा परिस्थितींत दिवस काढल्यामुळं कुटुंबाच्या घरांत कसं वागावं हें मला अजूनही कळलेलं नाहीं. पहिल्यानं अण्णांच्या घरीं ज्यावेळीं मी जेवायला जात होतों त्यावेळीं तिथलं कौटुंबिक वातावरण मला थोडंसं त्रासदायक वाटत होतं. पण हळु हळु जसजसा परिचय होऊं लागला तसतसा त्या वातावरणाचा माझ्या मनावर परिणाम होऊन मी त्यांत रमून जाऊं लागलों. स्वतंत्र बिऱ्हाड करून राहिल्यावर मला पहिल्यानं कांहीं दिवस ओकंओकं वाटूं लागलं. तरीही तिथली गोष्ट वेगळी होती. घरांतल्या बायका म्हणजे सास्वासुना होत्या; अण्णा, अण्णांचे भाऊ, त्यांचीं मुलं, असा सारा मोठा कबिला होता. आज आपण इथं लहानसं कुटुंब थाटतों आहों पण त्यांत कुणीच कोणाचं कुणीही नाहीं. मी एक कुणीतरी, तूं एक कुणीतरी, जनी हिशेबांतच येत नाहीं–उद्यां तिची आजी आली तर–मला वाटतं कदाचित या घरचं वातावरण घरासारखं दिसूं लागेल. ना धड घर, ना खाणावळ कीं ना बोर्डिंग हाउस, असं एक जें विलक्षण वातावरण निर्माण होतं आहे तें पाहूनच मी घाबरून जातो आहें. "

" मला मोठं आश्चर्य वाटतं तुमचं !" किकी हसून म्हणाली, " घाबरून जाण्यासारखं काय आहे इथं ? "

" कां बरं ? " मी गंभीर होऊन म्हटलं, " आपण इथं राहतों आहोंत–काय आपला संबंध आहे ? "

" तें खरं आहे–" किकी म्हणाली, " पण जें नाहीं तें करून दाखवण्यासाठीं तुम्ही इथं आलां. इथं शिक्षणाची आवड नव्हती—ती आवड तुम्ही उत्पन्न केली. सूत काढणं हा कोष्ट्याचा धंदा असा इथं समज होता—इथं तुम्ही सर्वांना कोष्टी बनवलं. आणखीही कांहींतरी कार्यक्रम सुरू करावे असं तुम्ही म्हणतां आहां असं अण्णानीं मला सांगितलं. या उंबरांतल्या किड्यांना उद्यां तुम्ही उघड्या आकाशाकडे बघायला शिकवाल आणि एवढंच हें तुम्हाला कठीण वाटतं ? अशक्य वाटतं ? "

तिच्या शब्दांतल्या सामर्थ्यानं मी क्षणभर दिपून गेलों. ती मला डिंवचीत होती कीं स्फूर्ति आणायचा प्रयत्न करीत होती तेंच मला कळेना. मी उगी राहिलों असं पाहून ती

म्हणाली, “ तुम्हाला या वेळीं काय वाटतंय याची मला कल्पना आहे. पण आपण कांहीं तरी सुधारणा करण्यासाठीं म्हणून निघालों आहोंत. सामान्य माणसासारखं सर्वसाधारण वर्तन करण्यानं आपला कार्यभाग होणार नाहीं. विश्वकुटुंबाच्या वृत्तीला असल्या या संसारातूनच सुरवात केली पाहिजे असं नाहीं तुम्हाला वाटत ? ”

मला उत्तर सुचेना.

ती म्हणाली, “ उत्तर द्यायचं नसलं तर नका देऊं. पण जगाच्या आघाताला तोंड देऊन आपल्याला हा नवा प्रयोग यशस्वी करून दाखवला पाहिजे. तुमचं मन निर्मळ आहे, माझंही मन निर्मळ आहे, जनी तर निर्मळपणाची मूर्तिमंत प्रतिमा आहे—तुम्ही अजून तिला ओळखली नसेल पण लहानपणापासून मी तिला पहातें आहें––जोडीला जनी आहे म्हणूनच मी या फंदांत पडलें. तिच्या आजीचा अजून तुम्हाला परिचय झाला नाहीं. ती एक मोठी फिलॉसफर आहे. ती शिकलेली नाहीं, तिनं कांहीं वाचलेलं नाहीं, पण ज्या तत्त्वज्ञानाची चर्चा करतांना विद्वानांचीं डोकीं फाटतात तसलं तत्वज्ञान आपल्या कुणबाऊ बोलीनं ती तुम्हाला सहज ऐकवूं शकेल. अशी माणसं एका जागीं जुळायचा योग मोठा कठीण ! तो जुळला आहे. तो आपण यशस्वी करून दाखवूं असं नाहीं का तुम्हाला वाटत ? ”

मी म्हटलं, “ किकी, परिस्थितीची जाणीव जेवढ्या प्रमाणांत तुला आहे तेवढी मला नाहीं. तूं मला निर्मळ म्हटलंस पण मी कसा आहें याचा पडताळा मिळण्याइतका आपला सहवास घडला नाहीं. जनीबद्दल तूं मला जें सांगितलंस तें मला पटतं—पण रागाऊं नकोस––तुझा माझा पुरता परिचयसुद्धां नाहीं—”

“ एवढंच ना ? ” ती मोठमोठ्यानं हसत म्हणाली, “ मग आतां होईल परिचय—” घरांतलं काम उरकून जनी तितक्यांत आली. तिला उद्देशून किकी म्हणाली, “ ऐकलंस जने, हे तुझे गुरुजी मला घाबरतात. तशी घाबरण्याजोगी मी आहें का ? ”

“ आतां घ्या म्हणावं अनुभव ! ” जनी म्हणाली.

“ पहा आतां––” किकी म्हणाली, “ जनीसुद्धां तेंच सांगतेय, पण जने, तुझ्यावर मात्र तुझ्या गुरुजींचा विश्वास आहे. ते भिताहेत काय ते मला. ”

“ आपोआपच जाईल त्यांची भीति ! ” जनी म्हणाली, “ चल, आतां आपण आपलं बिऱ्हाड लावूं. ” असं म्हणून किकीचा हात धरून तिला ओढीत ती घरांत घेऊन गेली.

# फाटकी वाकळ

जवळ पडलेलं पुस्तक घेऊन मी वाचायचा आव आणला. पण वाचलेलीं अक्षरं माझ्या डोक्यांत ठरेनात. मी भांबावून गेल्यासारखा झालों होतों. किकीचा आत्मविश्वास आहे कीं नुसताच बेफामपणा आहे ? कुठल्या या वावटळींत मी सांपडलों !

मी पुन्हा वाचायचा प्रयत्न केला. मनाचा निश्चय करून हे सारे विचार मी डोक्यांतून काढून टाकण्याचा प्रयत्न करीत होतों. किकी आणि जनी आंत मोठ्यामोठ्यानं खिदळत होत्या. तें त्यांचं किडमिडणं ऐकून माझ्या आंगावर रोमांच येत होते. आजपर्यंत भकास वाटणारी ही मठी या दोन तरुणींच्या आस्तित्वानं आज सजीव झाल्यासारखी वाटत होती. पुस्तक बाजूला ठेवून दिवा मालवून मी बिछान्यावर पडलों.

तरीही आंत त्यांचं बोलणं सारखं सुरू होतं. उठून माजघराच्या दाराला खीळ द्यावी असा विचार माझ्या मनांत येत होता. पण जोंपर्यंत त्या दोघी आंत बोलत होत्या तोंपर्यंत तसं करणं मला भेकडपणाचं वाटलं.

मोठ्या खुषींत येऊन त्या आंत बोलत होत्या, सारख्या हसत होत्या, खिदळत होत्या, त्यांच्या त्या हसण्याखिदळण्यानं घरभर फुलबाग बहरला आहे असं मला वाटलं.

बाहेर मी एकटाच पडलों होतों. आंत त्या दोघी होत्या. एकमेकांचीं मनं मोकळीं करून एकमेकांशीं बोलत होत्या.

मी मात्र एकटाच होतों. मला वाटलं, यावेळीं माझ्याच सारखा एकादा जोडीदार माझ्या-बरोबर हंसायला खिदळायला असता तर केवढी बहार झाली असती !

आंतला दिवा मालवला तरीही त्यांची बडबड थांबत नव्हती. त्या मोठ्या रंगांत आल्या होत्या. त्या काय बोलत होत्या तें मला ऐकूं येत नव्हतं—पण त्या अस्पष्ट शब्दांच्या झंकारानं माझ्या हृदयाला झिणझिण्या येत होत्या.

त्यांचं तें बोलणं ऐकायचा प्रयत्न करीत असतांच मला केव्हां झोप लागली तें कळलं नाहीं.

प्रकरण १४ वें

# किकी अनाथ झाली

मुलींच्या शाळेंत 'मास्तरीण' असलेली पहायची लोकांना सवय होती. पण खेडेगांवच्या मुलांच्या शाळेंत—विशेषतः इंग्रजी शाळेंत मास्तरीण येऊन शिकवूं लागल्यापासून सर्वांनाच मोठं आश्चर्य वाटलं.

गांवच्या बायका पाणवठ्यावर जात असतांना रिकाम्या घागरी बाजूला ठेवून इंग्रजी शिकवीत असलेल्या या मास्तरणीला पहाण्यासाठीं खिडकींतून डोकावल्यावांचून सहसा पुढं जात नसत. ' काय ग बाई तरी! बाबीकाकांची कमी इंग्रजी कीं ग बोलते!' असं म्हणून त्या आपापसांत जे आश्चर्योद्गार काढीत त्याचं मला कौतुक वाटे. एक मुलगी इंग्रजी बोलते, इंग्रजी शिकवते, याचं कौतुक करायचा काल आतां राहिला नव्हता. पण तो शहरामधें. किकी कॉलेजांत असते हें गांवच्या लोकांना माहीत होतं, पण रजेंत ती जेव्हां जेव्हां गांवीं येई तेव्हां तेव्हां तिच्या इंग्रजी बोलण्याचा पुरावा कुणाला कुठं सांपडत नसे; म्हणूनच मुलांना—म्हणजे पुरुषमुलांना—इंग्रजी शिकवणाऱ्या या मुलीचं त्या लोकांना कौतुक वाटूं लागलं.

साऱ्या गांवांत बायकामंडळींत हाच एक चर्चेचा विषय होऊन बसला होता. त्या चर्चेत कोणत्याही प्रकारचा निषेधाचा भाव नव्हता. बायकांना तिच्याबद्दल अभिमान वाटत होता. एका स्त्रीनं पुरुषांची मास्तरीण होणं म्हणजे कांहीं तरी अजब आहे असं त्यांना वाटे आणि म्हणूनच गांवच्या बायका तिच्याकडे आदरानं पहात. ब्राह्मणवठारांत या बाबतींत कोणती चर्चा चालत असे याची खबर माझ्यापर्यंत येऊन पोंचली नव्हती.

या सर्व प्रकरणीं किकी अगदींच उदासीन होती. शाळेंत काम करूं लागल्यापासून तिनं आपले कान झाकून घेतले होते. आखलेल्या मार्गानं जायचं, आजूबाजूला पहायचं नाहीं, निंदास्तुतीची चाड बाळगायची नाहीं अशा दृढनिश्चयानं ती आपलं शिक्षिकेचं काम बजावीत होती. माझ्या भावनेच्या दृष्टीनं आमच्या गृहस्थितींत पहिल्या दिवशीं जी परिस्थिति उत्पन्न झाली तिचा परिणाम पुढं टिकून राहिला नाहीं.

जनीनं म्हटलं तें खरं होतं. किकीला जेवण करतां येत नव्हतं. तरीही स्वैंपाक करण्याच्या हट्टानं ती जनीकडून धडे घेत रोज आमच्या जेवणाची आबाळ करीत होती. एक दिवसाआड किकीच्या हातचं 'नवनवोन्मेषशाली' जेवण पचवण्याचं दिव्य मला करावं लागत होतं. स्वैंपाक करणं म्हणजे कांहीं मोठं बिकट काम नव्हे खरं, पण कांहीं केल्या किकीला तें साधत नव्हतं. एकदोन दिवस चुणुक दाखवण्यासाठीं म्हणून मी स्वैंपाक करून दाखवण्याचा प्रयोग केला, तो किकीच्या प्रयोगापेक्षां यशस्वी ठरला.

किकीनं जेवण करण्याच्या भानगडींत पडूं नये असं जनीचं मत होतं; पण ती आपला हट्ट सोडीना. जनीची आजी सुभद्रा आतां चांगली बरी होऊन आमच्याकडे रहायला आली होती. ती आल्यापासून आमच्या संसाराला एक प्रकारचं पोक्तपणाचं स्वरूप आलं. गांवच्या लोकांत या आमच्या कुटुंबव्यवस्थेबद्दल जरी बरीच चर्चा चाले तरी उघडपणें आम्हाला नांव ठेवण्याचा प्रयत्न कुणी केला नाहीं. ब्राह्मणमंडळींत अर्थातच आम्हाला विरोध होता. तो नुसताच या कुटुंबव्यवस्थेकरतां नसून आमच्या सर्व प्रकारच्या भ्रष्टाकाराबद्दलचा होता. किकी आमच्याकडे येऊन राहिल्यापासून कांहीं दिवस बाबीकाकांनीं गांवांत यायचं अजिबात वर्ज्य केलं होतं त्यामुळं किकीला हायसं वाटलं.

आमच्या या नव्या संस्थेबद्दल आणि त्या संस्थेंत चालत असलेल्या कार्याबद्दल गांवांतल्या सर्वसामान्य लोकांना जो एक आदर होता, अस्पृश्यतानिवारणाची जी एक

पुढल्या पायरीची अपेक्षा गांवांतल्या कित्येकांना भीतिदायक वाटत होती, त्यापेक्षां ब्राह्मण-मंडळी ओरड करीत असलेला हा आमचा 'भ्रष्टाकार' सर्वेत्रांना क्षम्य वाटत होता.

किकी बी. ए. झाल्याची बातमी आली तेव्हां गांवच्या लोकांनीं आपल्या खर्चानं गांवभर पेढे वांटले. ते पेढे बाबीकाकांकडे पाठवून देण्यांत आले तेव्हां त्यांनीं ते भिरकावून दिले. ही बातमी किकीला कळली तेव्हां तिला दुःख झालं. ती म्हणाली, "काका म्हणत असत, कीं जें आम्ही मिळवलं नाहीं तें आमच्या मुलांनीं मिळवावं—मी बी. ए. व्हावं अन् बी. ए. मुलीचा आपण बाप म्हणून मिरवावं, असं वारंवार म्हणणाऱ्या काकांनीं आतां हें असं करावं ना ?" क्षणभर तिला गहिंवर आल्यावांचून राहिला नाहीं.

जनीनं चोरून तिच्या आईची भेट घेतली त्या वेळीं ती किकीची हकिकत विचारीत पोटभर रडली. किकी बी. ए. झाल्याबद्दल तिला आनंद झाला होता. बाबीकाकांनीं पेढे फेकून दिले ही गोष्ट तिच्या मनाला फार लागून राहिली होती. 'आम्हीच जिथं पेढे वांटायचे तिथं माझी मुलगी पास झाली म्हणून गांवानं वांटलेले पेढे असे फेकून दिले हें बरं झालं नाहीं.' असं म्हणून ती आणखी रडूं लागली असं जनीनं सांगितलं. कांहीं तरी कारण काढून किकीला येऊन भेटावं असं तिला वाटत होतं, पण त्याचबरोबर बाबीकाकांच्या रागाची तिला तितकीच भीति वाटत होती.

एका कुटुंबाच्या सुखासमाधानांत झालेला हा विक्षेप माझ्या मनाला लागल्यावांचून राहिला नाहीं. हें प्रकरण कसं मिटवावं याचा आम्ही विचार करीत होतों. पण बाबी-काकांच्या हाडकपाळीपणामुळं कुणाचीच मात्रा चालण्याचा संभव नव्हता.

जोडीला किकी मिळाल्यामुळं शिक्षणाच्या कार्याबरोबरच चरखे—मागाचं काम जास्त जोराला लागलं होतं. बहुतेक मुलं आतां सूत काढण्यांत तरबेज झालीं होतीं. त्या सुताचा कपडाही आतां नमुनेदार निघूं लागला होता, असं पाहून गांवच्या लोकांना त्या कामीं अभिमान वाटावा, उत्तेजन यावं म्हणून किकीनं एक समारंभ करण्याचं ठरवलं.

गांवच्या मुलांनीं काढलेल्या सुतापासून तयार केलेल्या खादीचे सदरे या समारंभाच्या वेळीं गांवच्या प्रमुख व्यक्तींना द्यायचं ठरवलं होतं. या समारंभाच्या अध्यक्षस्थानीं माझी योजना करण्यांत आली होती. या समारंभाला सारा गांव लोटला होता—बायकासुद्धां आल्या होत्या. चांभारमंडळींना बसवण्याची व्यवस्था थोडं अंतर ठेवून करण्यांत आली होती. गावची ब्राह्मणमंडळी मात्र या समारंभाला मुळींच हजर राहिली नव्हती.

मुख्य भाषण किकीनं केलं. त्यांत तिनं, आपलं अन्न आणि वस्त्र आपणच निर्माण करून स्वयंपूर्ण होण्याच्या प्रयत्नाचं महत्त्व सर्वत्रांना पटवून दिलं. धोंडशेट, अण्णा, रामभाऊ प्रभृति मंडळींना एकेक सदरा माझ्या हस्तें अर्पण करण्यांत येऊन हार घालण्यांत आला तेव्हां तेही सद्गदित झाल्यावांचून राहिले नाहींत.

माझ्या भाषणांत मी बहुतेक किकीच्या भाषणाचाच अनुवाद केला, पण तिच्या भाषणापुढं माझ्या भाषणाचं तेज पडलं नाहीं असं माझं मलाच वाटलं. वक्तृत्वाच्या कलेंत ती जितकी निपुण होती तितकीच या कार्याबद्दलची तिची तळमळ आंतरिक श्रद्धेची होती, म्हणूनच तिचं भाषण परिणामकारक झालं.

या समारंभाचा गांवांतल्या लोकांवर चांगलाच परिणाम झाला. धोंडशेट हे आर्यसमाजी होते. काँग्रेसचीं कांहीं तत्त्वं त्यांना तितकींशीं पटत नव्हतीं. खादीच्या बाबतींत ते जरी विरोधी नव्हते तरीही त्यांना खादीबद्दल फारसा जिव्हाळा वाटत नव्हता. असं असतांना या समारंभाच्या दुसऱ्याच दिवशीं ते जेव्हां सूत काढायचं शिक्षण घेण्यासाठीं आमच्याकडे आले त्या वेळीं मी आश्चर्यचकित झालों. ते म्हणाले, "या तुमच्या खादीच्या चळवळीमागं राजकारण काय असेल तें असो, तें कांहीं मला पहायचं नाहीं. पण माझ्या गांवच्या पोराबाळांनीं तयार केलेला कपडा माझ्या आंगावर चढल्याचं पाहिलं—तो आंगावर चढवला तेव्हां खरोखरच माझ्या मनांत कांहीं तरी नवीनच भावना उत्पन्न झाली. आपणच सूत काढून त्याचा कपडा एकदां आंगावर चढवावा असं मला वाटूं लागलं अन् म्हणूनच मी तुमच्याकडे आलों."

त्यांचं भाषण ऐकून किकीला अतिशय आनंद झाला. आपल्याला सर्वांत मोठा जय मिळाला असं तिला वाटलं.

धोंडशेट चरखा फिरवीत आहेत असं दिसून येतांच गांवांतल्या इतर मंडळींनाही स्फूर्ति आली. नवे नवे चरखे आणवण्यांत आले. कापसाच्या पुळ्या बाहेरून न आणतां तिथल्या तिथंच तयार कराव्या अशी योजना करण्यांत आली. देवकापसाचं वेड माझ्या आणि किकीच्या डोक्यांत होतंच. पांचसहा मुलं बारीक धागा काढण्यांत तरबेज झालीं होतीं. त्यांना दररोज पुरतील इतक्या देवकापसाच्या पुळ्या तयार करण्यासाठीं तो कापूस आजूबाजूच्या खेड्यांतून मिळवून आणायला आम्ही सुरवात केली. रोज दहा माणसं सारखीं चार तास पिळदार सूत कांतीत बसलीं तर एका मागाला रोज भरपूर काम मिळे. तो अंदाज

धरून आमचे दोन माग रोज सारखे चालतील इतकं सूत आम्ही काढायला सुरवात केली आणि दररोज सोळा वार कपडा आमच्या या कारखान्यांत निघूं लागला.

या सर्व उपद्यापांत आम्ही गुंतून गेलों होतों. गांवच्या लोकांचं लक्षही या गोष्टीकडे लागलं होतं त्यामुळं आमच्या बिन्हाडांत थाटलेल्या विलक्षण कुटुंबव्यवस्थेबद्दल चर्चा करणं बाजूला राहिलं. माझ्याही ध्यानांतून तो संकोच आपोआप नाहींसा होत गेला.

तरीही माझं मन एकांताच्या कालांत चलबिचल करीत होतं. आम्ही एका जागीं रहात होतों, खेळीमेळीनं वागत होतों असं बाह्यतः दिसत होतं; पण अंतरंगांतून सर्वांच्याच मनांत कसली तरी खळबळ चालत होती असा मला संशय येई. त्या खेळीमेळीच्या वातावरणांत आतां जरी संकोच राहिला नव्हता तरी एकमेकांपासून एकमेकांकडे आम्ही कांहींतरी चोरून ठेवीत आहों, अशी जाणीव निदान मला तरी होत होती.

हीं कामं सारखीं सुरू असल्यामुळं आणि माग सारखे चालू ठेवण्याच्या हव्यासामुळं आम्ही आठवड्यांतून एकादा दिवस सुद्धां विश्रांति घेत नव्हतों. हलुहलु सूत कातणाराची संख्या वाढूं लागली तसतसं सूतही शिल्लक पडूं लागलं, तेव्हां प्रत्येक रविवारीं सुट्टी घेण्याचं आम्ही ठरवलं.

ब्राह्मणवठारांतील मंडळींच्या कारवाया बाहेरून सुरू होत्या. बाबीकाका शक्य तेवढं करून आपण या सर्व प्रकरणीं उदासीन आहोंत असं दाखवण्याचा प्रयत्न करीत होते. शाळेंत येणाऱ्या मुलांपैकीं एकाददुसराच ब्राह्मण मुलगा या चरख्याच्या कार्यक्रमात भाग घेत होता. आम्ही कोणावरच सक्ती करीत नव्हतों. तरीही ज्यानं त्यानं काढलेल्या सुताचा कपडा, विणण्याची मजुरी घेऊन त्याला त्याला देण्यांत येत होता. या योजनेमुळं पुष्कळ लोक हौसेनं या कामीं भाग घेऊं लागले.

चरख्याचे वर्ग—कारखानाच म्हणाना—चालवण्यासाठीं आतां विशेष नजर ठेवावी लागत नसल्यामुळं जनीनं एक नवा कार्यक्रम सुरू केला. आजपर्यंत या कामीं मुलं आणि क्वचित मोठे पुरुष एवढेच भाग घेत होते. एवढ्यानं तिचं समाधान होईना. शाळेच्या वेळांत हे चरखे घेऊन ती प्रत्येकाच्या घरीं जाऊं लागली आणि घरीं रिकाम्या बसलेल्या बायकांना सूत कातण्याचं शिक्षण देऊं लागली. किकी शाळेच्या कामांत गुंतलेली असल्यामुळं इच्छा असूनही तिला या कामीं भाग घेतां येत नव्हता.

## फाटकी वाकळ

अनुभवाअंतीं असं दिसून आलं कीं, बायका या कामीं जास्त वाकबगार होत्या. थोड्याच दिवसांत गांवच्या बायकांनीं ही कला साध्य करून घेऊन कुणापेक्षांही जास्त चांगलं आणि जास्त प्रमाणांत सूत कांतायला सुरवात केल्याचं दिसून आलं.

दोन कार्यक्रम चांगलेच यशस्वी झाल्यामुळं कांहीं तरी नव्या कार्यक्रमाला आतां सुरवात करणं आवश्यक आहे असं मला वाटूं लागलं. विरोधी मंडळी बहुसंख्य नव्हती तरीही त्यांचं वजन मात्र फार मोठं होतं. अलीकडे कांहीं दिवस या विरोधकांनीं आमच्या चळवळींच्या बाबतींत मुग्धता स्वीकारली होती. खरोखरच तीं माणसं मोठीं दूरदर्शी होतीं. आम्ही सुरू केलेलीं कार्यें लोकांच्या नजरेंत भरत आहेत, लोकांना त्याबद्दल उत्साह वाटत आहे, प्रत्येकजण त्यांचं कौतुक करतो आहे अशा वेळीं विरोध करणं इष्ट नाहीं, असं धोरण ठरवून ते दबा धरून बसले होते. या कार्यक्रमांत एवढीशी ढिलाई दिसून येतांच चढावाचं धोरण स्वीकारून त्यांनीं फाटाफूट करायला सुरवात केली असती.

म्हणूनच मीही डोळ्यांत तेल घालून बसलों होतों. कुठंही ढिलाई होऊं नये याची खबरदारी घेण्याच्या पायीं किकी आणि जनी यांचं मला मोठं सहाय्य होत होतं. धोंडशेटसारखा माणूस या कामांत भाग घेऊं लागल्यामुळं उदासीन असलेलीं त्यांच्यासारखीं इतर माणसंही आमच्या कामांत सामील होऊं लागलीं होतीं. थोड्याच दिवसांत निमगांव म्हणजे खादीचं मँचेस्टर करतां येईल अशी आशा मला वाटूं लागली.

तितक्यांत एक संकट निर्माण झालं. किकीची आई बरीच आजारी पडल्याची बातमी आली. गांवांतल्या गांवांत आई आजारी असतांना तिला भेटतां येऊं नये याचं किकीला मोठं दुःख होऊं लागलं. कोणत्याच कामाकडे तिचं लक्ष लागेना. आईवर तिचं फार प्रेम होतं. बाबीकाकांच्या विरोधांत तिची आईच तिची बाजू सावरून धरीत असे. जन्मदात्रीपेक्षांही पुरस्कर्त्री या नात्यानं तिला आईबद्दल जास्त जिव्हाळा वाटत होता.

काय करावं हें मला सुचेना. जनीलादेखील बाबीकाकांच्या घरीं जायची बंदी होती. बातमी कशी काढावी याचीच मला पंचाईत पडली. नुसती बातमी आणूनदेखील किकीचं समाधान होणार नव्हतं. आईच्या बिछान्याशेजारीं बसण्यासाठीं किकी उतावीळ झाली होती.

या कामीं शिष्टाई करण्यासाठीं अण्णांना पाठवावं असं मी ठरवलं. अण्णांनींही तें आनंदानं कबूल केलं.

पण त्या शिष्टाईचा परिणाम झाला नाहीं. 'माझ्या दाराचा उंबरठासुद्धां मी तिला चढूं देणार नाहीं' असं बाबीकाकांनीं सांगितलं. अण्णांना देखील मोठी चीड आली. पण नुसती चीड येऊन काय होणार होतं? बाबीकाका स्वतः मुखत्यार होते. त्यांच्यावर सक्ती करतां येईल अशा अधिकाराची व्यक्ती गांवांत कुणीच नव्हती.

अण्णांच्या या शिष्टाईचा उपयोग झाला नाहीं हेंच किकीच्या मनाला जास्त लागून राहिलं. धीर करून घरीं जावं असं ती म्हणूं लागली, पण मला तें पटेना. बाबीकाकांनीं तिला घरांतून काढून लावलं असतं तर गांवांत उगीच खळबळ माजली असती. तशी खळबळ माजणं या वेळीं इष्ट नाहीं असं मला वाटत होतं.

कांहीं केल्या किकीचं समाधान होत नव्हतं. तिचा हा दुबळेपणा आहे असं जनी म्हणूं लागली. पण आईच्या जिव्हाळ्याची कल्पना जनीला नव्हती. सुभद्रा किकीची तरफदारी करीत होती याचा जनीला राग येई. मला बाजूला घेऊन जनी म्हणाली, "तुम्हा सर्वांचंच चुकतंय. आजी तर अगदीच मूर्ख आहे. या वेळीं काय वाटेल तें करून कमाताईचं मन कसं कठोर होईल याचा प्रयत्न आपण केला पाहिजे. घर टाकून बाहेर निघतांनाच तिनं हा विचार करायला नको होता का? संसारांत असे प्रसंग वारंवार येतातच. त्यांना तोंड द्यायला नको का माणसानं तयार व्हायला?"

"तें खरं आहे—" मी म्हटलं, "पण किती झालं तरी तो आईचा जिव्हाळा आहे. उद्यां तुझी आजी आजारी पडली आणि तिला भेटायला कुणी बंदी केली तर तूं काय करशील?"

"तें आतां कशाला सांगूं?" जनी म्हणाली, "वेळ येईल तेव्हां तेंही दिसेल. एकदां करून पहा तसं. कुणाची पर्वा करायची नाहीं मी."

जनीच्या या उद्गारांत कितपत दृढनिश्चय होता हें मला सांगतां आलं नसतं. पण तिच्या स्वभावाचा मला अजूनही अंदाज आला नव्हता. कदाचित ती तितकीही कठोर बनली असती.

मी आपल्या मनाशीं विचार करूं लागलों, कीं अशा वेळीं मी काय केलं असतं? आंतड्याचा मोह दुर्धर आहे असं म्हणतात पण तत्त्वनिष्ठेचं व्रत तेवढंच दुर्धर नाहीं का? ही एक तपश्चर्या आहे. या तपश्चर्येत सर्व प्रकारच्या संकटांना नको का तोंड द्यायला? समजा, सत्याग्रह करून या वेळीं ती तुरुंगांत गेली असती तर तिनं काय केलं असतं?

अगदीं हाच प्रश्न मी किकीला टाकला त्यावेळीं ती म्हणाली, "खरं आहे तुमचं म्हणणं; पण तसं कांहीं झालेलं नाहीं आज. तसं झालं असतं तर मला यातना झाल्या असत्या. माझ्या आईबद्दल मला काय वाटतं हें मी तुम्हाला कोणत्या शब्दांनीं सांगूं ?"

मी म्हटलं, "मला त्याची कल्पना येते. पण त्याला कांहीं उपाय आहे का ? आज तूं इथं आहेस ती तुरुंगांतच आहेस. बोलून चालून हा तुरुंगवास तूं स्वेच्छेनं पत्करलास. तुरुंगवासापेक्षां दिखील ही परिस्थिति जास्त बिकट आहे हें मलाही कळतं. हा मोकळे-पणाचा तुरुंगवास आहे—कैद नसलेली कैद आहे—स्वेच्छेनं घालून घेतलेलं बंधन आहे. तत्त्वनिष्ठेसाठीं एवढं सुद्धां सहन नाहीं का करायचं ?"

किकी उगीच राहिली तेव्हां जनी म्हणाली, "मी एवढीशी होतें तेव्हां माझी आई मेली. आई म्हणजे काय हें तेव्हां मला कळत नव्हतं, आतांही कळत नाहीं. बापाची मला आठवणसुद्धां नाहीं. आजीनं मला लहानाची मोठी केली. त्या आजीच्या जीवावर बेतली तरी दिखील मी मन चळूं देणार नाहीं. तुम्हां सुशिक्षितांपेक्षां मी कुळवाडीणच बरी म्हणायची !" ज्या आत्यंतिकतेनं जनी बोलत होती त्याचा किकीच्या मनावर परिणाम झाला आणि तिला एकदम रडूं कोसळलं. जनीनं तिला घट्ट पोटाशीं कवटाळलं आणि म्हटलं, "तुझी समजूत मी कशी घालूं कमाताई ? मी तोडून बोललें म्हणून तुला वाईट वाटलं असेल, पण ही वेळ आहे का दुःख करायची ? साऱ्या गांवाचा भार आपण आपल्या आंगावर घेतला आहे. अशा वेळीं हातीं घेतलेल्या कार्याची हेळसांड करून चालेल का ? तूं तिकडे गेलीस, बाबीकाकांनीं तुला घराबाहेर काढलं, तर गांवांत त्याचा बभ्रा होईल. हातचं काम टाकून माणसं तीच चर्चा करीत बसतील—"

"आणि न गेलं तर ?" किकी स्फुंदत म्हणाली, "न गेलं तर गांवचीं लोकं नाहीं का नांवं ठेवणार ?"

"नाहीं !" जनी टासून म्हणाली, "तूं ऐकलं नाहींस गांवचीं सारीं लोकं आज तुझं केवढं कौतुक करतायत तें ! माझ्यावर विश्वास ठेव. हवी तर मी एकदां जाऊन येतें—नाहीं तर आजीला पाठवतें— "

किकी एक क्षणभर स्तब्ध राहिली आणि म्हणाली, "नको, कांहींच नको. पाहूं काय होतं तें. ही कैदच आहे खरी—कैद म्हणूनच—" बोलतां बोलतांना तिला पुन्हा रडूं कोसळलं.

आईच्या बद्दलचं तिचं हें आत्यंतिक प्रेम पाहून मला मोठं चमत्कारिक वाटलं. या भावनेला मी पारखा होतों. माझ्या आईबद्दल मला लोभ होता—जिव्हाळा होता––ती माझ्या-समोरच मेली, पण मी तो प्रसंग सहज सावरून घेऊं शकलों. हृदयाला तेवढा मोठा धक्का बसला नाहीं. मला वाटलं, मुलापेक्षां मुलीलाच आईबद्दल जास्त जिव्हाळा असावा. इतर मुलींचा इतिहास माझ्या अवलोकनांत नव्हता, त्यामुळं मला निश्चितपणं कांहींच म्हणतां येत नव्हतं म्हणूनच किकीला दोष द्यायला मी तयार होत नव्हतों.

त्या दिवशीं किकीच्या आईची चौकशी करण्यासाठीं सुभद्रा तिच्या घरीं गेली; पण बाबीकाकांनीं तिला घरांत येऊं दिलं नाहीं. ' बरी आहे तिची प्रकृति––कांहीं काळजी करायला नको–' असं सांगून त्यांनीं तिला घालवून दिलं. सुभद्रेनं शेजाऱ्यापाजाऱ्यांकडून चौकशी करायचा प्रयत्न केला तेव्हां तिला कळून आलं, कीं किकीच्या आईची प्रकृति फारच खालावली होती. किकीच्या नांवानं ती सारखा कंठशोष करीत होती.

पुढली हकिकत आम्ही किकीच्या कानीं जाऊं दिली नाहीं. फक्त बाबीकाकांचे उद्गार तेवढेच सांगितले.

तेवढ्यानं तिचं समाधान झाल्यासारखं दिसलं. जास्त मोकळेपणानं ती कामाला लागली. मलाही मोठा धीर आला.

असेच आणखी चारपाच दिवस गेले. सुभद्रा रोज जाऊन बातमी काढून येऊन मला सांगत असे––किकी समोर नाहीं असं पाहून सांगत असे–तिच्या आईची प्रकृति अत्या-वस्थेला लागली होती. कोणत्या घटकेला ती हा लोक सोडून जाईल याची खात्री वाटत नव्हती. बाबीकाकांच्या निर्दयपणाची मजल पराकाष्टेला गेली होती. वैद्यांनींसुद्धां सांगितलं तरी ते ऐकेनात--आणि इकडे तर ती किकीच्या नांवाचा ध्यास धरून सारखी विव्हळत होती. ती हकिकत ऐकूनच माझं मन कासाविस होऊं लागलं. एकदां आपण स्वतः जाऊन बाबीकाकांना सांगावं असं मला वाटलं. पण अण्णा म्हणाले, " जिथं ते वैद्याच्या शब्दालासुद्धां मान देत नाहींत तिथं ते कुणाचं काय ऐकणार ? आधींच त्यांचा माझ्यावर राग; माझ्यामुळंच किकी घर टाकून निघाली असं त्यांना वाटत असलेलं––मग मी जाण्यांत काय अर्थ ? "

किकीपेक्षांही माझ्या जिवाची तळमळ वाढूं लागली होती--मला असह्य होऊं लागली होती.

दुसऱ्याच दिवशीं बातमी आली--किकीच्या आईनं सारखा तिच्या नांवाचा घोष करीत देह ठेवला !

आमच्याकडे बातमी येऊन पोंचली त्या वेळीं तिचं और्ध्वदेहिक सुद्धां होऊन गेलं होतं !

ती बातमी किकीला कळवल्याखेरीज गत्यंतर नव्हतं. ती कशी कळवावी ह्याच पेच माझ्यासमोर येऊन पडला.

प्रकरण १५ वें

# मला कोसळलेली गाडी दिसली

अण्णा, धोंडशेटप्रभृति मंडळीबरोबर मी ज्या वेळीं घरांत प्रवेश केला त्याच वेळीं किक्कीला अंदाज आला. गंभीर होऊन आम्ही बसलों होतों. ती ताठरून दाराला टेकून उभी राहिली होती. तिची मुद्रा अगदीं भेसूर झाली होती.

धोंडशेटनीं बोलायला सुरवात केली ते म्हणाले, " कमाताई, आमच्या मोठं जिवावर येतंय--"

" समजलं--" घोगऱ्या आवाजांत किक्की म्हणाली, " मला आतां शेवटची तरी भेट होईल का ?--शेवटची म्हणजे--स्मशानांत--" बोलत असतांना एकेक शब्द तिच्या तोंडून निघत असतांना तिला यातना होत होत्या.

" तीही संधी गेली. " धोंडशेट म्हणाले, " सारं कांहीं उरकून जाईपर्यंत त्यांनीं इकडे दादसुद्धां लागूं दिली नाहीं ! "

किक्की एकदम कोसळून खालीं बसली. तिच्या डोळ्यांतून टीप येत नव्हतं. हुंदक्याचा मागमूससुद्धां नव्हता. तारवटलेल्या डोळ्यांनीं ती भकास नजरेनं कुठं पहात होती तें कळत

नव्हतं. मी घाबरून गेलों. या धक्क्याचा मेंदूवर परिणाम होईल अशी मला भीति वाटली. झट्कन तिच्याजवळ जाऊन मी म्हटलं, "हें काय? अशा वेळीं धीर सोडून कसं चालेल?"

भेसूर हसण्याची लहानशी छटा तिच्या चेहऱ्यावरून चमकून गेली आणि नंतर ती सावध झाली. सावरून एका बाजूला बसत ती आपल्याशींच पुटपुटली, " झालं–संपलं — घराचं नातं संपलं! आतां मी कुणाची कोण नाहीं!"

चार सांत्वनाच्या गोष्टी बोलण्याचा धोंडशेट आणि अण्णा प्रयत्न करीत होते. त्यांना तरी कुठं काय माहीत होतं? ते जें कांहीं बोलत होते तें बाबीकाकांच्या निर्दयपणाबद्दल— पण तें त्यांचं भाषण किकीच्या कानीं जात होतं कीं काय याची मला शंका होती.

धोंडशेटनीं नतर इतर गोष्टी काढल्या. नवे कार्यक्रम कांहींतरी सुरू केले पाहिजेत असा उपक्रम करून, फारसं सुसंगत न वाटणारं असं भाषण सुरू झालं. कांहींतरी बोलायचं म्हणून ते बोलत होते उद्देश एवढाच होता, कीं त्यामुळं किकीच्या मनाला थोडा विरंगुळा मिळावा.

त्यांचा उद्देश सिद्ध झाला कीं नाहीं हें स्पष्टपणं दिसून आलं नाहीं. किकी जी ताठ होऊन बसली होती ती एवढीसुद्धां हालली नाहीं. तिला बसलेला धक्का तिच्या सहनशक्ती-पलीकडे होता.

मंडळी कांहीं वेळानं उठून गेल्यावरसुद्धां ती हालत नाहीं असं पाहून मी म्हटलं, "अशी किती वेळ बसून रहाणार आहेस? झालं गेलं तें कांहीं आतां येत नाहीं. त्यांनीं निर्दयपणा केला—बापाचं हृदय कठोर असतं म्हणतात त्याचा प्रत्यक्ष पुरावा आणून दिला. संपलं तें आतां—" पुढं काय बोलावं हें माझं मलाच सुचेना.

आंघोळीला पाणी काढलं आहे असं सांगायला जनी आली तेव्हां मात्र किकीला एकदम भडभडून आलं. भांबावल्यासारखा मी नुसता पहात राहिलों. वस्कन तिच्या आंगावर जाऊन जनी म्हणाली, "चल आतां. अंगावर पाणी ओत आणि सारे लागेबांधे धुऊन टाक. कशाला रडत बसलीयस?—" तिचा तो धसमुसळेपणा पाहून मला आश्चर्य वाटलं. एरव्हीं प्रेमळ असलेली जनी या प्रसंगाच्या वेळीं अशी रानटीपणानं बोलते आहे असं पाहून मी आश्चर्यचकित झालों. त्या शब्दाचा मात्र परिणाम झाला. मुकाट्यानं उठून किकी आंघोळीला गेली. जनी तिच्या मागोमाग गेली.

मी तसाच बसून राहिलों. मनुष्यस्वभावाचं मला आश्चर्य वाटत होतं. हा कसला नतद्रष्ट-

पणा ? शेवटच्या घटकेला मायलेकीची भेट करून दिली असती तर काय बिघडलं असत ? नुसतं प्रेताचंसुद्धां दर्शन घेऊं दिलं असतं तर काय सत्यानाश झाला असता ? काय साधलं यांत बाबीकाकांनीं ? आंतड्याचं नातं, मायेचा ओढा, अंतरींचा जिव्हाळा वगैरे साऱ्या शब्दांवरचा माझा विश्वास उडून गेला. आंतड्याचं नातं काय तेवढं आईचंच असतं ? बापाच्या-जिव्हाळ्याचा तिथं कांहींच का संबंध नाहीं ? स्वतःच्या अभिमानाची मजल इतक्या निर्दयपणाच्या थराला जाते तरी कशी ? कुणीच का तिथं नव्हतं ? कुणीच का बाबीकाकांची समजूत घातली नसेल ? मुलीला आणून शेवटच्या घटकेला भेटवा असं कुणीच का सांगितलं नसेल ? वैद्यबुवा पाहिल्यापासून सांगत होते असं सुभद्रा म्हणाली--त्यांच्या शब्दाला-सुद्धां बाबीकाकांनीं महत्त्व देऊं नये असं किकीनं काय केलं होतं ? मतं पटत नसतील, पण मनाचा प्रश्न अगदींच हिशोबांत घेण्याजोगा नाहीं का ? या प्रसंगीं नीति-अनीतीचा प्रश्न नव्हता—अनाचाराचा प्रश्न नव्हता कीं अत्याचाराचाही प्रश्न नव्हता--मग बाबीकाकांनीं इतकं निर्दय कां व्हावं ?

किकी अंघोळ करून येऊन बैठक सोडून बाजूला बसली तरीही मी विचार करीत बसलों होतों. तीही तशीच जडमूढ होऊन बसली होती. तिच्या मनांत कसली खळबळ चालली होती याची कल्पना जरी मला होती तरी कोणत्या विशिष्ट प्रकारच्या मनोभावनेला धक्का बसल्यामुळं ती अशी सुन्न झाली होती तें मला कळत नव्हतं. बापाच्या मर्जीविरुद्ध गेल्यामुळं शेवटीं आपली आई आपल्याला अंतरली म्हणून तिला पश्चात्ताप तर होत नसेल ?

जसा कांहीं माझ्या मनांतला प्रश्नच तिला कळला. माझ्याकडे न बघतां ती म्हणाली, "असं आहे हें जग. अभिमानाला बळी पडला कीं माणूस असा निर्दय होतो. अभिमानाला बळी पडूनच मी सुद्धां माझ्या आईला भेटायला गेलें नाहीं. गेलें असतें, तर कुणी सांगावं, कदाचित माझी भेटही झाली असती, कदाचित मला भेटूंही दिलं नसतं; पण आईला भेटायचा मी प्रयत्न केला एवढं तरी समाधान माझ्या मनाला मिळालं असतं. तेवढंच वाईट वाटतंय मला—"

ती गप्प बसली. मी तरी काय बोलणार होतों ? तिचं म्हणणं चुकीचं नव्हतं.

ती पुन्हां बोलूं लागली, " कां बसलें मी हा कठोरपणा धरून ? काकांनीं माझी भेट होऊं दिली नाहीं म्हणून त्यांचा मला राग येतो—पण मी कठोरपणा धरला तें कुठं नाहीं

माझ्या ध्यानांत आलं ? मी भेटायला गेलें असतें, मला घालवून दिलं असतं तर कुणी ना कुणी तें आईला सांगितलं असतं. तेवढंच समाधान वाटलं असतं तिला—" बोलतां बोलतां तिचा कंठ दाटून आला. मी हतबुद्ध होऊन नुसता बसून राहिलों होतों. या वेळीं जनी आली असती तर कांहीं तरी बोलून तिनं किकीचं समाधान केलं असतं. पण तीही आली नाहीं. आंतच कांहीं तरी काम करीत बसली होती. तिची चाहूलसुद्धां बाहेर लागत नव्हती. तिला बोलवावं असं माझ्या मनांत येत होतं पण माझ्या तोंडून शब्द फुटेना. उभ्या आयुष्यांत असल्या प्रसंगांत मी कधींच सांपडलों नव्हतों.

पुन्हा किकी बोलूं लागली, "आतां घराचा संबंध तुटला. मुंबईला गेलें तर तिथलीं माणसंसुद्धां मला जवळ करायचीं नाहींत—इथं रहावं तर इथलीं लोकं काय म्हणतील हा प्रश्न पुढं उभा—मन कसं कातावून गेलं आहे--"

हा प्रश्न मला होता—मी कांहीं तरी सुचवावं अशी अपेक्षा होती-कीं किकी नुसती आपल्या मनांतले विचार नकळत बोलून दाखवीत होती हें मला ठरवतां येईना. पुन्हा मी उगीच राहिलों.

एक मोठा सुस्कारा सोडून तिनं माझ्याकडे पाहिलं. मी तिच्या डोळ्याला डोळा न देण्याचा प्रयत्न करण्यासाठीं झट्कन माझी नजर दुसरीकडे वळवली तें तिच्या ध्यानीं आलं असावं. पुन्हा तिनं एक सुस्कारा सोडला.

कांहीं तरी बोललं पाहिजे होतं खरं, पण काय बोलावं हें अजून मला सुचत नव्हतं. केव्हां एकदां जनी बाहेर येईल असं मला झालं होतं. माझ्या मनींच्या हाकेला तिनं एकदांची धांव घेतली.

"बसून काय करतेयस ?" जनी एकदम म्हणाली, "असं डोकं धरून बसणं चांगलं नाहीं. चल तिकडे आंत. हवा तर तो चरखा घे आणि सूत काढीत माझ्या बरोबर बोलत बैस. ती मुंबईची कसलीशी चळवळ झाली होती ना, तिची हकिकत सांगणार होतीस ना, ती सांग चल--" ती उठत नाहींसं पाहून जनी म्हणाली, "आतां बखोटीला धरून ओढूं का तुला ?--"

अगदीं केविलवाणं हसत किकी उठून तिच्याबरोबर आंत निघून गेली. ती संधी साधून मी घराबाहेर पडलों.

नदीवरच्या खडकावर मी जाऊन बसलों तेव्हां पूर्वीच्या साऱ्या गोष्टी माझ्यासमोर उभ्या राहिल्या. ज्यावेळीं मी इथं आलों त्यावेळीं असे कांहींतरी प्रसंग येतील अशी अपेक्षा मी केली नव्हती. आतां असं वाटूं लागलं, कीं याहीपेक्षां कांहीं भयंकर प्रसंग यापुढं येणार आहेत कीं काय ! कोणकोणत्या प्रसंगांना मला तोंड द्यावं लागणार आहे ? आंतलं मन कच खात होतं. हा सारा पसारा किकीच्या हवालीं करून आपण मुंबईला निघून जावं अशी कल्पनासुद्धां मनांत येत होती.

गांवच्या लोकांचा माझ्यावर विश्वास बसला होता. माझ्या हातून कांहीं तरी कार्य होत आहे असं त्यांना वाटत होतं, मलाही वाटत होतं. अशा वेळीं घाबरून जर मी पळून गेलों असतों तर जितकी माझी बेअब्रू झाली असती तितकाच कार्यनाशही झाला असता. अजून पुष्कळ गोष्टी करायच्या होत्या. किती तरी बेत आंखून ठेवण्यांत आले होते. आजूबाजूच्या शेत-कऱ्यांच्या जीवनाकडे एकदां नजर फिरवून त्यांना कोणत्या कामाला लावतां येईल हें ठरवायचं होतं. अशा वेळीं मी जर अचानक निघून गेलों असतों—

पण मी गेलों तर किकीनंच या कार्यांचा भार घेतला असता ना ? खरं सांगायचं म्हणजे माझ्यापेक्षां ती जास्त कर्तबगार होती. पण मला वाटलं, ती या गांवचीच असल्यामुळं माझ्याइतकं तिचं गांवांत वजन पडणार नाहीं. बाहेरच्या माणसाची गांवां-तल्या माणसांना कल्पना नसते, आणि गांवांतल्या माणसाची कल्पना असते म्हणूनच त्याची उंची ठेंगणी वाटूं लागते. माझी मीच पारख करूं लागलों त्या वेळीं माझे दोष मला दिसत होते. माझ्या अंगीं धडाडी नव्हती. भीत भीत पाऊल टाकण्याच्या माझ्या वृत्तीमुळं बरींचशीं कामं मागं पडलीं होतीं. धार्मिक समजुतीवर आघात करणं, अस्पृश्यतानिवारण करणं, परस्परांतील तंटेभांडणं मिटवायचा जोराचा प्रयत्न करणं वगैरे सुधारणा जरूरीच्या आहेत असं वाटत असूनसुद्धां त्यांना हात घालायला मी भीत होतों.

पण अण्णांच्या मताप्रमाणं हाच माझा चांगुलपणा होता. खरोखरच त्यांना असं वाटत होतं, कीं माझा उत्साहभंग होऊं नये म्हणून ते माझ्या या भित्रेपणाची तरफदारी करीत होते हें मला सांगतां आलं नसतं. पण एक होतं, अण्णांचा स्वभाव दांभिक नव्हता. स्पष्ट

बोलणं हा त्यांचा गुण होता. म्हणूनच त्यांच्या उद्गारांचा प्रामाणिकपणा अंदाजून मी आत्मविश्वास उत्पन्न करण्याचा जोराचा प्रयत्न करीत होतों.

म्हणूनच मला वाटलं, कीं मनांत आलेला हा भेकड विचार सोडून द्यावा. तसं पाहिलं तर हा आलेला प्रसंग क्षणिक होता. किकीवर कदाचित त्याचा झालेला परिणाम लवकर निवळला असता. तात्कालिक आघातानं ती क्षणभर सुन्न झाली असली तरी सावरून लवकरच कामाला लागेल हें संभवनीय होतं.

मुंबईला जावं, असा विचार मनांत येण्याजोगं या प्रकारांत असं काय भयंकर होतं ?

माझं मलाच हसूं आलं. कसा मी इतका लवकर घाबरलों !

माझ्या मनाची होत असलेली ही चलबिचल दुबळेपणाची आहे असं वाटून मी प्रसंगाला तोंड देण्याचा निर्धार केला--नव्हे, हा प्रसंगच नव्हे असं धरून चालून कामाला लागायचं--जोरानं कामाला लागायचं असं ठरवून मी घरीं यायला निघालों.

वाटेंत एक बैलगाडी रस्त्यांतल्या खड्ड्यांत चाक घसरून कोसळून पडली होती. गाडीवाला एकटाच ती वर उचलायचा प्रयत्न करीत होता. मी जाऊन त्याला मदत करूं लागलों तेव्हां गंमत पहात उभीं असलेलीं कांहीं मुलं धांवत आलीं आणि त्यांनींही हातभार लावला.

गाडी बाहेर निघाली, तेव्हां गाडीवाला म्हणाला, " मरण आहे इथं गाडी आणणं म्हणजे ! केव्हां कुठल्या खड्ड्यांत पडायला होईल त्याचा नेम नाहीं. हा काय रस्ता ? सरकारचं कांहीं इकडे लक्ष जात नाहीं. बाहेरचे रस्ते कसे छान आहेत, पण या गांवांत आलं कीं गाडीची होडी होते वादळांतली. आग लागो या गांवच्या रस्त्याला ! रस्ता कसला हा, माणसं चालतात म्हणून रस्ता म्हणायचा. दुकानं आहेत म्हणून गाडी आणावी लागते. नाहीं तर कोण कशाला जीव द्यायला आला असता या रस्त्याला गाडी घेऊन ? " गाडीवाला रस्त्याचा, रस्ते न करणारांचा, गांवाचा आणि गांवांतल्या दुकानदारांचा, शक्य तितक्या गांवढळ भाषेंत उद्धार करीत होता.

चार पावलं मी पुढं गेलों तोंच अण्णा भेटले. त्यांना मी गाडीवाल्याची हकिकत सांगितली. त्यांच्याच दुकानीं तो आला होता. त्यानं शिव्या दिल्या तें अण्णांच्या मनाला लागलं. ते म्हणाले, " खरं आहे त्याचं म्हणणं. रोज अशा गाड्या उलथत असतात तिथं. हें गांव कांहीं लोकलबोर्डाच्या हद्दींत येत नाही. कोण करणार रस्ता इथला ? एरव्हीं लोकलबोर्डाचे

रस्ते तरी कुठं धड असतात म्हणा. पण तेवढे जरी झाले असते तरी गाडीवाल्यांची सोय झाली असती. पायीं चालणारांनादेखील रात्रीं अपरात्रीं ठेचा खायचा प्रसंग येतो. ठेच लागली कीं शिवी देऊन आम्ही पुढं जातों. पण काय करायचं—"

" आपण करूं हा रस्ता." मी म्हटलं. अण्णा उगीच राहिले. मी पुन्हा म्हटलं, " आपण सर्वांनीं मनावर घेतलं तर गांवापुरता रस्ता नाहीं का करतां यायचा ?"

" एवढे पैसे कसे उभे करणार ?" अण्णा म्हणाले, " आधींच आम्हाला लोक शिव्या देत आहेत, त्यांतून आणखी हा नवा बोजा जर त्यांच्यावर टाकला--"

" नवा बोजा टाकायचा नाहीं—" मी म्हटलं.

" मग काय करायचं ?" अण्णा म्हणाले, " आपोआप तर रस्ता होत नाहीं ?"

" केवढा होईल हा गांवचा रस्ता ?"

" एवढ्याच भागापुरतं पहायचं तर दोन फर्लांगापेक्षां जास्त व्हायचा नाहीं. नदीपासून आपल्या या गांवच्या दुसऱ्या टोकापर्यंत फारफार तर दोन फर्लांग होईल. मधून पायवाटा फुटतायत पण ती कांहीं मोठीशी रहदारी नव्हे. गांवाबाहेर गेलं कीं ब्राह्मण-वठाराकडे जायचा जो रस्ता आहे तो मात्र मैलभर होईल. तो कांहीं तसा अगदींच वाईट नाहीं. पण त्या रस्त्याशी आम्हाला कांहीं कर्तव्य नाहीं. एवढाच रस्ता जरी झाला—"

" मग आपण तो करायचाच -" मी ठासून म्हटलं तेव्हां अण्णा विचारांत पडले.

' विचार करण्याजोगी गोष्ट आहे खरी." अण्णा म्हणाले, " पण खर्चासाठीं एकदां सर्वांना विचारलं पाहिजे."

" गांवालासुद्धां शोभा येईल या रस्त्यानं " मी म्हटलं, "आणि लोकांचीही दगदग चुकेल. खर्चाच्या भानगडीत पडायचं नाहीं. अगदीं जरूरीपुरता खर्च करून बाकी काम बिनखर्चानं कसं होईल तेंच आपण पाहूं."

अण्णांचं घर आल्यामुळं ते जास्त कांहीं न बोलता नमस्कार करून निघून गेले. मी या नवीन कल्पनेमुळं स्वतःवर खूष होऊन घरीं आलों. त्या वेळीं पडवींत कुणीच नव्हतं. मुकाट्यानं कपडे काढून मी हळूच आंत डोकावून पाहिलं तों जनी स्वैंपाक करीत होती, सुभद्रा भिंतीला टेकून बसली होती आणि--मी आश्चर्यचकित झालों—चरखा चालवीत मोठमोठ्यानं हसत खिदळत किशी त्या दोघींबरोबर बोलत होती. मुंबईच्या गोष्टी चालल्या

होत्या. १९३० सालच्या कायदेभंगाच्या चळवळीच्या वेळच्या गंमती किकी त्यांना सांगत होती. मी हळुच येऊन दारांत उभा राहिलों तेव्हां जनी म्हणाली, " आतां तुम्हीच सांगा गुरुजी, मुंबईचे पोलीस केसरिया बायकांना भीत होते म्हणून ही सांगते–हें खरं का ?"

" बायकांनीं बायकांची तारीफ करावी !" मी हसत म्हटलं, " पोलीस बायकांना भीत होते कीं बायकांचा मान राखीत होते, हें ज्यानीं त्यांनीं आपापल्या नजरेनं पहावं. पोलीस तसं म्हणतात, बायका असं म्हणतात. पण एवढं मात्र खरं, कीं पुष्कळशा बायका त्या वेळीं बाहेरच्या पोलिसांपेक्षां घरच्या पोलिसांची पर्वा करीत नव्हत्या खास "

" घरचे पोलीस ? " जनी म्हणाली, " कोण घरचे पोलीस ? "

" नवरे, बाप, भाऊ—वडील भाऊ ! " मी हसत म्हटलं.

" एवढं तरी खरं ना ? " चरखा बाजूला ठेवीत किकीनं विचारलं.

" तें कोण नाकबूल करील ? " मी म्हटलं, " त्या वेळीं बायकांना अवसान चढलं होतं—फार बेफाम झाल्या होत्या त्या—असं निंदक आणि स्तुतिपाठक आपापल्या परीनं म्हणत होते. पोलिसांच्या हातचा मार खायलासुद्धां त्यांनी कमी केलं नाही. "

" त्यांत काय विशेष ?" जनी म्हणाली, " इथं बघा, आमच्या भंडाऱ्या कुळवाड्यांच्या घरांत. बायकोला मारीत नाहीं असा एकसुद्धां नवरा सांपडायचा नाहीं. "

" पण पोलिसांनीं मारलं तर त्या बायका पळत नव्हत्या, " मी म्हटलं, " मारूं नका म्हणत नव्हत्या–मुकाट्यानं मार सहन करीत होत्या. "

" तेंच चालतं इथं ! " जनी म्हणाली, " मारणाऱ्या नवऱ्याचा हात कुणी बायको धरीत नाहीं आणि पळूनही जात नाहीं. "

" आधीं तरी कळतं हें ! " मी म्हटलं, " तर इथल्या या बायका घेऊन मुंबईला तरी गेलों असतों. "

आम्ही सारींच मोठ्यानं हसलों.

जेवीत असतांना त्याच गोष्टी चालल्या होत्या. वातावरण निवळलं होतं. दुःखाची छाया कुठंच दिसत नव्हती.

जेवण झाल्यावर मी वाचीत बाहेर बसलों. त्या दिवसाचीं सारीं वर्तमानपत्रं वाचायचीं राहिलीं होतीं. वाचीत असतांना किती वेळ गेला याचा मला अंदाज आला नाहीं. आंत सामसूम झालं होतं. तिघीही झोपी गेल्या असाव्या.

पुस्तक मिटून मी घड्याळाकडे पाहिलं तों साडेबारा वाजून गेले होते.

मी उठून एकदां बाहेर जाऊन आलों, दरवाजाला कडी घातली आणि दिवा मालवून बेछान्यावर पडणार तोंच आंतून हुंदक्यांचा आवाज ऐकूं आला.

मी दचकलों. एवढा वेळ सामसूम होतं, आणि एकदम माझ्या जागीनं किकी जागी तर झाली नसेल ?—

माजघरचा दरवाजा केव्हांही उघडाच असे. हातांत दिवा घेऊन मी सहज आंत डोकावून पाहिलं—बिछान्यावर बसून पदरानं तोंड झाकून किकी रडत होती. मला दारांत पहातांच ती एकदम उठून धांवत बाहेर येऊं लागली.

मीं चार पावलं मागं हटलों

तिचा चेहरा पाहून मी घाबरून गेलों. दिवा बाजूला ठेवून मी म्हटलं, " किकी, काय झालं ? "

त्या माझ्या प्रश्नासरशी तिला मनाचा आवेग अनावर झाला. ओक्साबोक्शीं रडत धांवत येऊन माझ्या गळ्याला तिनं मिठी मारली.

माझ्या आंगाचा थरकांप झाला.

## प्रकरण १६ वें

# मला पूर्वेतिहास कळला

त्या एका क्षणांत हजारों विचार माझ्या मनांत येऊन गेले. प्रसंगाकडे नजर दिली तर तो प्रकार स्वाभाविक होता—पण ती भर मध्याह्न रात्रीची वेळ, जिकडे तिकडे सामसूम झालेलं, अशा वेळीं तिनं जें मला अशा विलक्षण रीतीनं घाबरवून सोडलं त्यामुळं मी अगदीं भांबावून गेलों.

ती सारखी रडत होती—आणि गळ्याची मिठी कांहीं केल्या सोडीत नव्हती. जनीला हाक मारावी असं माझ्या मनात आलं पण माझ्या तोंडून शब्द निघेना. मोठ्या कष्टानं तिचे हात सोडवून घेऊन मी तिला बाजूला नेऊन बसवलं आणि म्हटलं, " हा काय वेडेपणा किकी ! साऱ्या दिवसांत एवढ्या धीरानं वेळ निभावून नेलीस अन् आतां—"

तिचे हुंदके वाढूं लागले तसा मीही घाबरून जाऊन गप्प राहिलों. प्रसंग विलक्षण होता यांत शंका नाहीं. पण किकीचा तोल अशा रीतीनं सुटेल असं मला वाटलं नव्हतं.

थोड्या वेळानं ती डोळे पुसून स्तब्ध झाली. मी तिच्या बाजूला स्वस्थ बसून राहिलों होतों. बोलायला गेलों तर तिला पुन्हां उमाळा येईल या भीतीनं उगीच राहिलों होतों.

## मला पूर्वेतिहास कळला

आयुष्यांत मी कधींच न अनुभवलेला असा तो विलक्षण प्रसंग होता. मनाची कितीही समजूत घालायचा प्रयत्न केला तरी आयुष्यांत कधींही न अनुभवलेल्या अशा त्या अनपेक्षित स्पर्शामुळं माझ्या मनावर अनिष्ट परिणाम झाल्यावाचून राहिला नाहीं. आजपर्यंत कुणाही स्त्रीच्या हाताला हात सुद्धा मी लावला नव्हता. तो माझा भित्रेपणा होता. स्वतःच्या मनावर असलेल्या अविश्वासानं उत्पन्न झालेला तो दुबळेपणा होता. म्हणूनच माझ्या मनावर होऊ नये त्या प्रकारचा परिणाम झाला.

आधींच किकीच्या बाबतींत माझ्या मनांत एक प्रकारची नाजुक भावना होती. ती भावना बाहेर न दिसूं देण्याचा प्रयत्न मी आजवर करीत आलों होतों. सात्विकतेच्या दांभिकपणामुळं मी तिचे हात सोडवून तिला दूर बसवलं खरं, पण दुःखाच्या प्रसंगीं तिचं सांत्वन करण्याच्या आपुलकीनं का होईना, किकीला जवळ घेऊन तिची समजूत घालावी, तिच्या मस्तकावरून हात फिरवावा, तिच्या डोळ्यांतलीं आंसवं पुसून काढावीं आणि परकेपणाची सर्व जाणीव विसरून तिला हृदयाशी घट्ट कवटाळून धीर द्यावा असं माझ्या मनांत आल्यावांचून राहिलं नाही.

" क्षमा करा—" किकी म्हणाली, " माझा तोल सुटला खरा, पण मी तरी काय करूं ? जिकडे तिकडे उजाड झाल्यासारखं वाटतंय. एक आईचाच काय तो मला आधार होता. त्या आधारावर मी सर्वांना तोंड देत होतें. माझं लग्न करून मला कुठं तरी अडकवून टाकायचा प्रयत्न काकांनीं तीन वेळ केला, पण त्या वेळीं आपली नित्याची वृत्ती सोडून आई त्यांच्या बरोबर झगडली म्हणून मी आज बी. ए. होईपर्यंत अविवाहित राहूं शकलें. जुन्या काळची बायको ती, पण माझ्या शब्दावर विश्वासून तिनं माझी बाजू सावरून धरली आई म्हणून वाटतंच पण त्याहीपेक्षा मला जास्त दुःख होतं तें यामुळंच. आतां कुठं माझ्या आयुष्याला सुरवात व्हायची त्या वेळीं ती नसावी !—" पुन्हा तिला हुंदका आला. मन आवरून ती पुढं बोलूं लागली, " निर्दयपणालाही कांहीं सीमा असते. चीड आली म्हणणं थोडं वाटेल —तिटकारा आला आहे मला माझ्या बापाचा ! त्यांना माहीत होतं—आईवर माझा सारा जीव आहे हें माहीत होतं—तरीसुद्धा त्यांनीं तिचं तोंड मला मेल्यावरदेखील पाहूं दिलं नाहीं. दुःख बाजूला राहून कसा भडका होत असेल माझ्या जिवाचा याची कल्पना करून पहा—" बोलत असतांना ती अजून माझ्याकडे पहात नव्हती, पण आतां माझ्या डोळ्याला डोळा देऊन म्हणाली, " आतां तुमच्याखेरीज मला आधार नाही. मुंबईला तिकडे जे

माझे चुलते आहेत ते माझ्या बापाचेच भाऊ. आजवर त्यांनीं माझं पालनपोषण केलं, शिक्षण चालवलं, पण एवढीसुद्धां कृतज्ञता मला वाटत नाहीं त्यांच्याबद्दल, इतकं छळलंय मला त्यांनीं! कॉलेजांतल्या लोकांना वाटत होतं, कीं मी आनंदी वृत्तीची आहे पण हृदयांत पेटत असलेल्या आगीवर पाणी ओतण्यासाठीं खोटं हसून जगाला फसवावं लागत होतं मला तोंड बांधून बुक्क्याचा मार चालला होता—" एक मोठा सुस्कारा सोडून ती म्हणाली, "बरं झालं, सुटलें एकदांची! कुणाचाच लागाबांधा राहिला नाहीं आतां. आतां एकच—जें मनाला वाटेल तें करायचं. कुणालाच भ्यायचं नाहीं यापुढं. मात्र तुम्ही मला अंतर देऊं नका. आतां माझा सारा भारिभार तुमच्यावर आहे—"

कांहीं तरी बोलावं म्हणून मी म्हटलं, "मी तरी काय करणार आहें? मीही असाच एक अनाथ अपंग आहें. मलाही कुणाचा आधार नाहीं, कुठंतरी हातावरच पोट भरलं पाहिजे मला—"

"मी काय म्हणतें तें तुम्हाला कळलं नाहीं—" किकी म्हणाली, "आपण दोन अपंग माणसं एका जागीं आलों आहोंत—तुम्हाला मुळींच कुणाचा आधार नाहीं—मला असून नसल्यासारखा झाला आहे—नोकरी न करतां तुम्हीं एक काम हातीं घेतलं आहे—तसंच कांहीं तरी करीत रहावं असं मलाही वाटतं. यापुढं फार त्रास होणार आहे मला. अगदीं उघड-उघड दिसतंय—इथं रहाणंसुद्धां मला कठीण जाईल पण मी मनाचा निश्चय केला आहे. काय होईल तें होवो पण हें निमगांव सोडायचं नाहीं, निमगांवचीच सेवा करायची, निमगांवसाठींच मरायचं—पण तुम्ही मात्र मला अंतर देऊं नका! तुमचा आसरा सुटला तर माझा एकदम धीर खचेल. अन् तसा धीर खचला तर जगणंसुद्धा मला अशक्य होईल!"

पूर्वीचा दुःखाचा आवेग संपून आतां ती निश्चयात्मकतेनं बोलत होती. त्यांत केविलवाणी मागणी नव्हती—दयेची याचना नव्हती—तिला माझी कुमक पाहिजे होती—दुजोरा पाहिजे होता हें तिच्या शब्दांच्या जोरावरून मला पूर्णपणें कळून आलं. मी म्हटलं, "नुसतं आश्वासन देऊन तुझी तात्पुरती समजूत करायची नाहीं मला. अजूनपर्यंत माझं कांहींच निश्चित नाहीं. मी हें काम पत्करलंय खरं पण अजूनही मी आंधळ्यासारखा चाचपडतोंय. पूर्वीचे इतिहास पाहिले, की मला भीति वाटू लागते. शिक्षणावर लाथ मारून असेच माझ्यासारखे कित्येकजण दहा वर्षांपूर्वी कॉंग्रेसच्या अभिमानानं बाहेर निघाले होते, पण कांहीं ना कांहीं कारणानं तरी ते आजवर टिकून राहिले नाहींत. कांहीं तर कॉंग्रेसचे द्वेष्टे

बनले आहेत. भावनेचा भर ओसरतांच समोर अक्राळविक्राळ जबडा पसरून उभ्या राहि-लेल्या नागव्या व्यवहाराच्या भक्ष्यस्थानीं कितीतरी जण पडले आहेत. माझं तसं होऊं नये असं मला वाटतंय. तुझ्यासारखीचा पाठिंबा असेल, तेवढीच जबरदस्त तुझी निष्ठा असेल तरच माझा टिकाव लागेल. पदोपदीं माझं मन डळमळतं. विरोध उत्पन्न झाला कीं वाटूं लागतं, उगीच आपण या फंदांत पडलों ! परत मुंबईला जावं, कुठंतरी नोकरी धरावी अन् बाकीच्या चार पदवीधरांसारखा करीअरचा विचार करावा ! विचार करून पाहिलं म्हणजे तो भेकडपणा वाटतो. पण माझ्या अंगीं किती चिकाटी आहे याचा अजून माझा मलाच अंदाज आला नाहीं, तिथं कोणत्या आधारावर मी तुला धीर देऊं ? खोटं आश्वासन कसं देऊं ? वेळ मारून नेण्यासाठीं ' काहीं भिऊं नकोस, मी तुझ्या पाठीशीं आहें ' असं मी म्हटलं असतं. पण या पवित्र वेळीं नुसतं तुझं सात्वन करण्यासाठीं दिखील मी दांभिकपणा केला तर तें पाप होईल. म्हणूनच मी माझं हृदय आज तुझ्यासमोर मोकळं करतोंय. " एवढंच बोलून मी स्वस्थ राहिलों.

तीही मन लावून माझं भाषण ऐकत होती. ऐकत असतांना तिच्या मनाचं भ्रमण चाललं होतं हें तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होतं. माझं बोलणं संपतांच तिनं पुन्हां एकदां माझ्याकडे दृष्टिक्षेप केला. सारखी टक लावून डोळ्याला डोळा देऊन ती किती तरी वेळ माझ्याकडे पहात राहिली होती.

चट्कन तिची नजर वळली—तिचा चेहरा गोरामोरा झाला होता—जमिनीकडे पहात ती अगदीं हलक्या आवाजांत बोलूं लागली, " कॉलेजांत किती तरी जण माझ्याभोंवतीं घोटाळत होते. कित्येक पत्रं पाठवीत होते, कित्येक माझी प्रत्यक्ष भेट घेऊन प्रेमाच्या गोष्टी उघड उघड बोलायचा धीर करीत होते, कित्येक माझी हेटाळणी करीत होते—पण तशी हेटाळणी करतांना माझ्या सहवासाची चोरटी अपेक्षा दाखवायला त्यांनीं कमी केलं नाहीं. साऱ्यांचाच मला तिटकारा येत होता. सारे नालायक वाटत होते मला. हा माझा अभिमान असेल—मी कुणीतरी मोठी अद्वितीय स्त्री आहें असं कांहीं मला म्हणायचं नाहीं पण कॉलेजच्या आवारांत ज्या मुली वावरताहेत त्यांच्यापेक्षां माझी वृत्ति अगदीं निराळी आहे हें माझं मला कळत होतं. कोणतं तरी ध्येय पुढं ठेवून कुणीच कधीं कॉलेजांत शिकायला येत नाहीं—मग तो पुरुष असो कीं स्त्री असो—आधीं त्यांचं पद-वीवर लक्ष असतं. नुसती पदवी मिळण्यापेक्षां चैन करायच्या इच्छेनं कॉलेजात येणारांची

संख्याच फार असं मी म्हटलं, तर कुणाला पटायचं नाहीं. पुढलं आयुष्य बंधनाचं जाणार, एव्हांच काय ती चैन करून घ्यावी, पोरीबाळींच्या मागं हिंडावं, प्रेमाच्या गोष्टी बोलाव्या, काव्यं करावीं, मजा करावी, असं वाटणारांचीच संख्या मोठी. ह्याहून साऱ्यांचा म्हणूनच मला तिटकारा आला. आता बोलतेंच आहें—एकदां मन मोकळं करून टाकीन म्हणतें—मन अगदीं अनावर झालंय म्हणून बोलतें—नुसतं ऐका आणि विसरून जा. गैरसमज करून घेऊं नका माझ्याबद्दल. तसल्या कागदी काव्यांच्या कोणत्याच कल्पनांची माझ्यावर कधीं छाप पडली नाहीं प्रेम-प्रेम म्हणून म्हणतात त्याच्यावर माझा एवढासुद्धां विश्वास नाहीं—म्हणून स्त्रीपुरुष हा भेद माझ्या मनांतून गेला होता असं मात्र समजूं नका—'मला मुळीं लग्नच कर्तव्य नाहीं' असा डांगोरा मी रोज पिटीत असें—पहिल्यानं तसं मला वाटे—पण पुढं मला कळून आलं, तें व्रत मोठं कठोर आहे. माझी स्वाभाविक वृत्ती तशी नाहीं म्हणून मीं आजुबाजूला पाहूं लागलें. कुठं तरी मला माझं मन गुंतवून ठेवलं पाहिजे होतं. पुनः पुन्हा काका माझ्या लग्नाच्या गोष्टी बोलत होते-स्थळं पहात होते—माझ्या मनाची एवढीसुद्धां कदर न करतां आपल्या मताप्रमाणं कुणातरी सुखवस्तु इसमाच्या गळ्यांत पूर्वीच्या काळच्या मुलीसारखी मला बांधून टाकायचा प्रयत्न करीत होते. आईच्या आधारावर मी त्यांना तोंड दिलं नि त्यांचं कांहीं चालूं दिलं नाहीं. इकडे मी शोधांत होतें. सारखी निरखून पहात होतें—पारखायचा प्रयत्न करीत होतें. मला फाजील अभिमान आहे असं म्हणा वाटेल तर, पण कुठंच माझं मन ठरेना. कुणाबद्दलच मला आदर वाटेना. कॉलेजांतलीं मुलं रोज तुमची थट्टा करीत म्हणून माझं लक्ष तुमच्याकडे वळलं. पहिल्यानं त्यांच्याबरोबर मीही तुमची थट्टा करीत होतें, पण हळुहळु माझं मन बदलूं लागलं. उनाड कोण आणि ध्येयवादी कोण यांतलं अंतर माझ्या नजरेला येऊं लागलं. डिबेट्स्मधें तुमचीं भाषणं होत त्या वेळीं तुमची विशिष्ट प्रकारची मनोवृत्ति मला त्यांतून दिसू लागली. एकाद्या विषयाचं समर्थन करण्यासाठीं नुसता तात्त्विक तत्त्वाभिमान धरून बोलणारा माणूस आणि अंतःकरणांतल्या तळमळीनं बोलणारा माणूस, यातलं अंतर कळायला मला बराच वेळ लागला—" क्षणभर ती पुन्हा स्तब्ध बसली आणि म्हणाली, "मी नुसता इतिहास सांगतेंय त्याचा परिणाम मनावर कांहीं करून घेऊं नका. अंतःकरणाची तळमळ असलेली कॉलेजातील एकच व्यक्ती मला दिसून आली आणि ते तुम्ही. मला हें पटलं तेव्हां-पासून मी तुमची तरफदारी करूं लागलें. बाकीचे म्हणूं लागले, 'पासोड्या मारुतीला किकी भाळली.' तरी मी हटलें नाहीं. तुम्ही कांहीच पहात नव्हतां, कुठंच लक्ष देत नव्हतां

म्हणून तुम्हाला कांहीं कळलं नाहीं--" बोलत असतांना तिचा चेहरा एका विशिष्ट भावनेनं प्रफुल्लित झाला होता. पूर्वीची दुःखाची छटा पार पुसून निघाली होती. अंतःकरणांत होत असलेल्या त्या आठवणीच्या गुदगुल्यांमुळं अगदीं ओझरतं असं अस्फुट हास्य तिच्या मुद्रेवर खेळत होत तें हास्य उमललं. ती चांगली तोंड भरून हसली आणि म्हणाली, " त्यांनीं तुमची माझी जोडी जुळवून टाकली होती ! " पुन्हा ती थांबली—

माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. तिच्या डोळ्याला डोळा देण्याचं धैर्य मला होत नव्हतं. ती माझ्याकडे सारखी पहाते आहे असं मला वाटत होतं, तरीही मी समोर पडलेल्या वर्तमानपत्रांचे मोठ्या टाइपांतले मथळे शून्य दृष्टीनं पहात बसलों होतों.

" अन् तें खरं होतं--" किकी पुन्हां गंभीर शब्दांनीं म्हणाली, " तसंच कांहीं झालं होतं. ती माझीच चूक होती. माझी जिवाभावाची मैत्रीण म्हणून वाटणारी एक मुलगी होती, तिच्याकडे मी बोलून गेलें आणि तिनं साऱ्या कॉलेजभर डांगोरा पिटला. तिला तें पटलं नव्हतं—आवडलं नव्हतं—असल्या गबाळ्या माणसावर माझी नजर गेली म्हणून तिनं जेव्हां मला छेडलं तेव्हांच तिच्याकडे बोलण्यांत माझ्याकडून चूक झाली असं मला वाटलं. तेव्हांपासून तिचं माझं वाकडं आलं. आतां कळलं ना, कीं तुम्ही निघायच्या वेळेला मी कां भेटायला आलें होतें ? "

त्यावेळीं माझी काय स्थिति झाली होती याचं वर्णन करायचं सामर्थ्य माझ्या लेखणींत नाहीं. मी एक साधासीधा मनुष्य आहें. डावपेंच मला कळत नाहींत तसाच खोटा आव आणून तो पचवण्याइतका खोटेपणाही माझ्या आगीं नाहीं. मी हतबुद्ध झालों होतों. एकमेकांना नकळत एकमेकांचं आकर्षण सुरू होतं हें जेव्हा आतां मला कळलं तेव्हां मी सुन्न होऊन गेलों. आतरिक आकर्षण अज्ञातपणें ज्यावेळीं माणसाला नाचवीत असतं त्यावेळीं भावनेच्या भरीं पडून माणूस स्वतःलाच फसवायचा प्रयत्न करीत असतो कीं काय असा मला प्रश्न पडला.

मी वर डोळे करून पाहिलं—ती माझ्याकडेसच पहात बसली होती— डोळ्याला डोळे भिडले त्यावेळीं माझा आवेग अनावर झाला. माझ्या हृदयांत धडकी भरली. सर्वांगाला थरकांप सुटला. मस्तकाच्या शिरा ताड्ताड् उडूं लागल्या. तिची मुद्राही फुलून निघाली होती. माझ्यासारखीच तिची स्थिति झाली होती कीं काय असं मला वाटलं. मी अगदी तिच्या बाजूला झुकूं लागलों तोंच—

खुद्‌कन कुणी हसल्याचा आवाज मला ऐकूं आला. दारांत जनी उभी होती. माझी नजर तिच्याकडे वळतांच तिच्या चेहऱ्यावरचं हसूं एकदम नाहींसं झालं. ती घाबरली आणि आम्हां दोघांकडे आळीपाळीनं पाहूं लागली.

एकदम येऊन तिनं माझे पाय धरले आणि ती रडूं लागली.

" ऊठ जने, " मी म्हटलं, " काय झालं ? "

" आधीं मला क्षमा केली म्हणा--" जनी स्फुंदत स्फुंदत बोलूं लागली, " त्याशिवाय मी पाय सोडणार नाहीं तुमचे. "

" बरं बरं, क्षमा केली. " मी म्हटलं, " आतां सांग पाहूं काय झालं तें ? "

" अगदीं पहिल्यापासून मी जागी होतें. " जनी म्हणाली.

माझ्या आंगावर शहारे आले. पहिल्यापासून म्हणजे ?

"--कमाताई बिछान्यांत हुंदके देत होती तेव्हांच मी जागी झालें--" असें जनी म्हणाली तेव्हां मी थरारून उठलों. म्हणजे तिनं पाहिलं तर ?

'हो--तेव्हां मी जागी होतें. " जनी म्हणाली. 'तेव्हां' या शब्दावर तिनं जोर दिला असं पाहून मीही घाबरून गेलों. किकी नुसती पहात बसली होती. 'तेव्हां' या शब्दाचा परिणाम किकीच्या मनावरही झाला असावा. त्यावेळीं मला खरोखरच जनीचा राग आला. ही तिची चोरटी वृत्ति पदोपदीं मला त्रासदायक होणार कीं काय ?

मी म्हटलं, " हें बरं नव्हे जने ! पूर्वी एकदां तूं माफी मागितली होतीस त्याचा तुला विसर पडलासा वाटतं ?--"

यावेळीं जनी काकुळतीला आली नाहीं, गंभीरपणानें ती म्हणाली. " पूर्वी मी चूक केली--ती कबूल केली--पण आतां मुद्दाम कांहीं मी तसं केलं नाहीं मी घाबरलें मला अगदीं चमत्कारिक वाटलं म्हणून मी घाबरून मागं राहिलं. आतां देखील मी झोपेचं ढोंग करून राहिलें असतें तर तुम्हाला कुठं उमगलं असतं ? कितीतरी वेळ मी उभी होतें. बोलावं असं वाटत होतं पण माझ्या तोंडातून शब्द निघेना इतकी मी घाबरून गेलें होतें. ज्यावेळीं अनावर झालं त्यावेळीं मी बोललें. तरीपण तुम्हाला जर--"

" मला कांहीं वाटत नाहीं जने, " किकी म्हणाली, " मला नाहीं वाटत तूं मुद्दाम कांहीं केलंस म्हणून. तुझ्या जागीं मी असतें तर माझीसुद्धां अशीच स्थिति झाली असती.

अन् तूं परकी का आहेस ? एका घरांत रहातों आहों आपण ! एका छत्राखालीं रहातों आहोंत, एका मनानं वागायचा प्रयत्न करतों आहोंत, तिथं तुझ्याकडे तरी काय चोरायचं ? मला कांहीं नाहीं वाटत त्याचं ! कसलं काय आतां वाटायचं ? जें व्हायचं तें होऊन गेलं आहे. सर्वांचे लागेबांधे तुटले आहेत. तूं माझ्यावर उलटशील असं कांहीं मला वाटत नाहीं. पण उद्यां उलटलीस, तरी देखील मला त्याच्याबद्दल तितकंच कांहीं वाटायचं नाहीं. जन्मदात्या बापानंच जिथं पोटच्या गोळ्याची माया सोडली, तिथं परकी माणसं पारखीं झालीं कीं वैरी झालीं, म्हणून काय वाटायचं त्यांच्याबद्दल ?—"

आतां मात्र जनीला आपला उद्वेग आवरेना. तिनं एकदम धांवत जाऊन किकीच्या गळ्याला मिठी मारली. तिला जवळ घेऊन एखाद्या ममताळू आईप्रमाणें किकी तिला कुरवाळूं लागली. तें दृश्य पाहून क्षणभर मलाही गहिंवर आल्यावाचून राहिला नाहीं. तो दुःखाचा आनंद होता. दुःखाचा डोंगर कोसळल्यावर सहानुभूतीची लहानशी चमक जरी कुठं दिसली तरी माणसाला जें आश्वासन मिळतं त्याच्याच जाणिवेनं माझं हृदय भरून आलं.

मी म्हटलं, " उगी रहा जने, आतां मुळींच राग नाहीं बरं माझा. क्षणभर मला वाटलं खरं—-जाऊंद्या आतां. आतां तें कांहींच बोलायचं नाहीं. "

किकीची मिठी सोडून तिनं येऊन माझे पाय धरले. तिच्या आसवांनीं माझे पाय ओले झाले होते. मी तिला वर उचलून बाजूला केलं त्यावेळीं तिचा चेहरा पाहून मला धक्का बसल्यावांचून राहिला नाहीं.

पुढलं बोलणं तेवढंच राहिलं. आम्ही उठून आपापल्या जागीं जाऊन निजलों.

बिछान्यावर पडलों तेव्हां माझं मस्तक भ्रमण करूं लागलं. भित्रेपणाची लहर पुन्हा येऊं लागली होती. दिवसेंदिवस वाढत जाणाऱ्या या भानगडींतून आंग काढून घेऊन आपण मुंबईला जावं असा विचार पुन्हा माझ्या मनांत येऊं लागला होता.

विचार करतां करतांच मला झोंप लागली. सकाळीं उठून जागा झालों त्यावेळीं किकी आणि जनी यांच्या चेहऱ्यावर कालच्या रात्रीच्या प्रसंगामुळं उत्पन्न झालेली कोणतीच छाया राहिलेली नाहीं असं दिसल्यामुळं आदल्या रात्रींचा तो विचार कोणत्याही प्रकारचा विवेक केल्याखेरीज माझ्या मनांतून आपोआप पुसून निघाला.

प्रकरण १७ वें

# मी खडीफोडया बनलों

दुसऱ्या दिवशीं नित्याप्रमाणें किकी शाळेंत आपल्या कामावर हजर झाली याचं सर्वांनाच आश्चर्य वाटलं. ब्राह्मणवठारांतील मुलं आपसांत कुजबुज करूं लागलीं. झालेल्या दुःखाचं कोणत्याही प्रकारचं चिन्ह तिनं आपल्या वर्तनांत एवढं सुद्धां दिसूं दिलं नाहीं याचं मला आश्चर्य वाटलं. आदल्या दिवसाच्या एकंदर प्रकारावरून तिच्या मनावर आईच्या मरणाचा केवढा जबरदस्त परिणाम झाला होता हें मी पाहिलं होतं. एवढं दुःख सावरून ती नित्याच्या कार्यक्रमाला प्रवृत्त झाली कशी हेंच मला कळेना.

अण्णा, धोंडशेटप्रभृति मंडळींनाही या गोष्टीचं कौतुक वाटलं विशेषतः धोंडशेटना तिच्या या वृत्तीबद्दल अभिमान उत्पन्न झाला. यापूर्वी त्यांचं मत तिच्या बाबतींत चांगलंसं नव्हतं. एकदां त्यांनीं तसं मला बोलूनही दाखवलं होतं. पण या तिच्या धीराच्या आणि कर्तव्यतत्परतेच्या वृत्तीमुळं त्यांचे सारे जुने गैरसमज पार नाहीसे झाले.

ही हकिकत बाबीकाकांच्याही कानांवर गेली आणि त्यापायीं त्यांनीं तिला खूप शिव्या हासडल्या असं माझ्या कानीं आलं. खरं पाहिलं तर तिनंच बाबीकाकांना दोष दिला पाहिजे

होता. पण आतां उलट तेच तिच्याबद्दल अशी भावना दाखवीत असल्याचं पाहून किकीला त्यांच्याबद्दलचा आलेला तिटकारा अधिक वाढला.

आईच्या उत्तरक्रियेच्या वेळी सुद्धां तिला बोलावणं आलं नाहीं. पिंडाला कावळा शिवतां शिवेना तेव्हां किकीला बोलावून आणण्याबद्दल कुणी बाबीकाकांना सागितलं, पण त्यांनीं तें ऐकलं नाहीं. दर्भाच्या कावळ्याचा स्पर्श करून घेऊन पिंडदान पुरं केलं, ही गोष्ट ज्यावेळीं किकीला कळली त्यावेळीं ती सुन्न झाल्यासारखी दिसली. आम्हीही कांहीं चर्चा केली नाहीं.

कांहीं वेळ गेल्यावर ती मला म्हणाली, " माझा या असल्या गोष्टींवर विश्वास नव्हता. यांत किती तथ्य असतं तें कांहीं कुणाला सांगतां यायचं नाहीं. पण एवढं खरं, कीं कांकांनीं माझी जी ताटातूट केली ती जाणवण्याइतका परिणाम आजूबाजूच्या लोकांवर झाला, एवढं तरी बरं झालं. एवढ्यासाठीं तरी ते लोक काकांना दोष दिल्यावांचून रहायचे नाहीत. त्यांचा हाडकपाळी स्वभाव मला माहीत आहे. कुणी कांहीं म्हटलं तरी ते त्याची पर्वा करणार नाहींत—पण हा जो पिंडाचा प्रकार झाला आहे त्याचा परिणाम मात्र त्यांच्या मनावर झाल्यावांचून रहायचा नाहीं—मग ते बोलून दाखवोत किंवा न दाखवोत. "

भार हलका करण्यासाठीं मनांतल्या गोष्टी ती बोलत होती म्हणून मी कांहींच बोललों नाहीं. गावात हा एक मोठा चर्चेचा विषय होऊन राहिला होता. प्रत्येकजण बाबीकाकांना दोष देत होता पण या प्रकरणांत मी केव्हां सुद्धां तोंड घातलं नाहीं. बऱ्यावाइटाचा कसलाच उल्लेख करायचा नाहीं असं मी ठरवून टाकलं होतं.

कांहीतरी नवी चळवळ सुरू केल्याशिवाय या गांवकुटाळक्या थांबणार नाहींत असं मला वाटूं लागलं. जिथं जावं तिथं बाबीकाका आणि त्यांची मुलगी यांच्याच गोष्टी बोलल्या जात होत्या. खेडेगांवचा आवारा थोडकाच असल्यामुळं कोणत्याही गोष्टीची चर्चा तिथं अतिरेकाला जात असे. यापासून किकीला त्रास होत तर नव्हताच—उलट तिच्याबद्दल लोकांची सहानुभूति वाढत जात होती, तरीही मला तो प्रकार आवडला नाहीं. कांहींतरी करून हा विषय बंद केला पाहिजे असा विचार करून मी गांवचा रस्ता सुधारण्याची योजना मंडळीपुढं मांडली.

अण्णांना ही कल्पना फार आवडली. दुकानदार या नात्यानं त्यांच्याकडे सामानाच्या

गाड्यांची रहदारी सारखी असे. रस्त्याचीही अव्यवस्था त्यांना पदोपदी जाणवत असे. खेडें असल्यामुळं गांवाला म्युनिसिपालिटी नव्हतीच शिवाय गांवांतला रस्ता आणि राजरस्ता यांचा कांहींच संबंध नव्हता. हमरस्त्यापासून गांव अगदीं बाजूला असल्यामुळं सरकारकडून किंवा लोकलबोर्डकडून तो रस्ता दुरुस्त होण्याची आशा नव्हती. नादुरुस्त रस्त्यानं वावरण्याची लोकांना इतकी सवय झाली होती, कीं त्यापासून उत्पन्न होणारी गैरसोय उदमी लोकांखेरीज इतरांना मुळींच जाणवत नव्हती. रस्ता करण्याची योजना करून जर मजुरांकरवीं तें काम करून घेण्याचं ठरवलं असतं तर त्यापायीं होणारा खर्च कुणी करायचा हा प्रश्न होता. गावच्या साऱ्याच लोकांना चांगल्या रस्त्याची जरुरी भासत नव्हती. ज्यांना रस्ता हवा असेल त्यांनीं हवे तर पैसे खर्च करावे असं बहुतेक गांवकऱ्यांचं मत पडलं.

ही योजना फुकट जाणार असं मला वाटूं लागलं, पण यावेळीं किकी माझ्या सहाय्याला धांवून आली. जरूरीपुरती खडी आणि दगड तेवढेच विकत घेऊन मजुरीचं काम गांवकऱ्यांनींच करावं अशी कल्पना ज्यावेळीं तिनं पुढं मांडली त्यावेळीं मला तर समाधान झालंच पण अण्णांनाही आनंद वाटला. ही योजना मी सांगितली असती तर कदाचित गांवकऱ्यांना ती पटली नसती. साधारण खर्चाचा आढावा घेऊन आम्ही खडी दगड आणण्याइतकी रक्कम उभी केली. माझा प्रत्यक्ष संबंध नव्हता, तरीही मी बराच मोठा आकडा टाकल्यावर गावच्या लोकांना लाजेकाजेस्तव वर्गणी देणं भाग पडलं. किकीनं तर पैसे दिले होतेच, पण जनीनं सुद्धां आपला एक महिन्याचा पगार या कामाला दिला. आमच्या जरूरीपेक्षांही जास्त रक्कम उभी राहिली.

एके दिवशीं सकाळीं आम्हीं सर्व मंडळी कुदळ फावडीं घेऊन घराबाहेर पडलों. सर्वांच्या पुढं अण्णा, धोंडशेट, रामभाऊ प्रभृतिमंडळी होती. गांवचे कर्ते पुरुष स्वतः कुदळ फावडं घेऊन निघाल्याबरोबर न बोलावतां प्रत्येकजण घराबाहेर पडूं लागला. बायकामुलं सुद्धां आनंदानं कामाला हातभार लावूं लागली.

बहुतेक प्रत्येक घरांतून शक्य तितकीं माणसं या कामासाठीं येत होतीं. दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणवठारांतल्या मंडळींचा या रस्त्याशीं कांहीं संबंध नव्हता, तरीही त्या वठारांतील शाळेंत येणारीं मुलं आमच्या अनुकरणानं जेव्हां कामांत भाग घेऊं लागलीं तेव्हां धोंडशेटनीं त्यांना मनाई केली. मी आणि किकी या कामीं खपत असलेले पाहून मुलं त्यांचं ऐकेनात. हौसेनं काम करणाऱ्या मुलांचा विरस होऊं नये

म्हणून मी संमति दिली. तरी धोंडशेट म्हणाले, " मी तुम्हांला एक सांगून ठेवतों मुलांनों, गुरुजी म्हणताहेत म्हणून मी कबूल करतों. पण उद्यां तुमच्या आईबापांनीं तक्रार केली तर त्याची जबाबदारी आमच्यावर नाहीं. उद्यां तुमचीं वडील माणसं म्हणतील, कीं मुलांना शिकण्यासाठीं आम्हीं शाळेंत पाठवतों, खडी फोडण्यासाठीं नव्हे, अर्थात् त्यांचं म्हणणं चुकीचं नसणार, म्हणून आधीं तुम्ही आपल्या वडील माणसांची परवानगी घेऊन या आणि मग या कामाला लागा. "

मुलांच्या एका म्होरक्यानं पुढं येऊन बोलायला सुरवात केली. तो म्हणाला, " हें काम जितकं तुमचं आहे तितकंच आमचं आहे. आम्हीं इथं शाळेंत येतों ते याच रस्त्यानं. आमच्या घरच्या माणसांना हा रस्ता चांगला व्हायची जरूरी वाटत नसेल, पण आम्हाला वाटते. आमच्यासाठीं आम्ही हें काम करणार. तिथं आम्ही आमच्या वडील माणसाची परवानगी घ्यायची जरूरी आहे असं आम्हाला वाटत नाहीं ! " असं म्हणून उत्तरांची अपेक्षा न करतां धांवत जाऊन तीं सारी मुलं कामाला लागलीं.

किकी माझ्याकडे पाहून डोळा घालून हसलो, तेव्हां मला वाटलं, कीं या प्रकाराच्या मुळाशीं तिचाच हात असावा. हें उत्तर कांहीं मुलांना सुचलं नसतं. मी किकीला विचारलं तेव्हां कांहींच उत्तर न देतां ती हसली आणि खडीची टोपली घेऊन धावत निघून गेली.

पहिल्या एकदोन दिवसांत श्रम झाल्याची जाणीव होत होती. पण रस्ता जसजसा आकारात येऊं लागला तसतसा प्रत्येकाचा उत्साह वाढूं लागला. मला कौतुक वाटत होतं तें दोन माणसांचं. एक धोंडशेट आणि दुसरी किकी. या दोघांचंही आयुष्य ऐषारामांत गेलं होतं. धोंडशेट तर आतां बरेच वृद्ध झाले होते. अण्णांना आंगमेहनतीचीं कामं करण्याची दुकानदारीच्या धंद्यामुळं अल्पस्वल्प सवय होती. त्यांना ते श्रम तेवढेसे जाणवले नाहींत—पण किकीचा उत्साह पाहून मात्र मी थक्क झालों.

इकडची काडी तिकडे करण्याची सुद्धां संवय नसलेली ही मुलगी, एवढी सुद्धां कुरकुर न करतां खणीत, मातीच्या टोपल्या उचलीत, दगड रचीत ज्या वेळीं राबूं लागलेली पाहिली तेव्हां गांवांतल्या सगळ्या बायका घरकाम टाकून या कामावर येऊं लागल्या. जरूरीपेक्षां जास्त माणसं कामाला लागल्यामुळं रस्त्याचं काम झपाझप आटोक्यांत येऊं लागलं. त्या दिवसांत आम्ही शाळेला रजा दिली होती. सारा दिवस माणसं सारखीं खपत होतीं. ती गंमत पहाण्यासाठीं दोन्ही बाजूच्या ब्राह्मणवठारांतील कांहीं मंडळी येऊन

रस्त्याच्या बाजूला उभी राहून आपल्या परीनं देखरेखीचं काम करूं लागली तेव्हां मलाही मोठं अवसान आलं. एकाददुसरा माणूस मधूनमधून हातभार लावूं लागला होता. डोक्यावर टोपल्या चढवण्यासाठीं हात देतां देतां कांहीं जण हळु हळु स्वतःच टोपल्या घेऊन काम करूं लागले.

एवढं झालं तरी बाबीकाका मात्र या मुदतींत या बाजूला फिरकलेसुद्धां नाहींत. गांवांत बहुधा रोज त्यांची एकादी तरी खेप व्हायची पण यावेळीं इकडे यायचं ते मुद्दाम टाळीत होते.

रस्ता जसजसा पुरा होत येऊं लागला तसतसा लोकांचा उत्साहही वाढूं लागला. रस्त्यावर फिरवण्याचा रूळ मिळवण्यासाठीं आम्हाला फार सायास करावे लागले, पण धोंडशेटनीं कुठंतरी संधान बांधून लोकलबोर्डाचा रूळ दोन दिवसांच्या मुदतींनं मागून आणला.

सहाव्या दिवशीं रस्ता पुरा झाला त्या दिवशीं समारंभानं या रस्त्याचं उद्‌घाटन करायचं असं सर्वांनीं ठरवलं. तालुक्याच्या मामलेदारांना बोलावून आणायची कल्पना कुणीतरी काढली होती पण ती धोंडशेटनीं हाणून पाडली. ते म्हणाले, "इथं मामलेदारांचा काय संबंध? या मामलेदारांनी आमच्यासाठीं काय केलंय आतांपर्यंत? मरमर मरायचं आम्हीं आणि मिरवायला यायचं काय मामलेदारानं? ते कांहीं नाहीं—आपलं आपणच काय तें करूं. नाहींतर मुळींच कांहीं समारंभ नको म्हणावं!"

ग्रामदेवतेची गाडींतून मिरवणूक काढावी अशी कुणी एकानं कल्पना मांडली धोंडशेटचा त्याला विरोध होता—म्हणजे उघड त्यानीं तसं बोलून दाखवलं नाहीं खरं पण त्यांच्या मताप्रमाणें त्यांना हें पटण्याजोगं नव्हतं. मलाही ती कल्पना तितकीशी आकर्षक वाटली नाहीं.

पण सर्वांचंच बहुमत झालं. चालत्याबोलत्या मामलेदारापेक्षां दगडी देव बरा, असं कल्पून मीही त्या योजनेला संमति दिली. बहुसंख्य असलेल्या भाविक माणसांच्या भावनेवर एकदम आघात करणं इष्ट नाहीं असं मी किकीला सांगितलं तेव्हां तीही कबूल झाली.

सातव्या दिवशीं मोठ्या थाटानं ही मिरवणूक निघाली. दोन्ही ब्राह्मणवठारांतील मंडळी झाडून सारी आली होती. आले नव्हते काय ते बाबीकाका. आणि ते आले नाहींत हें

कुणाला जाणवलंही नाहीं. रस्त्याची पूजा करण्यांत येऊन मग एका छकड्यांत देवीची उत्सव-मूर्ति ठेवून तो छकडा वाजतगाजत नव्या रस्त्यावरून नेण्यांत आला. मिरवणुकीला एकच गर्दी झाली होती. त्यांत कांहीं भजनी तार्फेही सामील झाले होते. महारलोक ढोल घेऊन आले होते. सारा गांव दणाणून गेला होता. प्रत्येकजण मोठ्या अभिमानानं त्या रस्त्यावर पाऊल टाकीत चालला होता.

मिरवणूक रस्त्याच्या दुसऱ्या टोकाला पोचल्यानंतर उत्सवमूर्ती नेऊन देवळांत ठेवण्यांत आली आणि मग एकेकानीं आपले छकडे आणून रस्त्यावर चालू केले. रस्ता पुरता दोन फर्लांग सुद्धां नव्हता पण तेवढ्याच लांबवर पुनः पुन्हां निरनिराळीं माणसं त्याच त्याच गाड्यांत बसून त्या इकडून तिकडे आणि तिकडून इकडे नेण्यांत येत होत्या.

ही वर्दळ सुरू असतांनाच मी निघून घरी आलों. आजवर झालेल्या आंगमेहेनतीची आतां मला जाणीव होत होती. जनी म्हणाली, " आज तेल लावून गुरुजींचं अंग रगडलं पाहिजे."

" गुरुजींचंच कां ? " मी म्हटलं, " मेहेनत कांहीं मी एकट्यानं केली नाहीं. तुम्ही सारींच खपत होतां—रगडायचं असलं तर प्रत्येक काम करणाराचं अंग रगडायची तयारी आहे का तुझी ?—अन् तुझं स्वतःचं कोण रगडणार ? "

तें ऐकून किकी मोठमोठ्यानं हसूं लागली तेव्हां जनी ओशाळल्यासारखी झाली. किकी म्हणाली, " जनीची नजर आहे नुसती गुरुजींवर ! त्यांना श्रम झालेले तेवढे तिला दिसतात. आम्हीं म्हणजे जशीं कांहीं माणसंच नव्हे. होय ना जने ? "

" करा माझी थट्टा बापडी ! " जनी नाराजून म्हणाली " पण मूळ कल्पना गुरुजींची. त्यानीं कधीं असलीं कामं केलीं नव्हती. त्यानी नुसता हुकूम करायचा आणि आम्ही तो पाळायचा, फारतर देखरेख करायची—पण ते स्वतः खपत होते म्हणून ना तीं दोन्ही वठारांतलीं माणसं आलीं ? लाजेकाजेनं का होईना पण कामाला हात लावायची त्यांना जी बुद्धि झाली ती गुरुजी खपत होते म्हणूनच ना ? परगांवचा माणूस येऊन इथं आमच्या-साठीं हातांत कुदळ घेऊन खणूं लागला याची लाज वाटल्याशिवाय कशी राहील कुणाला ? किती झालं तरी आम्ही माणसं आहोंत—" बोलतांना ती मधेंच थांबली. एकटे बाबीकाकाच तेवढे आले नव्हते ह्याची तिला आठवण झाली असावी.

" कां थांबलीस ? " किकीनं विचारलं.

" नाहीं उगीच ! " जनी म्हणाली, " तसं पाहिलं तर सारींच माणसं कुठं आलीं होतीं—जाऊंदे, आतां काय त्याचं ? रस्ता तर तयार झाला. तिकडे जाऊन पहा म्हणावं, इजनेराचा रस्तासुद्धां इतका चांगला नाहीं. एकदां आणून दाखवा तुमच्या त्या इजनेरांना अन् आतां त्या मामलेदारालाही ये म्हणावं आणि बघ—" ती बोलत असतांना अण्णा आणि धोंडशेट तिथं आले. तेव्हां ती म्हणाली, " काय, झाल्या आमच्या रस्त्यावर गाड्या उडवून ? " अलीकडे जनीचा धीर बराच चेपत चालला होता. मोठ्या माणसांना सुद्धां ती भिईनाशी झाली होती.

" नाहीं—" अण्णा म्हणाले, " अजून फिरवतायत छकडे सारे. एकदां घ्या पोटभर मजा करून म्हणावं. "

" जनी काय म्हणते ऐकलंत का ? " किकी अण्णांना उद्देशून म्हणाली, " गुरुजींचं अंग रगडलं पाहिजे म्हणतेय ती. "

" नुसतं अंग रगडून काय होणार आहे ? " अण्णा म्हणाले, " फार मोठे उपकार आहेत त्यांचे आमच्यावर. मोठा धडा दिला त्यांनीं आज आम्हाला हा. शंभर अर्ज करून सुद्धां काम झालं नसतं तें आम्ही सहा दिवसात केलं—एकसुद्धां अर्ज न करतां केलं. उठल्या सुटल्या सरकारात धांवायचीच काहीं जरुरी नाहीं. गांव एक झाला तर आपण काय वाटेल तें करूं, याचा प्रत्यय आला आम्हांला. "

" पूर्वीचा काळ नुसता बोलायचा होता, " धोंडशेट म्हणाले, " पण आतां प्रत्यक्ष हातून कार्य घडलं नाहीं तर त्या व्याख्यानांना अन् लेखांना कवडीची सुद्धां किंमत कुणी देत नाहीं, हा धडा स्वामी दयानंदांनीं दिला त्यावेळीं तुमचे पुण्याचे मोठे लोक त्यांची थट्टा करीत होते. तुम्हांला माहीत नाहीं ती हकिकत गुरुजी, पण मोठीं रणं माजलीं होतीं त्यावेळीं. पण स्वामीजींनीं आपलं ध्येय सोडलं नाहीं. आतां तुम्हाला महत्त्व वाटत नाहीं पण त्यावेळीं वाटेल तो माणूस वेदोक्त होमहवन करूं लागला म्हणून स्वामीजींवर केवढी आग पाखडली गेली ! ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र, अतिशूद्र हे सारे भेद झुगारून देऊन त्यांनीं हिंदुस्थान हें आर्यस्थान करण्याचा जो उपक्रम केला तो तुमच्या या बडबड्या सनातन्यांनीं यशस्वी करूं दिला नाहीं म्हणून आजचीं हीं भांडणं आपल्याला पहावीं लागत आहेत. मोठीं कर्तबगार

माणसं होतीं तीं आर्यसमाजांतली. त्यांतले शेवटचे स्वामी श्रद्धानंद तुम्ही पाहिले असतील, किंवा ऐकलं असेल त्यांच्याबद्दल—पण ते शेवटचेच! सगळाच गोंधळ माजलाय आज, म्हणून अशीं हीं कांहीं कामं केलेलीं पाहिलीं म्हणजे माझ्या म्हाताऱ्या डोळ्यांना ओलावा येतो. आपण रस्ता करीत होतों तेव्हां कोण कुणाची शिवाशीव मानीत होतं? सगळेजण एकमेकांच्या कामाला हातभार लावतांना महार, चांभार, धेड–कांहीं पहात नव्हतों—"

"पण घरीं जाऊन आंघोळ करीत होते." जनी म्हणाली.

मोठमोठ्यानं हसत धोंडशेट म्हणाले, "अग ते रस्त्यावरच्या मातींत बरबटले होते म्हणून. विचार जाऊन प्रत्येकाला, कां कुणी आंघोळ केली होती ती? होतं का कुणाच्या ध्यानांत?"

"निदान माझ्या तरी ध्यानांत आलं नाहीं." अण्णा म्हणाले, "मोठा कैफ आला होता आम्हाला. किती जलद हा रस्ता पुरा करतों याच्यावरच नजर होती आमची. घरीं गेल्यावर सुद्धां तींच बोलणीं चालत."

"पण चुकूनमाकून हात लावणाऱ्या आमच्या मंडळींना विचारलंत का?" किकी म्हणाली.

"तें असं आहे—" धोंडशेट गंभीरपणाचा आव आणून म्हणाले, "देवळाच्या घुमटावर बसलेला पारवा रस्त्यावर धुळींत लोळणाऱ्या किड्यांची कुठं खिजगणती धरतो! धरलीच तर ती त्याला चोंच मारून खाण्यासाठीं—पण त्याला हें माहीत नसतं कीं त्याच्यावरही झडप घालायला सुद्धां एखादी घार टपलेली असते. तें कशाला हवं! आपण आपले जमिनीवरूनच चालूं या—कुणी आकाशांत उडत असतील त्यांना खुशाल जाऊं द्या उडत. तेवढीच सावली होते आपल्याला. हजारांना जिथं कांहीं वाटलं नाहीं तिथं एकदोघांची पर्वा कोण करतो?"

"एकदोघांची देखील पर्वा केली पाहिजे." किकी म्हणाली, "ते एकदोघेच हजारांना आड येत आहेत. वर उडत जात आहेत ना ते? जमिनीवर जे सरपटत असतात त्यांना धूळ खावी लागते. वर उडत जाणारा दिसला कीं त्या धूळ खाणाराला वैषम्य वाटतं त्याचं. पण जमीन काय आणि आकाश काय, सारींच एक आहेत असं ठरायला त्या उडत जाणाराचा पाख तोडला पाहिजे. जमिनीवर सरपटल्याशिवाय त्याला सुद्धां धूळ खायचं सुख कळायचं नाहीं—"

" असं बोलूं नये पोरी." धोंडशेट म्हणाले, "पांच बोटांची मूठ वळली कीं पायाची लाथ लंगडी पडते. हजारांची एकी झाली तर चारचौघे म्हणून रहाणारे असतील त्यांना नाकदुऱ्या काढाव्या लागतील त्या हजारांपुढं. आपण कांहीं बोलूं नये, नुसतं काम करीत रहावं, पूर्वी मी फार बडबडत असें. शिव्यागाळी करीत असें—पण आतां त्या शिव्या संपून गेल्या. आतां वाटतं, मुकाट्यानं काम केलं तर लाख शिव्या देण्यापेक्षां जास्त परिणाम होतो. शिव्या देण्यानं नुसतं मनाचं समाधान होतें--काम कांहींच होत नाहीं—उलट वैरं वाढतात. आतां हेंच पहा, हजार व्याख्यानांनीं झाली नव्हती ती एकी या रस्त्याच्या धुळीनं केली. कसे डोळे निवाले माझे--" म्हाताऱ्याला गहिंवर आला होता.

यानंतर किकी कांहीं बोलली नाहीं. जनीनंही आपल्या तोंडाला खीळ घातली.

बराच वेळ इकडच्या तिकडच्या गप्पा झाल्यावर अण्णा, धोंडशेट निघून गेले. धोंडशेटच्या भाषणाचा माझ्या मनावर मोठा परिणाम झाला होता. परिणामाची अपेक्षा करून मी ही रस्ता करण्याची योजना काढली नव्हती, पण आतां प्रत्यक्ष तिचा जो परिणाम झालेला दिसून आला त्यामुळं माझ्या विचारांना निराळंच वळण लागलं—हांव वाढली—अशीच आणखी कांहीं तरी योजना काढून सारागांव एका पातळीवर कसा आणावा याचा विचार करण्यांत माझं मन रमूं लागलं.

किकी आपलं दुःख विसरली होती. आम्हांलाही तिच्या दुःखाचा विसर पडला होता. रस्ता करण्याच्या कर्तबगारीचा आम्हां सर्वांना एवढा मोठा अभिमान वाटत होता, कीं त्यामुळं हें जग आम्हांला ठेंगणं भासत होतं. आम्हीं कांहींतरी अचाट गोष्ट करून दाखवली असं गांवच्या लोकांना वाटत असल्यामुळं हा परिणाम आमच्या मनावर झाला होता. म्हणून त्याच गोष्टी बोलत आम्हीं बाकीचं सारं कांहीं विसरून जात होतों.

वरून किकी हसत होती खरी, पण अंतरंगातलं दुःख तिला जाणवत राहिलं होतं असं मला पुनः पुन्हा वाटे. तें दुःख विसरण्यासाठींच ती मुद्दाम विषयांतर करीत राहिली होती. जनीच्या तें ध्यानीं येत नसावं. रस्ता केल्याचा कैफ जनीला अनावर झाला होता. तिच्या आणि आमच्या दृष्टींत मुळांतच फरक होता. निमगांव हेंच तिचं जग होतं. त्या टीचभर जगांत झालेली तिळाएवढी सुधारणा तिच्या दृष्टीनं केवढीतरी अफाट होती. एवढी मोठी मुंबई, तिथले अवाढव्य कारखाने, रोज होत असलेली वाढ, ते अफाट

रस्ते, आकाशाकडे मजल मारणारीं तिथलीं घरं पाहून आमची नजर मेलेली असल्यामुळं, झालं तें कांहींच नाहीं असं वाटायला आम्हाला वेळ लागला नाहीं. जनीच्या आणि आम्हा दोघांच्या दृष्टींत हा फरक होता. म्हणून कोणत्याही रीतीनं तिचा विरस होऊं नये अशी खबरदारी आम्हाला घ्यावी लागत होती.

रस्ता पुरा झाल्यानंतर जवळजवळ एक आठवडा बाबीकाकांनीं गावांत पाऊल टाकलं नाहीं. त्यानंतर ते एकदां नुसते नजर टाकून गेले. अण्णांनीं त्याना विचारलं, तेव्हां तोंड वेंगाडून त्यांनीं तो प्रश्न हसण्यावारी नेला. किकीची चौकशी सुद्धां केली नाहीं. किकी मात्र आतां कोणत्याही प्रकारचा संकोच सोडून गांवांत वावरत होती. गांवच्या लोकांना तिच्या या धैर्याचं कौतुक वाटत होतं. ' आई मेली तरी या पोरीला कांहीं वाटत नाहीं ! ' असे एकदोघांनीं जेव्हां उद्गार काढले तेव्हां धोंडशेटनीं त्यांची चांगली हजेरी घेतली असं मला कळलं. त्यापुढं कुणीच तिला नांवं ठेवलीं नाहींत.

आणखी कांहीं दिवस असेच ठरलेल्या नित्यक्रमांत गेले.

त्या ठराविक कार्यक्रमाचा मला कंटाळा येऊं लागला होता.

प्रकरण १८ वें

# मला प्रश्न पडला

जनीची आजी सुभद्रा त्या दिवशीं जुनी हकिकत सांगण्यासाठीं मुद्दाम माझ्याकडे येऊन बसली. किकी आणि जनी दोघीही त्यावेळीं घरीं नव्हत्या. ती म्हणाली, " यापूर्वीच मी तुम्हांला माझं चरित्र सांगणार होतें. पण या पोरी सदोदित इथंच असत, बरं झालं कीं कापूस जमवण्यासाठीं त्या आज शेजारच्या गांवाला गेल्या म्हणून—"

" असं पहा सुभद्राबाई, " मी म्हटलं, " शक्य तेवढं करून गांवच्या उठाठेवींत पडायचं नाहीं असा मी निश्चय केला आहे. तुम्हाला जें कांहीं सांगायचं आहे तें सांगतांना एवढंच ध्यानांत ठेवा, कीं तुमच्या गाऱ्हाण्याचा परिहार करायचा अधिकार कांहीं माझ्या हातीं नाहीं. "

म्हातारी हसून म्हणाली, " आतां कोण कसला करणार आहे परिहार ? जें व्हायचं तें होऊन गेलं आहे. कुणाचा सूड उगवायचा नाहीं मला. तुम्हाला मी सांगतें ती एवढ्यासाठींच, कीं त्यांतून तुम्हाला कांहीं धडा घेतां आला तर पहा—" असं म्हणून ती क्षणभर उगीच राहिली. मी बोलत नाहीं असं पाहून ती म्हणाली, " गरिबांच्या घरीं दळिद्र हें ठेवलेलंच; पण त्यांतच

सुख मानून आम्हीं रहातों. माझी पोरगी—या जनीची आई, कुळवाड्याची मुलगी खरी पण अगदीं नक्षत्रासारखी होती. नवराही बरा मिळाला होता तिला. माझं हें असं झाल्यापासून मी जांवयाकडेच रहात होतें. तीं दोघंही बाबीकाकांच्या शेतावर काम करीत. पुढं तें शेतच त्यांनीं खंडानं घेतलं. शेतावरचं काम म्हणजे कांहीं बारमहाचं काम नव्हे. सुगीचे दिवस संपले की जनीचा बाप मोलमजुरीसाठीं मुंबईला जाई. पोर इथं घरीं एकटीच राही म्हणून बाबीकाकांनीं तिला आपल्या घरीं घरकामासाठीं बोलवावं. तीही जात असे. कमाताईची आई भारी सज्जन, तिची फार माया होती माझ्या पोरीवर. बाबीकाका हा असा खाष्ट, पण चोरून मारून ती तिला कांहींबाहीं देत असे. कूळ म्हणून फुकट राबवून घेतलेलं त्या माउलीला खपत नसे." म्हातारी पुन्हा क्षणभर स्तब्ध राहिली आणि म्हणाली, "एके दिवशीं झालं असं, कीं ती कांहीं बाबीकाकांच्या घरीं जाईना. धन्याचा हुकूम, नाहीं कसं म्हणायचं? बोलावण्यावर बोलावणी येऊं लागलीं तेव्हां मी स्वतः जाऊन आलें. पण मला त्यांनीं घालवून दिलं. तिलाच पाठवून द्या म्हणून हट्ट धरला अन् कांहीं केल्या ती जाईना मी विचारलं तर धड उत्तर देईना. अगदीं खनपटीला बसलें तेव्हां तिनं सारा पाढा वाचला. बाबीकाकांची तिच्यावर वाईट नजर होती—" पुन्हा ती थांबली.

एक क्षणभर ती भकास नजरेनं जमिनीकडे पहात स्वस्थ राहिली होती. तिच्या डोळ्यांत त्वेषाची छाया सळसळत होती. ती म्हणाली, "बामण म्हणजे आम्ही देवासारखे समजतों. मायबाप ते आमचे. पण इथं काय चालतं तें तुमच्यासारख्या माणसांना कळायचं नाहीं. शेतावर राबणारीं माणसं आम्ही; त्या तेवढ्याच हक्कावर आम्हाला अंगाखालीं घालायला बघतात हे लोक! दरिद्री झालों तरी आम्हांला काय नीति नाहीं? काय देवाधर्माची चाड नाहीं? दहापांच रुपयांसाटीं काय आम्ही नरकाची वाट धरायची? लालूच दाखवून पाहिली त्या चांडाळानं, पण ती बधली नाहीं. पुढं तिचा नवरा आला. शेत काढून घेतलं बाबीकाकांनीं. फार वाईट दिवस आले तेव्हां आम्हाला. खेडेगावांत मोलमजुरी कसली मिळणार? दोघानीं मुंबईला जावं म्हणावं तर दोघांच्या पोटाला मिळायची तिथं भ्रांत होती—अन् मला टाकून जायची माझ्या जांवयाची तयारी नव्हती. वर्षभर अन्नान्न करून आम्ही दिवस काढले. कमाताईच्या आईनं चोरूनमारून कांहींतरी आम्हाला पोचतं करावं!—"

जनीच्या बाबतींत गावांत जी बोलवा होती त्याचा इतिहास आतां आपल्याला कळणार असं मला वाटलं. तो इतिहास मी ऐकला होता तसाच असावा कीं काय असा प्रश्न माझ्या मनांत येतो न येतो तोंच सुभद्रा म्हणाली, " पण शेवटपर्यंत ती कांहीं बाबीकाकाला बधली नाहीं. मग त्या चांडाळानं काय केलं तुम्हाला माहीत आहे ? कोणत्या तोंडानं सांगूं ? तिच्या नवऱ्याचा जीव घ्यायचा सुद्धां प्रयत्न केला ! गांव टाकून पळावं म्हणून मनांत आलं, पण तिचे दिवस भरले होते. तेव्हांच ही जनी झाली ! अन् मग तर मोठाच कठीण प्रसंग आला. घरांत खायला अन्न नव्हतं. आतां कांहीं भीति नाहीं असा विचार करून माझा जांवई मुंबईला गेला. आतां आम्हाला कुणाचा आधार नाहीं असं पाहून निर्लज्जपणानं त्या चांडाळानं माझ्या पोरीची बदनामी करायला सुरवात केली. ही आपलीच पोरगी आहे म्हणून तो म्हणूं लागला. असं म्हणतांना स्वतःचीच बदनामी होते याचीसुद्धां त्यानं पर्वा केली नाहीं ! खरी गोष्ट माहीत होती आम्हां दोघींना—एक मला कीं एक कमीच्या आईला. पण आम्ही कुठं कुणाला सांगायला जाणार होतों ? गांवांत हीं असलीं लफडीं असतातच. गांवाला तें खरं वाटत होतं. जो तो तिला टोचून बोलूं लागला. कसा छळ केलाय या गांवकऱ्यांनीं तें कांहीं मला सांगतां यायचं नाहीं—" तिला भड-भडून आलं होतं. काहीं वेळानं दुःखाची आठवण ओसरल्यावर ती म्हणाली, " जांवई मुंबईहून आला तेव्हां ही गोष्ट त्याच्या कानीं गेली. मी शपथा घेऊन सांगितलं तरी त्याला खरं वाटेना. दिवसादिवसाचा हिशेब दिला—केव्हांपासून तिनं तें घर वर्ज्य केलं होतं तें सांगितलं—तरी त्याची खात्री पटेना. गळा दाबून त्यानं तिचा जीव घेतला ! पण हें कुणाला कळूं दिलं नाहीं आम्हीं ! अशीच मेली म्हणून समजलीं सारींजणं. अन् मग तोही निघून गेला — तोही तिकडे मुंबईला कुठं गाडीखालीं सांपडून मेला म्हणून बातमी आली. ही एवढी लहानशी कीड, तिला पोसायचा भार माझ्यावर आला. काय माझी स्थिति त्यावेळीं झाली होती तें कसं सांगूं तुम्हाला ?—" असं म्हणून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

थोडंसं दुःख ओसरल्यावर तिनं पुढल्या काळांत आपण कशा हालअपेष्टा काढल्या, मुलीच्या जोपासनेपायीं तिला कसकशा अडचणी आल्या, विशेषतः बाबीकाकांनीं ती मुलगी आपलीच आहे, असं गावांत ध्वनित केल्यामुळं जातीपातीच्या लोकांपासून तिला कसं वेगळं पडावं लागलं, आणि शेवटीं कडोविकडीला प्रसंग गेला तेव्हां बाबीकाकांच्याच पायां पडून कसंबसं आयुष्य कंठीत हे दिवस कसे पाहिले—ती सर्व हकिकत

सांगतांना त्या बिचारीला ज्या यातना होत होत्या त्या पाहून मलासुद्धां माझीं आसवं आवरतां येईनात.

एकूण हें असं होतं ! गांवांतल्या प्रवादांमुळें माझा जो समज झालेला होता तो चुकीचा होता. जनीची बुद्धिमत्ता कुळवाड्याच्या बीजांतूनच निर्माण झालेली होती. तिच्या चलाखपणाचं मूळ ज्या ठिकाणीं लोक शोधीत असत ती जागाच चुकीची आहे हें कळल्या-मुळं मला समाधान वाटलं.

बुद्धिमत्ता आनुवंशिक नसते असा माझा समज होता. बुद्धिवानाचीं मुलं निर्बुद्ध आणि निर्बुद्धांची मुलं बुद्धिवान् असल्याचीं शेंकडों उदाहरणं माझ्या डोळ्यासमोर होतीं. जातगुण म्हणून म्हणतात तो खोटा आहे, याचं जनी हें प्रत्यक्ष उदाहरण होतं. म्हाताऱ्या सुभद्रेच्या शब्दावर माझा विश्वास होता. आजपर्यंत ही हकीकत तिनं कुणालाच सांगितली नव्हती. तिनं तशी सांगितली असती तर कुणी तिच्यावर विश्वास ठेवला नसता. खोट्या पापाचा बोजा शिरावर घेऊन हलुच गालांत हसून बाबीकाका जे आजपर्यंत मिरवीत आले तें सारं ढोंग होतं, असं जेव्हां मला कळलं तेव्हां मनुष्य स्वभावाबद्दल मला आश्चर्य वाटूं लागलं. समाजाच्या दृष्टीनं पुरुषाचं पाप खिजगणतींत येत नाहीं, चुकून पापी-भ्रष्ट झालेली स्त्री सुद्धां पवित्र समजली जाते, पण बुद्धिपुरस्सर अनीतीच्या मार्गावर पाऊल टाकणाऱ्या पुरुषाला कुणी पतित समजत नाहीं—क्वचित त्याचं कौतुक केलं जातं--तसाच प्रकार इथं झाला होता. दारिद्र्याच्या पायीं पुष्कळ कुणबी स्त्रिया उच्चवर्णीयांच्या अनावर विषयासक्तीला बळी पडल्याचीं उदाहरणं खेडेगांवच्या पंचक्रोशींत चटकन ध्यानीं येत असल्यामुळं बिचाऱ्या जनीच्या आईवर निष्कारण पापाचा डाग लागला होता. सुभद्रेकडून मला कळलं, कीं जनीला ही सर्व हकिकत माहीत होती. या बाबतींत तिला कुणी डिवचलं तर ती कधीं वादांत पडत नसे खरी, पण आपल्या निष्पाप उत्पत्तीच्या जाणीवेमुळं त्या डिवचण्याचा तिच्या मनावर परिणाम होत नसे.

बाबीकाकांच्या बाबतींत तिचे वेळोवेळीं जे उद्गार निघत त्याचं रहस्य मला आतां कळलं. किकीला सुद्धां ही खरी हकिकत माहीत नव्हती. गांवचा प्रवाद ती खरा धरून चालत होती, म्हणूनच कदाचित तिचा जनीच्या बाबतीत एवढा जिव्हाळा उत्पन्न झाला असावा अशी शंका माझ्या मनांत आली.

पण त्या हकिकतीचा उल्लेख किकीकडे न करण्याचं मी सुभद्रेला अभिवचन दिलं होतं. तिनं असं वचन माझ्याकडून कां घ्यावं याचं मला आश्चर्य वाटलं. मी तसं विचारलं त्यावेळीं ती म्हणाली, "कमाताईला सांगायचं असलं तर मीच सांगेन. माझ्या परीनं मला तें सांगायला हवं; तुम्हाला सुद्धां सगळी हकिकत मी सांगितलेली नाहीं. आणखी पुष्कळ फाटे आहेत या बाबतींत. वेळ येईल तेव्हां मीच कमाला सांगेन.—"

माझं बोलणंच राहिलं. मी जास्त खोलांत जाण्याचा प्रयत्न केला नाहीं. विषय तेवढ्या-वरच थांबला. पण माझं मन या चक्रांत भ्रमण करूं लागलं. खेडेगांवची परिस्थिति शहरा-पेक्षां निर्मळ असते असा माझा समज होता. पण शहरच्या लोकसंख्येच्या मानानं दिसणाऱ्या अनीतीच्या उदाहरणाशीं तुलना करतां खेडेगांवच्या लोकसंख्येच्या मानानं असणारी असलीं उदाहरणं जास्त आहेत असं मला वाटूं लागलं. दारिद्र्याचा प्रभाव खेडे-गांवच्या व्यक्तिविशेषाला क्षेत्रफळाच्या आकुंचित मर्यादेमुळें जितका जाणवतो तितका तो शहरच्या व्यापक क्षेत्रांत दुष्परिणामकारक होत नाही असंच मला वाटूं लागलं. यापूर्वी माझा अगदीं उलटा समज होता. पण सुभद्रेनं या भाषणांत ओघाओघानं जीं उदाहरणं मला सांगितलीं त्यावरून दरिद्री माणसांना खेड्यात पापाच्या मार्गाला लावायला सत्तेच्या जोरावर वावरणारीं सुखवस्तु माणसं कशी कारणीभूत होतात याची मला स्पष्ट कल्पना आली.

त्या दिवशीं रात्रीच्या बैठकींत या विषयाचा मी सहज उल्लेख केला तेव्हां किकी म्हणाली, "मलासुद्धां असंच वाटतं. आम्हा बायकांना शहरच्या परिस्थितीचा असल्या बाबतींतला आढावा चांगलासा घेतां येत नाहीं. पण ज्याला पाप म्हणून म्हणतात त्याचे कारखाने शहरांत उघडउघड सुरू आहेत. खेड्यांतले व्यवहार चोरटे असतात—तितकेच सक्तीचे असतात—ही सक्ती कुणाला कळत नाहीं. शहरांत सक्ती असली तर ती कदाचित् खुषीचीही असणं असंभवनीय नाहीं. पण इथं जी सक्ती केली जाते ती अधिकाराच्या जोरावर—मोठेपणाच्या जोरावर—मालकीच्या जोरावर—भुकेच्या आगीसाठीं!"

"काय करतां येईल या बाबतींत?" मीं विचारलं.

"उपाय एकच—" किकी म्हणाली, "इथल्या गरीब माणसांना पोटभर अन्न मिळालं पाहिजे--पोटभर अन्न मिळेल असं काम मिळालं पाहिजे. इथल्या माणसांचं पोट अगदीं

चिमुकलं असतं. इथले आणे शहरच्या हिशेबानं रुपये होतात. एका पैशाच्या अभावींसुद्धां इथलं माणूस उपाशीं पडतं, तशीच एका पैशांत देखील इथल्या माणसाची भूक तेवढ्यापुरती भागते. म्हणूनच मला हा चरखा आवडतो. खेड्यांत माझं आयुष्य गेलं आहे म्हणूनच मला चरख्याची किंमत कळते. तुमचीं शहरचीं माणसं सूत काढतात ती नुसती फॅशन म्हणून; त्या सुताचा मोबदला तीं माणसं घेत नाहींत–चारदोन आण्यांची काय किंमत असं त्यांना वाटतं; म्हणूनच सुताच्या गुंड्या मुंबईत घरोघर पडून राहिल्या आहेत. चरखे, माग पाहिजे आहेत ते या खेड्यांसाठीं. पण खेड्यांतल्या चळवळीच्या बातम्या कुठं येत आहेत वर्तमानपत्रांतून ? सूत्रयज्ञाचीं अवडंबरं माजवून शहरांत जो डांगोरा पिटला जातो तो पाहिला म्हणजे मला चीड येते. हाताशीं माग नसतांना सूत कशाला काढतां ? इकडे रोज चारचार तास सूत काढीत बसायचं, अन् कपडा घ्यायची वेळ आली कीं खादीभांडारांत धांवत जायचं, असले प्रकार पाहिले म्हणजे तेच चरखे उचलून यांच्या टाळक्यांत घालावे असं मला वाटतं ! ”

किशीचे ते उद्गार ऐकून मला हसूं आल्यावांचून राहिलं नाहीं. मी हसतों आहें असं पाहून ती चिडून म्हणाली, “ हसायला काय झालं ? पांच वर्षं या खेड्यांत रहा म्हणजे कळेल तुम्हाला. हसायच्या अगोदर रडूं लागाल ! महिन्याच्या महिन्याला पगार मिळतोय––अगदीं तुटपुंजा पगार मिळतो तुम्हाला हें मला माहीत आहे––पण मिळतोय म्हणूनच तुम्हाला हें जाणवत नाहीं. चार पैसे मिळवण्यासाठी खेड्यांतल्या कुणब्याला कसं आणि किती राबावं लागतं याची कल्पना नाहीं तुम्हाला. त्या चार पैशांत सुद्धां कितीतरी वाटेकरी असतात. निढळच्या घामाच्या कमाईचे ते चार पैसे खिशांत पोंचेपर्यंत त्यांतले तीन खलास होतात हें कुणब्याच्या जन्माला गेल्याखेरीज कळायचं नाहीं—”

“ एवढ्याशा हसण्यासाठीं किती विकोपाला नेलंस हें प्रकरण ? ” मी म्हटलं, “ हेंच शिकायचं आहे म्हणून मी इथं आलों आहें. अजून मी पांढरपेशांत वावरतों आहें, अजून शेतकऱ्याचा दाखला मला पहायचा आहे, भाग्यानं जनी इथं आली म्हणून ही जिज्ञासा तरी उत्पन्न झाली, नाहींतर शहरच्या दृष्टीनं मी उगीच पिष्टपेषण करीत इथं राहिलों असतों.”

अजूनपर्यंत जनी कांहींच बोलली नव्हती. आतां तिला वाचा फुटली. ती म्हणाली, “ दरमहा एक रुपया घेऊन सारं घरकाम करण्यासाठीं माझी आजी इथं राहिली

त्यावेळीं विचारलंत का तिला, कीं एवढ्यांत तुझं कसं भागेल म्हणून? त्यावेळीं तुम्हांला वाटलं, बरं झालं, थोडक्यांत काम भागलं, खेड्यांत राहणं मोठं सुखाचं, फारसा खर्च पडत नाहीं! असंच वाटलं ना तुम्हांला?"

इतक्या चिडीनं तिनं हा प्रश्न विचारला, कीं मी अगदीं ओशाळून गेलों. मी म्हटलं, "माफ कर जने, खरोखरच त्यावेळीं हें माझ्या ध्यानीं आलं नाहीं. मी नुकताच मुंबईहून आलों होतों तेव्हां. शहरी नजर होती त्यावेळीं. आतां कुठं मी थोडेबहुत डोळे उघडून पाहूं लागलोंय—"

"तुम्ही मलाच क्षमा करा—" जनी म्हणाली, "उगीच चट्कन मला चीड आली. ज्याचं जळतं त्याला कळतं! कसे हाल काढले आहेत आम्हीं हें कसं सांगूं तुम्हाला? उभ्या आयुष्यांत सुखानं आम्ही दोघींनीं अन्न खाल्लं असेल तर तें इथं आल्यापासून! पोटभर मिळतंय अन्न आतां तें तुमच्या कृपेनं! म्हणून मी बोलायला नको होतं तसं—"

"काय झालं बोललीस म्हणून?" किकी म्हणाली, "यांना तरी केव्हां कळणार? कसं कळणार? इतक्या दिवसांत मला आज समाधान वाटलं. अजूनपर्यंत आम्ही नुसतीं राबत होतों-मला थोडीशी कल्पना होती—पण याना कांहींच माहीत नव्हतं. सरकारी ऑफिसांत काम करणाऱ्या कारकुनासारखं यांनीं काम चालवलं होतं—आपल्या कल्पनेप्रमाणं काम चालवलं होतं. मी म्हणतें, खेड्यांत येऊन काम कसं करायचं याची यांना कल्पना यायला आतां कुठं सुरवात झाली आहे—" माझ्याकडे वळून तिनं विचारलं, "असंच ना?"

"असंच खरं." मी म्हटलं, "पण अजूनही मला पुष्कळ कळून घ्यायचं आहे. तुम्ही माहितगार माणसं—आजवर तुम्ही मला सांगितलं नाहीं हा अपराध माझा का?"

किकी मोठमोठ्यानं हसत सुटली आणि म्हणाली, "हा छान गळेपडूपणा. बरीं माझीं बोटं माझ्याच डोळ्यांत घातलींत! बरं बरं, आतां यापुढं एकदां हिंडवून आणतें तुम्हाला साऱ्या खेड्यांच्या कोनाकोंपऱ्यांतून, मग कळायचं तें आपोआप कळेल. सांगून कळायच्या नव्हेत या गोष्टी. त्या जाणवल्या पाहिजेत अंतःकरणाला—चिमटा बसला पाहिजे काळजाला—"

विषय तेवढ्यावरच राहिला. मलाही ओशाळल्यागत वाटत होतें. किकीच्या तें ध्यानीं आलं म्हणूनच विषयांतर करून तिनं हळुहळु मुंबईच्या गोष्टी काढायला सुरवात केली

मुंबईच्या गोष्टी निघाल्या कीं जनी एकदम फुलून निघत असे. एकेक प्रश्न विचारून ती आम्हांला भंडावून सोडूं लागली. पूर्वी तिला मुंबईचा तिटकारा असे. तिचा बाप अपघातांत सांपडून मेल्याचं तिला माहीत असल्यामुळं मुंबई म्हणजे कांहींतरी भयंकर गांव आहे असं ती समजत असे. तिच्यापुढं मुंबईचं वर्णन करून सांगणं म्हणजे बेडकानं बैलाचं वर्णन करण्या-सारखंच होतं. केव्हांतरी एकदां तिला नेऊन मुंबई दाखवायचं आम्हीं कबूल केलं तेव्हां तिचे प्रश्न थांबले.

त्या रात्रीं माझ्या मनांत विचाराचं चक्र सुरू झालं होतं. स्वभावतः बुद्धिवान असणाऱ्या या दोन मुली जवळ जवळ समवयस्कच होत्या. दोघींच्यांत फार तर दोनतीन वर्षांचं अंतर असेल. एक अगदींच अशिक्षित, तितकीच दुसरी चांगलीच सुशिक्षित. दोघींचीही दृष्टि तीक्ष्ण होती, दोघीही सहृदय होत्या, दोघीही बुद्धिवान होत्या, पण एक खाणींतून काढलेला हिरा आणि दुसरा कृत्रिम उपायांनीं पैलू पाडून चमकदार केलेला हिरा—असं त्या दोघींचं वर्णन करतां आलं असतं.

मला वाटलं, जातीजवळ काय आहे ? कुणब्यांतलीं बुद्धिवान मुलं शिक्षणाच्या अभावीं अशींच मोलमजुरी करीत गंजून जात असतील. त्या कच्च्या हिऱ्याला पैलू पाडले गेले नाहींत हा दोष कुणाचा ? कुणी म्हणेल प्राक्तनाचा. प्राक्तन खरं—पण तें व्यक्तीचं नव्हे—राष्ट्राचं ! इंग्लंडांतलीं कुणब्याचीं पोरं प्रधानमण्डळांत नाहीं का चमकलीं ? रशियांतली क्रांती कुणी केली ? आज सोव्हिएटचा दरारा जो सर्वांना वाटतो आहे तो या कुणबीशाही-मुळंच ना ?

मी पुन्हां विचार करूं लागलों, एक नवीनच कल्पना माझ्या मनांत आली. उद्यां मला संसारी व्हावंसं वाटलं तर या दोघीपैकीं कुणाबरोबर संसार थाटावा ? इथं प्रेमाचा प्रश्न नव्हता. आकर्षणच पाह्यचं तर दोघींनाही माझ्याबद्दल सारखाच आदर होता. किंब-हुना त्या बाबतींत जनीच वरचढ ठरली असती. समान शिक्षणाच्या जाणीवेनं किकी माझ्याकडे समतोल दृष्टीनं पहात होती. जनीच्या ठायीं शिक्षणाच्या अभावामुळं न्यून-गंडाची भावना होती. पण त्या न्यूनगंडामुळंच तिच्याबद्दलचं आकर्षण मला जास्त वाटलं.

सौख्य कुठं आहे ? समानतेंत कीं विषमतेंत ? घनविद्युत् आणि ऋणविद्युत् यांचा संगम झाल्याशिवाय ठिणगी पडत नाहीं !

पण ही भावना उच्चगंडामुळं तर उत्पन्न होत नसेल? जुन्या काळच्या रूढाचारांना आपण दोषी ठरवतों ते या विषमतेमुळंच ना? मग संसारांत समानता कां नको? सहवेदना कां नको?

या विचारानं माझा जीव कावून गेला. आज हा प्रश्न माझ्यापुढं नव्हता--कदाचित् केव्हांच तो प्रश्न माझ्यापुढं आला नसता. कल्पनेच्या अवास्तव भराऱ्या निर्माण करून मस्तकाला त्रास देण्यापेक्षां भवितव्यतेच्या हातीं सारीं सूत्रं सोपवून स्वस्थ रहावं असा विचार करून काळोखांत उघडे राहिलेले डोळे मी मिटून घेतले.

पण या प्रश्नावर विचार करायला भवितव्यता मला केव्हां तरी सक्तीनं भाग पाडणार होती याची जाणीव त्या क्षणाला मला झाली नाहीं.

प्रकरण १९ वें

# मी अर्ध्या रस्त्यावर आलों

गांवचा रस्ता झाल्यामुळं माझ्या कल्पनेबद्दल गांवच्या साऱ्या लोकांना विश्वास उत्पन्न झाला होता. आतां कोणतीही नवी योजना मी मांडली असती तरी लोकांनीं ती चटूकन उचलली असती.

पण माझंच डोकं चालत नव्हतं. सर्वत्रांना बिनविरोध पटेल अशी कोणतीच योजना मला सुचत नव्हती. किकीला विचारावं तर तो मला कमीपणा वाटत होता. ती आपणहून कोणताच प्रस्ताव करण्याचा भार घेत नसावी असा मला संशय आला. तिनं दुय्यम जागा पत्करली होती. हुकमाप्रमाणें काम करायचं, या पलिकडे आपली अक्कल चालवायची नाहीं असंच तिनं ठरवलं असावं !

पण मी तिला कां विचारूं नये ? प्रत्यक्ष कार्यांत तिचा दर्जा दुय्यम असला तरी त्या कार्यक्षेत्रापासून दूर होतांच तिनं आपलं स्वत्व कां दाखवूं नये ? हा तिचा न्यूनगंड होता कीं अभिमान होता हें मला सांगतां येत नव्हतं. मनांत आलं म्हणजे जनी मोकळ्या मनानं कोणताही प्रस्ताव पुढं मांडीत असे—मग किकीनंच तसं कां करूं नये ?

आईच्या मृत्यूचा परिणाम किकीला अजूनही जाणवत असावा असं मला वाटत होतं. सहसा ती गोष्ट कुणीही तिच्यासमोर उल्लेखीत नसे पण गांवांत या प्रकरणाची चर्चा पुनः सुरू झाली होती. कांहीं तरी उद्योग नसला म्हणजेच असल्या उठाठेवी सुरू होत. रस्त्याचं काम संपतांच या गोष्टीची चर्चा होऊं लागली असं मला वाटलं. ही चर्चा बंद व्हायला काय करावं याचा मी विचार करीत होतों-तोंच दोन्ही बाजूंच्या ब्राह्मणवठारांतील मंडळींनीं आणखी एक प्रश्न पुढं आणला.

विषय जुनाच होता. पण त्याला नवे फाटे फुटले होते. दोन कुळवाडी आणि दोन ब्राह्मण एका घरांत एका चुलीवर संसार थाटून राहिल्यामुळं पूर्वींपासूनच त्या लोकांना वैषम्य वाटत होतं. किकीच्या आईच्या मृत्यूनंतर, किंबहुना तिच्या मृत्यूमुळेंच तो विषय पुनः चर्चेला निघाला. गांवांतल्या कोणत्याही धार्मिक कार्यक्रमांत मी सहसा भाग घेत नव्हतों. प्रामाणिकपणानें तसल्या कार्यक्रमाशीं मिळतं घेणं मला शक्य नव्हतं. पण ज्या एका विशिष्ट दर्जानं मी निमगांवांत प्रवेश केला होता तो दर्जा संभाळण्यासाठीं गांवाशीं फटकून राहणं मला इष्ट नव्हतं. म्हणूनच मी अशा बाबतीत शक्य तेवढ्या तटस्थतेनं जितका मिसळायचा तितकाच मिसळत असें.

अण्णांनीं ती हकीकत मला सांगितली. ते म्हणाले, "मला आश्चर्य वाटतं या लोकांचं, तुम्हांला बहिष्कार घालणार आहेत म्हणे. स्वतः बाबीकाकाच सांगत होते. तुम्हांला बहिष्कार घालून आतां नवीन काय साधणार आहे? पण त्यांना किकीवर सूड उगवायचा आहे; बहिष्काराची चळवळ तुमच्यासाठीं नसून किकीसाठीं आहे."

"ती तरी कुठं त्याची पर्वा करतेय?"— मी म्हटलं, "तिनं सारे संबंध तोडून टाकलेयत! असं कांहीं केलं तर उलट तिचाच मार्ग मोकळा होईल."

"मार्ग मोकळा कसला व्हायचा?" अण्णा म्हणाले, "झालं तें चांगलं झालं नाहीं असं माझं मलाच वाटतं. आज ना उद्यां बापलेकीचा समेट होईल अशी मला आशा होती. पण आईची भेट होऊं न देण्यांत बाबीकाकांनीं जो निर्दयपणा केला त्यामुळं आतां हें पुन्हां जुळून येईल असं कांहीं मला वाटत नाहीं. तोच प्रयत्न करण्यासाठीं म्हणून मीं बाबीकाकांकडे गेलों होतों तेव्हां त्यांनीं ही हकीकत मला सांगितली. ब्रह्मवृंदाची सभा भरून तुम्हां दोघांनाही बहिष्कार घालण्यांत आला."

"ब्रह्मवृंदाची आज्ञा मला शिरसावंद्य आहे." मी हंसून म्हटलं, "या असल्या गोष्टींशीं आपल्याला कांहीं कर्तव्य नाहीं. आपण आपलीं कामं प्रामाणिकपणें करूं म्हणजे झालं."

अशा रीतीनं मी विषय तोडून काढल्यामुळं अण्णांना बोलायला कांहींच राहिलं नाहीं. ती गोष्ट त्यांच्या मनाला लागली होती हें मला स्पष्ट दिसत होतं. आधींच बहिष्कृत असलेल्या माणसाबद्दल सार्वजनिक रीतीनं बहिष्कार पुकारल्यामुळं मूळच्या परिस्थतींत जरी कांहीं फरक होत नव्हता, तरीही ही सार्वजनिक घोषणा अण्णांच्या दृष्टीनं आमच्या कार्याला अडथळा आणणारी होती. फार फार तर काय झालं असतं? ब्राह्मणांनीं आपलीं मुलं शाळेंतून काढून घेतलीं असतीं. बहिष्कृत माणसांनी आपल्या मुलांना शिकवूं नये असा खोटा आग्रह धरण्यांत त्यांचंच नुकसान झालं असतं.

पण त्या नुकसानीची त्यांना पर्वा नव्हती. धर्माच्या नांवाखालीं प्रचारांत असलेल्या रूढाचारांना भलतं महत्त्व दिलं गेल्यामुळं हीं पांढरपेशी माणसं स्वतःच्या नफानुकसानीची सुद्धां कशी पर्वा करीत नाहींत हें मला त्यावेळीं कळलं. त्यांनीं खरोखरच आपलीं मुलं शाळेंतून काढून घेतलीं.

स्वतः त्या मुलांना या गोष्टीचं फार दुःख झालं. इतर मुलं शिकत असतां आपण घरीं बसून राहणार याचं त्यांना वैषम्य वाटत होतं. आपल्या परीनं त्या मुलांनीं बंड करण्याचा प्रयत्न केला—त्याचा आरोप आमच्यावर आला—पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

या प्रकाराबद्दल किकीला मात्र फार वाईट वाटलं. स्वतः जाऊन त्या मुलांच्या आई-बापांची समजूत घालावी असा तिनं विचार केला होता, पण अण्णांनीं त्या गोष्टीला विरोध केला. जें काय व्हायचं असेल तें होईल असा पोक्त विचार करून जरी ती स्वस्थ बसली तरी ती गोष्ट तिच्या मनाला चांगलीच लागून राहिली होती हें माझ्या ध्यानीं आल्यावाचून राहिलं नाहीं.

जनीला मात्र त्याचं कांहींच वाटलं नाहीं. ती म्हणाली, "नाहीं का येईनात! मुलांना ढोंबे करून ठेवायची जर त्यांना हौसच असेल तर आपण कशाला आड या? तूं आपली मलाच शिकवीत जा कमाताई. मी उद्यां इंग्रजी बोलूं लागलें, कीं यांना आपोआप शरम वाटूं लागेल. उद्यां आमचे भाऊबंद इंग्रजी बोलूं लागले म्हणजे हे काय नुसते वेद म्हणत बसणार आहेत? पाहूं तर खरं किती दिवस त्यांची ही मिजास टिकते ती!"

जनीचं भाषण ऐकून किकी नुसती हसली आणि उगीच राहिली. आईच्या मृत्यूनंतर तिची पूर्वीची वृत्ति नाहींशी होऊं लागली होती. पूर्वीसारखी ती फारशी हंसतखिदळत नसे--कुणावर फारसे आघातही करीत नसे— कोणत्याही बाबतींत निश्चित मत द्यायचं सहसा टाळीत असे.

किकी नुसतीच हंसली असं पाहून जनी म्हणाली, " तुला हंसतां येतंय तें माहीत आहे मला. पण नुसतं हंसण्यावारी नेण्यासारखा हा प्रश्न नव्हे--"

" खरं आहे तें—" किकी म्हणाली, "काय होणार आहे त्याची खात्री झाली म्हणूनच मी हंसलें ब्राह्मणाची जात—मोठेपणाची जाणीव असल्यामुळं थबकून रहाणार नाहीं. चार दिवस वाट पाहतील अन् आम्ही वठणीस येत नाहीं असं दिसून आलं, कीं आपोआप मुलं शाळेंत पाठवायला लागतील. कुणब्या—माळ्यांनीं दौड ठोकावी अन् आपण स्वस्थ घरीं बसून रहावं हें कांहीं केल्या त्यांना खपायचं नाहीं. अगदीं काळजी करूं नकोस जने, शेवटचा डाव आपल्या हातीं आहे. "

किकी बोलत असतां जनी तिच्या डोळ्याला डोळा देऊन सारखी पहात, ऐकत होती. ती ऐकत होती, कीं तिचं लक्ष दुसऱ्याच कुणीकडे होतं याची शंका आली. पुढं ती बोलूं लागली तेव्हां माझी ती शंका खरी ठरली.

ती एकदम म्हणाली, " हें कितवं बरं वर्ष तुला कमाताई ? "

" कां ?" किकीनं विचारलं, " माझं वयसं आठवलं तुला यावेळीं ?"

" नाहीं आपलं उगीच !" जनी म्हणाली, " म्हटलं कितव्या वर्षी माणूस बी. ए. होऊं शकतं—"

" तें तुझ्या गुरुजींनाच विचार ना ! " किकी म्हणाली.

" कसले गुरुजी !" जनी उद्गारली, " आजी म्हणते, पूर्वीचे गुरुजी हे असे जाडजूड असत, ह्या एवढ्या मिशा, हा एवढा अंगरखा, अन् तें उपरणं, अन् तें पागोटं—यांना गुरुजी म्हणायचं म्हणजे नुसतं ते शिकवताहेत म्हणून. आमच्या मराठी शाळेंतले मास्तरसुद्धां यांच्यापेक्षां लांबरुंद आहेत—अन् एवढीसुद्धां मिशी नाहीं यांना—"

" रोज क्षौर सुरू असतं ना ?" किकी म्हणाली " खरंच, कितवं बरं वर्ष तुम्हांला ?"

आम्ही एकमेकांच्या वयाचा आढावा घेऊं लागलों तेव्हां असं दिसून आलं, कीं

किकी माझ्यापेक्षां एक वर्षानं लहान होती आणि जनी किकीपेक्षां दोन वर्षांनं लहान होती. तसं पाहिलं म्हणजे आम्ही तिघंही समवयस्कच होतों. माझ्याइतक्याच वयाला किकी बी. ए. झाली होती.

जनीनं हा प्रश्न कां काढला याची जरी मला अटकळ झाली नाहीं, तरी त्यांतून निघालेल्या निष्कर्षामुळं मला एक प्रकारचं समाधान वाटलं. किकीची कर्तबगारी मला पदोपदीं जाणवत होती. केव्हांही ती माझ्यावर जोरा चालवते याचं मला वैषम्य वाटे—म्हणजे त्या वैषम्यात कोणत्याही प्रकारचा हेवादावा नव्हता. आपण एक पुरुष माणूस या जाणिवेमुळं, तिच्या सतेजपणाबद्दल आणि त्याबरोबरच माझ्या स्वतःच्या दुबळेपणाबद्दल, मला केव्हां केव्हां खट्टू झाल्यासारखं वाटे. आतां तिचं वय कळलं तेव्हां तो संकोच नाहींसा झाला.

वयाच्या मानानं किकी फारच लहान दिसे. तिची अंगकाठी सडपातळ होती, उंचीला ती बरीच ठेंगणी होती, चेहऱ्यावरची मुद्रा अगदींच बालिश होती. निमगांवांत आल्यावर ती नऊवारी लुगडें नेसत असे म्हणून कुठं माणसांत आल्यासारखी दिसे. मुंबईला कॉलेजात असतांना दहा हाती पातळ नेसत असल्यानं ती अगदींच पोरसवदा दिसत असे. म्हणूनच माझ्या मनावर तसा परिणाम झाला होता.

जनीचं तसं नव्हतं. ती मुळचीच चांगली सुदृढ होती. किकीपेक्षां उंच होती. तिचा चेहरा जरी राकट नव्हता तरी जन्मभर क्लेश सोशीत आल्यामुळं अकालीं येणाऱ्या पोक्तपणाच्या रेषांनीं तिच्या चेहऱ्यावर अवास्तव वाडिलकी आणली होती. बोलण्यातही ती पोक्तपणाचा आव आणित असे—तिचा तो स्वभावच असावा—मात्र ती हंसली, कीं हा सारा पोक्तपणा नाहींसा होऊन तिच्या अंतःकरणांतला बालिशपणा फुललेल्या कळीसारखा तिच्या चेहऱ्यावर उमटून दिसे.

मला मोठं आश्चर्य वाटलं, एवढीं मोठीं माणसं या गांवांत असतांना त्या सर्वांना मागं टाकून आम्ही हीं तीन पोरं गांवच भाग्य बदलायचं कंकण बांधून निघालों होतों ! काय होणार होतं आमचं ? या धकाधकीच्या मामल्यांत आम्ही चुरडून तर जाणार नव्हतों ? तारुण्याचा मला अभिमान होता, तरुणांनीं भारतवर्षाचं भवितव्य बदलून टाकायचा विडा उचलला होता, वृद्धांचा मोठेपणा तरुणांना जरी असह्य झाला नव्हता तरी त्याच्या हुकमतीखालीं विनतक्रार मुंडी खालीं घालून घाण्याला जुंपलेल्या बैलाप्रमाणं जायची त्याची तयारी नव्हती, स्वतःचं कर्तृत्व स्वयंप्रेरणेनं गाजवायची सर्वसामान्य तरुणांना ईर्षा उत्पन्न झाली

होती. मी त्यांतला नव्हतों. प्रवाहपतितासारखा मी या बिनीवरच्या शिपायांत अचानक सांपडलों होतों. किकी तशी नव्हती. नव्या तरुणाच्या स्वतंत्र वृत्तीनं स्वयंस्फूर्त कर्तबगारी दाखवावी या महत्त्वाकांक्षेनं ती घर टाकून निघाली होती. सुरवातीलाच तिला अनपेक्षित धक्के बसले त्यामुळं अभिमानाच्या ऐवजीं तिचा आत्मविश्वास बळावत चालला जनी मात्र कुठंच नव्हती. तिला स्वतंत्र अस्तित्व नव्हतं—तितकीच ती परप्रकाशित नव्हती. कोणत्या तरी महत्त्वाकांक्षेला बळी पडून तिनं कसलीच सुरवात केली नव्हती. अगदीं नकळत ती या लढ्यांत मिसळली गेली होती. असं असलं तरी तिची स्वतःच्या व्यक्तित्वाबद्दलची जाणीव किकीपेक्षांही अधिक तीव्र आहे कीं काय असं केव्हां केव्हां मला वाटूं लागे.

त्या दिवशीं किकीनं मला एकदम थक्क केलं. शाळेंत जायला निघालों त्यावेळीं तिचा पोषाख पाहून मी एकदम दचकलों. निमगांवांतलं वातावरण फेकून तिनं कॉलेजांतला मुंबईचा पोषाख केला होता. फरक एवढाच, कीं ती साडी खादीची होती. मुंबईची जॉर्जेटची झुळझुळीत रेशमी साडी असती तर कदाचित् ती याहीपेक्षां छोटी दिसली असती कीं काय असं मला वाटलं. बुचडा टाकून तिनं वेणीचा शेपटा पाठीवर सोडला होता.

जनी एकदम पुढं येऊन म्हणाली, " एकदां पहा ना तुमच्या किकीकडे. "

" मला त्यांत काहीं नवीन नाहीं ! " मी म्हटलं, " मुंबईला तिचा हाच पोषाख असे. नुसती जॉर्जेटऐवजीं खादी आली आहे एवढंच. "

" पण तलम किती आहे ! " किकी उद्गारली, " देवकापसाचा बरं हा धागा. एक प्रतिज्ञा होती माझी—ती पुरी झाली. स्वतःच्या मेहनतीची आहे ही साडी. एकच उणीव आहे—मी विणलेली नाहीं. आतां हें मागाचं काम शिकलं पाहिजे मला."

" अन् तूं ग जने ? " मी म्हटलं, " तुझं लुगडं कधीं होणार आहे तयार ? "

" तोच विचार करतें आहे मी–" जनी म्हणाली अन् झट्‌कन निघून गेली. काय आलं होतं तिच्या मनांत ?

" पाहिलंत ? " साडीच्या पदराचा सोगा पुढं करीत किकी म्हणाली, " कसा पोत आहे ? अजून देखील बारीक धागा निघेल—"

" छान ! " असं म्हणून मी स्वस्थ राहिलों.

"पहा—" किकी म्हणाली, "हात लावून पहा. हात लावल्याशिवाय कळत नाहीं कापडाचा पोत—"

तिनं पुढं केलेला साडीचा सोगा मी हातीं घेऊन पाहिला-- आम्हीं अगदींच दारांत होतों. माझी नजर रस्त्याकडे गेली-- कुणी पाहिलं तर नसेल ? कां असं वाटलं मला ?

खरोखर ही साडी चांगलीच तलम झाली होती. ती साडी हाताळीत मी किकीकडे पहात म्हटलं, " बरीच मेहनत घेतलेली दिसते कोष्ट्यानं ! "

" अन् सूत कातणाऱ्याचं कांहींच कसब नाहीं वाटतं ? "

" तें तर आहेच ! पण कोष्ट्याचं कसब जास्त आहे ! " मी ती साडी हाताळीत तसाच राहिलों होतों. कसले विचार माझ्या मनांत येत होते त्या खादीच्या स्पर्शाबरोबर ?--

" चला आतां शाळेची वेळ झाली ! " किकी एकदम दचकून म्हणाली.

त्या दिवशीं गांवच्या लोकांना--विशेषतः शाळेंतील मुलांना--बोलायला एकच विषय झाला होता--किकीचा पोषाख !

धोंडशेट म्हणाले, " बरं झालं या पोरीनं धडा घालून दिला. खादीची सुरवात करायची तर तीं अठरा हाताचीं अवजड लुगडीं पेलायची नाहींत हल्लींच्या पोरींना--अन् मोठ्या बायकांत तरी कसली ताकद राहिलीय आतां ? पूर्वीचीं ती खापरीसारखीं लुगडीं नेसणाऱ्यांचीं अवलाद नाहींशी होत चालली आहे. आतां जें झेपेल तेंच केलं पाहिजे. त्या वेळीं दौलत होती, तशी ताकदही होती—आतां दोन्ही नाहींत. उगीच खोट्या अभिमानाच्या पायीं कर्जबाम करीत कशाला तीं महेश्वरी अन् इलकली लुगडीं नेसायचीं ? छान दिसली ती पोरगी त्या पोषाखांत. कशी विजेसारखी तळपत होती. बापानं पाहिलं तर भडका होईल त्याच्या अंगाचा ! एकदां होऊन जाऊंच द्या. असं हळु हळु पाऊल टाकीत जाणं मला कांहीं खपत नाहीं. दयानंदांचे अनुयायी आम्हीं, आम्हांला धूमधडाका आवडतो. किती दिवस कुणाची पर्वा करीत रहायचं ? आतां तुम्हीही जरा चढावाचं धोरण अंमलांत आणा गुरुजी ! "

माझं मलाच शरमल्यासारखं वाटलं. कसला मी गुरुजी ? धोंडशेटच्या समोर मी एक बच्चा होतों. नुकतीच वयाची चर्चा झाल्यामुळं माझ्या पोरकटपणाची मला आठवण झाली. पदवीच्या जाणीवेनं मी स्वतःला मोठा समजत होतों. पण तो मोठेपणा गाजवण्याची पात्रता माझ्या अंगीं होती का ? या म्हाताऱ्याला एकदम धूमधडाका करावा असं वाटतं

आणि मी पायरीपायरीनं जावं म्हणून म्हणणारा. तरुणांच्या तडफेबद्दल सारीं वर्तमानपत्रं डांगोरा पिटीत असतांना माझी गति अजून मंद कां रहावी ?

"आतां त्याच विचारांत आहे मी !" मी अवसान आणून म्हटलं, "निमगांवच्या हद्दीबाहेर आतां थोडी थोडी नजर टाकली पाहिजे--"

"पण अस्पृश्यतेचं काय ?" धोंडशेट म्हणाले, "माझा जीव गुंतून राहिला आहे तिथं."

"अन् मी घाबरतों आहे तेवढ्याच कार्यक्रमाला." मी म्हटलं.

"आतां घाबरून चालायचं नाहीं." धोंडशेट गंभीरपणानें म्हणाले, "तुम्ही कांहींही करा, लोक नाराज होणारच. त्या नाराजीला तोंड द्यायची तयारी केली पाहिजे."

"आपला एकट्याचाच पाठिंबा आहे--" मी शांतपणानें म्हणालों, "पण तेवढ्यानं निभाव लागणार नाहीं. अण्णांना सुद्धां धीर होत नाहीं. ती तिकडली मंडळी तर अगदीं टपून बसली आहेत. आज आमचीं म्हणून जीं माणसं आहेत त्यांच्यांतसुद्धां फाटाफूट होईल--"

या कार्यक्रमाला कशारीतीनं सुरवात करायची याची आम्ही बराच वेळ चर्चा केली. अण्णांचं मन वळवायचं काम धोंडशेटनीं स्वतः पत्करलं.

तरी पण योग्य संधि पाहिजे असं मला वाटत होतं. भलत्या वेळीं भलता उपक्रम केला तर तो यशस्वी व्हायच्या ऐवजीं आजवर झालेल्या कामावरही पाणी पडेल अशी भीति मला वाटत होती. घरीं आलों तेव्हां किकीबरोबर या विषयाची मी चर्चा केली. तिलासुद्धां या प्रकरणीं भीति वाटत होती हें पाहून मला समाधान वाटलं. जनीला मात्र फाजिल आत्मविश्वास होता. ती म्हणाली, "कसली आलीय शिवाशीव ? एवढं तरी कुठं खपत होतं इथं ? आज आपण हें बिन्धाड थाटून बसलों आहोंत—आतां कुणाला कांहीं वाटत नाहीं त्याचं—असंच केलं पाहिजे. उगीच आरडाओरडा करतां नये. आपलं चुकतं तें इथंच. सभा भरून डांगोरा पिटून आपलीं कामं व्हायचीं नाहींत—"

"समज जने," किकी हंसत म्हणाली, "उद्यां एक चांभाराचा मुलगा इथं घरकामाला आणून ठेवला तर पटेल तुला ?"

"मला पटेल--" जनी म्हणाली, "कां पटूं नये ? तुम्हीं बामण लोक माझ्या कुळवाड्याच्या

हातचं खातांहांत, तिथं चांभाराच्या शिवाशिवीला मी काय म्हणून भिईन?--" एक क्षणभर थांबून ती म्हणाली, "पण मला भीति वाटते माझ्या आजीची—"

"तेंच आहे ना?" किकी म्हणाली, "हा मेळ घालणं मोठं कठिण वाटतं. एका वयाची, एका मताची एक पिढी जोंपर्यंत एका जागीं येत नाहीं तोपर्यंत अडथळा हा यायचाच. मुलाला पटलं तर बापाला पटत नाहीं, अन् बापाला टाकून मुलाचं चालत नाहीं. परावलंबी असतो तोंपर्यंत मुलगा मन मारून बापापुढं मान वाकवतो—अन् शेवटीं हळु हळु बापासारखाच होतो. स्वतंत्र व्हायची योग्यता येते तेव्हां तो नव्या पिढीचा तरुणसुद्धां जुन्या पिढींतल्या बुड्ढ्याइतकाच मद्दड बनलेला असतो. म्हणूनच कांहीं करतां येत नाहीं. मला वाटतं या पिढ्या तोडून टाकल्या पाहिजेत. म्हातार म्हातारे तेवढे एका जागीं अन् सारे तरुण दुसऱ्या जागीं अशी वस्तीचीच वाटणी केली पाहिजे. हिरा ढेकणा-जवळ ठेवतां नये ढेकणाची वस्ती निराळी, हिऱ्याचं कोंदण निराळं, असं केल्याशिवाय हिऱ्याचा तजेला टिकून राहायचा नाहीं!"

किकीचं म्हणणं अक्षरशः खरं होतं. असंच कांहीं तरी केलं पाहिजे होतं. रशियानं तें करून दाखवलं असं म्हणतात—पण तसं कांहीं जोंपर्यंत झालं नाहीं तोंपर्यंत काय करायचं याचा विचार मी स्वतःशींच करूं लागलों.

प्रकरण २० वें

# मी लग्नांचा विचार करूं लागलों

निमगांवांत आल्यापासून आजपर्यंत मी काय केलं याचा आढावा घेऊं लागलों— आढावा घेण्याइतकं विशेष कांहीं मी केलं असं जरी मला वाटत नव्हतं तरीही जें काम झालं तें थोडं नाहीं असं मला वाटलं. शाळा उत्तम रीतीनं चालली होती. कित्येक मुलांनीं चांगलेच परिश्रम घेतल्यामुळं एका वर्षात तीन तीन इयत्तांची मजल मारली होती. पहिल्यानं मी एकटाच होतों, वर्गांची सुरवातही एकाच वेळची होती पण पुढं मुलांच्या प्रगतीनुरूप वर्ग पाडून मला एकट्यालाच ते चालवावे लागले होते. किकी आल्यावर काम जास्त सुलभ झालं आणि मुलांचीही प्रगति झपाट्यानं होऊं लागली.

खादीनिर्मितीचं काम मात्र खूप जोरानं चाललं. सुरवातीचे दोन माग कसे चालतील याचीच जिथं शंका होती तिथं आज आठ माग चालत असून सूत शिल्लक पडत होतं. लौकरच आणखी दोन ते चार माग चालू करण्याची तयारी चालली होती.

खादीच्या बाबतींत माझं धोरण निश्चित होतं. शक्य तेवढं करून इथं निघालेली खादी बाहेर विक्रीला पाठवायची नाहीं असं मी ठरवलं. एक ताका काढण्याइतकं सूत एका माणसाकडून आल्याशिवाय तें काम हातीं घेतलं जात नसे आणि तेवढ्या कपड्याची नुसती

विणण्याची मजुरी घेऊन तें त्यालाच देण्यांत येत असे, तें देखील त्यानं गांवाबाहेर विकायचं नाहीं या अटीवर. या योजनेमुळं जो तो आपल्यापुरता कपडा तयार झाल्यावर बाकीचा गांवातल्याच कुणाला तरी विकीत असे. अशी योजना पहिल्यानं केली होती. पण असा जास्त निघालेला कपडा विकणं कित्येकांना शक्य होत नाहीं असं दिसून आलं तेव्हां हा सारा तयार झालेला कपडा संस्थेनंच घ्यायचा, ज्याची त्याची मजुरी ज्याला त्याला द्यायची आणि त्याच्यावर थोडासा नफा घेऊन तो गांवांतच विकायचा, अशी जी योजना आम्हीं केली ती जास्त सोईची झाली.

प्रत्येक विणकऱ्याला रोज साधारण दहा ते बारा आणे मजुरी देतां येई आणि सूत कांतणाराला तीन आणे सहज मिळत. मुलांच्या आणि घरांतल्या बायकांच्या दृष्टीनं हें सूत कांतायचं काम खेड्याच्या परिस्थितीच्या मानानं चांगलंच फायदेशीर होऊं लागलं. कित्येक घरांतलीं चार चार माणसं आपला रिकामा वेळ या कामीं लावीत असल्यामुळं रोज रुपया बारा आणे मिळवीत. त्यामुळं पुष्कळांना ती चटक लागली. आजूबाजूच्या खेड्यांतून आम्ही अशा रीतीनं सूत काढायचं काम कित्येक कुटुंबांकडून करून घेऊं लागलों. थोड्याच दिवसांत बारा माग सहज चालूं शकतील असा आत्मविश्वास आम्हांला उत्पन्न झाला आणि त्याबरोबरच गांवांतल्या पुष्कळ लोकांच्या अंगावर गांवांतच तयार झालेला कपडा दिसूं लागला.

मी सिंहावलोकन करून पाहूं लागलों तेव्हां हें काम कांहीं थोडं झालं नाहीं असं मला वाटलं. पण त्याबरोबरच या कामाचं पुष्कळसं श्रेय जनीला होतं याचा उल्लेख मी केला नाहीं तर तो अन्याय होईल——नव्हे मी कृतघ्न ठरेन. घराघरांतून कापसाच्या पुण्या पोंचवणं, तयार झालेलं सूत त्यांच्याकडून आणणं, वेळच्यावेळीं मजुरीचे पैसे ज्याला त्याला पोंचते करणं——त्याचप्रमाणें नव्या नव्या घरांतून चरखे सुरू करून घेण्याचं मिशनवर्क करणं, हें काम तिनं एकटीनंच केलं नसतं तर आज जे आमचे आठ माग चालू होते ते चालूं शकले नसते. ती एक सामान्य कुळवाड्याची मुलगी होती म्हणूनच तिला हें काम करतां आलं. कुळवाड्यांच्या घरांतूनच तिनं आपला हा प्रचार चालवला होता. जरुरी होती ती त्यांनाच. रोज तीन आणे मिळवल्यानं कुणाच्या घरांत चार दाण्यांची भरपाई होईल, हें इतर कुणापेक्षांही तिला जास्त माहित होतं आणि म्हणूनच ती हें काम यशस्वी करूं शकली. गांवांतल्या सुखवस्तु घरांतून जरी हें काम चालू होतं, तरी सुताचा पुरवठा भरपूर प्रमाणांत होत होता तो दरिद्री अशा कुळवाड्यांच्या घरांतूनच. आम्हां पांढरपेशांपैकीं कुणाला हें काम करतां आलं नसतं असं मला तरी वाटलं.

त्या दिवशीं आम्ही तिघंही बसून हा आढावा घेत होतों. जनीनं केलेल्या या कामाची मी ज्या वेळीं तोंड भरून स्तुति केली तेव्हां ती म्हणाली, "बामण लोक आमची थट्टा करतात. रोज तीनच आणे का मिळतात, असं खिजवून विचारतात. पण ज्यावेळीं आम्ही त्यांच्या घरीं कामाला जातों—परसवात म्हणा, शेतात म्हणा काम करतों, तेव्हां आणा दोनआणे देण्यासाठीं ते जे घासघीस घालतात, ती कां ? आम्ही तीन आणे मिळवले तर त्यांत त्यांना विशेष कांहीं वाटत नाहीं; पण ज्या वेळीं पैसे 'द्यायचा' प्रश्न येतो त्यावेळीं एकादा आणा आम्हांला जास्त द्यायचा नाहीं म्हणून ते कां घासघीस घालीत बसतात ? त्या वेळीं त्यांना एक आण्याची किंमत वाटते ! आणा दोन आण्याला जर किंमत नाहीं, तर गरिबाच्या पोटासाठीं आणा दोन आणे उडवून द्यायला यांचा जीव कां खालींवर होतो ? मला माहीत आहे, यांच्या दारीं न राबतां जर आम्ही चार पैसे मिळवूं लागलों तर उद्यां मजूर मिळणार नाहीं म्हणून भीति पडली आहे या सावकार लोकांना. अन् तेंच करायचं आहे मला ! तेवढ्याचसाठीं मी एवढी मरतें आहें."

जनीच्या अर्थशास्त्रांतला हा नवा मुद्दा ऐकून माझ्या डोक्यांत चांगलाच प्रकाश पडला. किकीलादेखील तिच्या त्या शोधाचं कौतुक वाटलं ती म्हणाली, "मोठी खट्याळ आहेस तूं जने. असं वठणीवर आणणार आहेस का आम्हा लोकांना ?—पण हें टिकलं पाहिजे—"

"काय झालं न टिकायला ?" जनी म्हणाली, "फार तर तुम्ही पांढरपेशे लोक उद्यां स्वस्थ बसाल—पण ज्यांना खरी गरज आहे त्यांना जर रोज पैसे मिळत गेले तर कांहींसुद्धां कमी पडायचं नाहीं शेतीच्या दिवसांत थोडी ढिलाई येईल—नव्हे कुठून कुठून मुलींचं सूत मिळायचं नाहीं—त्यावेळींच काय ती तुम्हां लोकांनी भरपाई केली पाहिजे !"

किती दृष्टींनीं जनीनं या विषयाचा विचार केला होता याची मला तेव्हां अटकळ आली.

ती म्हणत होती, "कुणा गरिबाच्या घरीं रोज तीन आणे मी नेऊन देतें तेव्हां त्यांना केवढा आनंद होतो तें पहायला हवं तुम्ही ! दुसऱ्याच्या दारीं दहा खेटे घालून दातांच्या कण्या केल्या तरी ज्यांना पैसे मिळत नाहींत, निढळाच्या घामाचे आणा दोन आणे वसूल करण्यासाठीं सावकारांच्या घरीं खेटे घालूनसुद्धा जिथं भागत नाहीं, तिथं रोज तीन आणे घरीं येऊन पडूं लागले याचा आनंद कसा होतो तें तुम्हांला कळायचं नाहीं. मला हेंच करायचं आहे. मजूर मिळाला नाहीं तर काय होतं तें या सावकारांना एकदां

दाखवून द्यायचं आहे ! आज कांहीं बोलत नाहीं—मोलकरीण म्हणून काम करतांना माझ्या आजीच्या कशा हालअपेष्टा झाल्या आहेत त्या मी एवढीशी होतें तेव्हांपासून पाहतें आहें—तो सूड उगवायचाय मला ! त्या सूडासाठीं मी एवढी राबतें आहें. तुमचं काय असेल तें तुम्हीं पहा. ती तुमची काँग्रेस काय म्हणते तें मला कांहीं माहीत नाहीं. माझं ठरलंय तें एवढंच, कीं उद्यां हातांत कुदळफावडं घेऊन या सावकारांना आपल्या परसवांत राबायला लावलं कीं माझा आत्मा शांत होईल ! ''

जनीचे ते उद्गार ऐकून मी थक्क झालों—घाबरलों म्हटलं तरी देखील चुकीचं व्हायचं नाहीं. एका क्षुल्लक बाबीतून केवढी मोठी क्रांति करायचा विचार होता हा तिचा ! असं होणं शक्य आहे का ? नुसत्या चरख्याच्या जोरावर गरिबांचा छळ करणाऱ्या सावकारांना वठणीवर आणतां येईल का ?

सारा दिवस मी त्या एकाच गोष्टीचा विचार करीत होतों. ज्या चिडीनं जनी या कामाला उद्युक्त झाली होती ती चीड माझ्या रक्तांत नव्हती. उपासमारीची यातना मी भोगली नव्हती, म्हणूनच मला तसली ती चीड उत्पन्न होत नव्हती. या कामीं मी उत्साही होतों, तत्त्वनिष्ठेच्या अभिमानानं माझा हा उत्साह वाढत होता—पण त्या उत्साहाला चेतना द्यायला ज्या आगीची आंच मिळावी लागते ती आंच उत्पन्न होण्याजोगी परिस्थिति मी अनुभवली नव्हती. जनीच्या या सूडाच्या भावनेमुळं त्या आगीची जाणीव मला झाली, एवढंच.

मला वाटलं, जनीच्या त्या उद्गारांचा किश्शीच्या मनावरही परिणाम झाला. कांहींच न बोलतां ती उगी राहिली, त्यामुळं माझ्याचसारखा तीही या विषयाचा सांगोपांग विचार करीत असावी असं मला वाटलं.

जनीचा स्वभाव बडबड्या नव्हता. एकदांच उद्गार काढून ती स्वस्थ रहात असे. त्यानंतर त्या विषयावर बोलायला तिला प्रवृत्त करणं अशक्य होई. त्या दिवशीं त्या तिच्या स्वभावाला अनुसरून तीही धुमसत राहिली होती. कुणीच कुणाशीं बोलत नव्हतं. सुभद्रेच्या तें ध्यानीं आलं. ती म्हणाली, " काय केलं आज जनीनं ! फार अवखळ होत चाललीय ती अलिकडे ! एकदां लग्न करून टाकलं पाहिजे तिचं—"

" मग अजून कां स्वस्थ राहिलीस ? " चवताळून तिच्या अंगावर वसकन् जात जनी

म्हणाली, " कुणी नको म्हटलं होतं तुला ? लग्न करून मला एकदां दे कुठल्या तरी खड्ड्यांत लोटून–म्हणजे तूंही सुटलीस नि मीही सुटेन ! " एक सुस्कारा टाकून ती म्हणाली, " पण आतां कुठला कुळवाडी कांहीं माझ्याशीं लग्न करणार नाहीं !—तो ओरडा करून ठेवलाय ना ? खरं खोटं कोण पाहतोय पण मिजासखोर कुळवाड्याला रक्ताचा अभिमान असतो ना मोठा ? सगळ्याचं रक्त नासलं म्हणतात ते—पण कुळवाड्याचं रक्त अजून बिघडलं नाहीं म्हणावं !—"

" आतां उगी राहशील का जने ? " किकी म्हणाली.

" कां उगी राहूं ? " एकदम किकीच्या अंगावर जात जनी म्हणाली, " तुझं आपलं बरं आहे. कुठलाही बामण उद्यां घेऊन जाईल तुला—"

" पण माझा बापच आतां माझ्यावर उलटला—"

" अन् माझा नाश कुणी केला ? दोघांच्याही मुळावर आलाय तो खवीस !—"

" आतां गप्प रहा पाहूं जने — " सुभद्रा तिच्या तोंडावर हात ठेवून म्हणाली, " असलं तुझं लग्न व्हायचं तुझ्या नशिबीं, तर बाबीकाकाच्या बापालादेखील तें मोडतां यायचं नाहीं. आतां कोण नाहीं पहात जातगोत ! या वेळीं कसलं लग्नाचं काढलं आहेस तूं !"

" तूंच काढलंस. " जनी म्हणाली, " मी आपली निराळ्याच विचारांत होतें ! " असं म्हणून ती एकदम तिथून निघून गेली.

ती गेली असं पाहून सुभद्रा मला उद्देशून म्हणाली, " पाहिलंत गुरुजी, असं आहे. अगदीं लग्नाला आलीय ती, आतां कुठं तरी जमवलंच पाहिजे तिचं. तुम्हीच एकदां मनावर घेऊन पहा ! "

मी काय करणार होतों ? मला काय माहीत होतं ! मी कधीं कुठं कुणाचीं लग्नं जुळवलीं होतीं ? अण्णांना सांगावं असा मी विचार केला. किकीला त्या गांवची माहिती होती खरी पण ती पांढरपेशांची-कुळवाड्याचं स्थळ ती तरी कुठून दाखवून देणार होती ?

मला आश्चर्य वाटलं तें हेंच, कीं किकीपेक्षां लहान असणारी जनी लग्नासाठीं इतकी उतावीळ झाली पण किकीला तसं कांहीं वाटत नाहीं कां ? माणूस व्यासंगाला लागलं—अभ्यासाच्या, पदवीच्या मागं लागलं म्हणजे सांसारिक सुखाची त्याला विस्मृति पडते, कीं विस्मृति होणं अशक्य असतांही पैलथडीला जाईपर्यंत माणूस आत्मसंयमन करीत रहातो ? माझा मीच विचार करूं लागलों—

बी. ए. होण्यापूर्वीपासून मी हेरीत राहिलों होतों—आतां बी. ए. झालों, कांहीं तरी कामाला लागलों—पण चरितार्थाचं साधन या नात्यानं हें काम अपुरं होतं. संसारांत पडायचं म्हटलं तर दुसरी कुठली तरी नोकरी पत्करणं मला अवश्य होतं. खेड्यांतला कचरा उचलीतच मी सारं आयुष्य काढणार होतों का ? प्रवाहपतितासारखा मी इथं आलों होतों—मी इथला नव्हतों—पण इथला होण्याचा प्रयत्न करीत होतों. असा प्रयत्न करणं इष्ट होतं का ? मला कांहींच निश्चय ठरवतां येईना. कांहीं तरी ठरवलं पाहिजे खरं, असं मला या क्षणाला वाटूं लागलं. लग्नासाठीं आसोसलेल्या जनीनं मला एक नवी दृष्टि दिली—त्या दृष्टीनं मी भविष्यकालाकडे पाहूं लागलों.

मला कांहींच दिसेना.

* * * *

किकी देवकापसाच्या शोधामागें गेली होती. सुभद्रा आपल्या मोडक्या खोपटाची खबर घेण्यासाठीं गांवांत जायला निघाली, पण तिच्याबरोबर जायचं जनीनं नाकारलं.

त्या दिवशीं मी फिरायला जायला निघत होतों तेव्हां जनी म्हणाली, " गेलंच पाहिजे का फिरायला ? "

" कां बरं ? तुला कांहीं बोलायचंय ? " असं म्हणून मी टोपी खुंटीवर ठेवून खालीं बसलों.

" इकडे नको—" जनी म्हणाली, " आंत चला—मला कांहीं खासगी बोलायचंय. "

किकी आणि जनी ज्या खोलींत झोपत असत त्या खोलींत मी कधींच पाऊल टाकलं नव्हतं. आज जनीच्या आग्रहानं तिथं येऊन बसतांना मला संकोच वाटला. अगदीं मुकाट्यानं मी येऊन तिथं बसलों—खोली कशी सजवली आहे हें चौफेर नजर टाकून पाहिलं सुद्धां नाहीं.

कांहीं वेळ आम्हीं दोघंही एक शब्दसुद्धां न बोलतां स्वस्थ बसलों होतों. तो क्षण मला असह्य वाटला—कां हिनं मला बोलावलं ?—माझ्या हृदयांत उगीच धडकी भरली होती.

" ऐकलंत ना आज ? " जनी म्हणाली, " असं हें झालंय माझं. काय करूं आतां ? "

मला प्रश्न पडला—काय उत्तर देऊं ?

" उगीसे राहिलांत ? " जनी पुढं म्हणाली, "आजीचे दिवस आतां भरत आलेयत—

कुठं तरी माझा निर्धार लागावा असं तिला वाटतंय— " एवढंच बोलून माझ्याकडे टक लावून पहात ती स्वस्थ राहिली.

मी तरी काय सांगणार होतों ? कुणा वडील माणसाला असा प्रश्न केला असता तर तो गैर वाटला नसता. पण मला तिनं असं कां विचारावं ? ती बोलत होती, " कमाताई बापाबरोबर भांडली म्हणून तिचं कांहीं बिघडत नाहीं. कुणी वाटचा चोरसुद्धां तिला घेऊन जायला कबूल होईल. मी ही अशी--चोंहींकडे माझी बदनामी केलीय--आजीनं सांगितलंच ना तुम्हांला ?--जीव तोडून कुणाला सांगितलं तरी खरं तें खरं म्हणायचे नाहींत कुणी ! मग मी आतां काय करूं ? अशीच मोलकरीण होऊन का राहूं ? संसार थाटून, मग कुठं कुणाच्या घरीं राबलें तर त्याला कुणी नांवं ठेवायचें नाहींत. पण मी ही अशी--" पुनः ती थांबली--अगदीं गोरीमोरी झाली--माझ्याकडे पहात असतांना तिच्या दृष्टींत जी एक कांहीं अनपेक्षित चमक आली होती ती पाहून मीही घाबरल्यासारखा झालों.

मला कांहींच बोलायला सुचेना. किकी तरी येईल इतक्यांत ! मी अगदीं अस्वस्थ झालों होतों.

जनीनं एकदम दोन्ही हात माझ्या गळ्याभोंवतीं टाकले. घाबरून मी ताड्कन उठलों, " हां हां--हें काय ? " असं मी म्हणतों आहें तोंच माझ्या पायावर ती एकदम कोसळून पडली आणि फुलून फुलून रडूं लागली. तिला सावरून उचलायलासुद्धां माझे हात वाहीनात.

आंसवांनीं डंवरलेल्या डोळ्यांतल्या केविलवाण्या आशाळभूत नजरेनं माझ्याकडे पहात ती उठून बसली.

मी आतां सावध झालों होतों. तो पूर्वीचा एक प्रसंग मला आठवला. त्या प्रसंगाला दुःखावेगाची पार्श्वभूमि होती. तो प्रसंग जनीनं पाहिला होता—त्यावेळीं तिनं आपला पश्चात्ताप माझ्यासमोर व्यक्त केला होता.

या आणि त्या प्रसंगांत कोणत साम्य आहे याचा मी विचार करूं लागलों.

जनीला एक अनावर हुंदका आला.

तिच्या मस्तकावरून हात फिरवीत मी म्हटलं, " स्वस्थ रहा जने, हेही दिवस निघून जातील. तुझ्या कल्याणाचा भार आजपासून मी घेतला आहे असं समज आणि निश्चिंत रहा. "

" एवढंच ? " ती सद्गदित स्वरानं म्हणाली.

## प्रकरण २१ वें

# प्रस्तावना

झिमझिमणारा पाऊस नुकताच थांबून उन्हाची नाजुकशी तिरीप पडल्यामुळं त्या हॉटेलच्या खिडकीतून पहातांना सारं जग दुःखावेग संपल्यानंतर होणाऱ्या अनपेक्षित आनंदानं हांसत आहे असं मला वाटलं.

ऊटीचं हें दृश्य नित्याचंच आहे. माझ्या आयुष्यांत तरी मी हेंच अनुभवीत आलों नव्हतों का ? पेन खालीं ठेवून मी एक मोठा सुस्कारा टाकला तोंच मागून जनी खुद्कन हसल्याचा आवाज मला ऐकूं आला.

" काय ?—झालं ? " तिनं समोरून येऊन टेबलाला टेकून मला विचारलं.

" सध्यापुरतं तरी झालं !" मी म्हटलं. शेवटचीं पानें घेऊन त्यांच्यावरून नजर फिरवीत ती माझं भाषण ऐकत होती. मी म्हणत होतों " मी कांहीं लेखक नाहीं. तें ' तंत्र ' म्हणून काय म्हणतात तें मला माहीत नाहीं. जसं आठवतं तसं लिहून काढतों आहें--"

ती मध्येच म्हणाली, " अजून पुष्कळच आहे--कितीतरी राहिलंय अजून. ते तुमचे तमाशे, ती वरून आलेली धमकी, आपण चालवलेला तो हट्ट, तें आपलं नमुनेदार शेत आणि शेवटीं निमगांवांत आपण स्थापन केलेलं स्वराज्य—कित्ती कित्ती तरी लिहायचंय. "

"आतां कांहीं व्हायचं नाहीं माझ्याकडून." मी खुर्चीवरून उठून खिडकींतून बाहेर पहात म्हटलं, "हीच केवढी तरी तरवार मारली असं वाटतंय मला—"

जनी हंसत माझ्याकडे पाहात होती.

मी जनीकडे वळून म्हटलं, "किकीची स्वारी अजून परत फिरली नाहीं वाटतं! कशी हिला आपल्या प्रकृतीची काळजी नाहीं? नुकती दुखण्यांतून उठलेली--पुनः दुखणं उलटलं तर अनावर होईल असं डॉक्टरनीं सांगितलं, तरीसुद्धां ऐकत नाहीं!"

जनी नुसती हंसली आणि म्हणाली, "त्यागी जीव मोठे बेफिकीर असतात. त्या बेफिकिरीच्या बळावरच काळाशीं झगडून ते जीव धरून ठेवतात. महात्मा गांधी असेच नाहीं का जगले आहेत अजून?"

गांधीजींशीं किकीची तुलना केलेली मला आवडली नाहीं. पण जातीचा अभिमान आहे ना! त्यांतून ही स्त्री-जात!

बाहेर डोकावून पाहिलं! घोंगडीचा भला मोठा ओव्हरकोट घातल्यामुळं अस्थिपंजर झाली असूनही गुबगुबीत दिसणारी किकी, सूर्याच्या कोंवळ्या किरणांनीं खुललेल्या उटीच्या टेकडीसारखीच हंसत येत होती.

मला पहातांच हात वर करून ओरडून ती म्हणाली, "आलें बरं गुरुजी!"

ॐ तत्सत्